: प्रकाशक व मालक :
राजेंद्र रावजी शहा
सुरसग्रंथमाला, महाद्वार, पंढरपूर



: संचालक :
नवजीवन गौतमचंद व्होरा
केमिस्ट, सोलापूर



: मुखपृष्ठ :
चित्रकार श्री. मुळगांवकर







मुद्रक :
बाळकृष्ण भाऊ जोशी,
ज्ञानविलास प्रेस,
२७ बुधवार, पुणें २.

# प्रस्तावनेदाखल–

'कावळा व ढापी' या कादंबरीवर कांहीं आक्षेप घेतलेले मला आढळले. त्यांना याखालीं मी उत्तर देत आहें.

आ०—चंदू आय्. सी. एस्. परीक्षा पास झाल्याचें वर्तमान त्याला हिंदुस्थानांत कसें कळलें? कारण आय्.सी.एस्. उमेदवार पास झाल्यावर त्यांना एक वर्ष इतर शिक्षणाकरितां इंग्लंडांत काढावें लागतें.

उ०—आय्. सी. एस्. च्या लेखी व तोंडी परीक्षेनंतर सुमारें एक महिन्यानें निकाल जाहीर होतो. श्रीमंतांचीं मुलें या अवधीचा फायदा घेऊन हिंदुस्थानांत आईबापांना भेटण्याला येतात. चंदू हा घरचा श्रीमंत असल्यामुळें तो आला व इकडे असतांच त्याला परीक्षेचा निकाल कळला.

आ०—मेरी वुडहौस वारल्याची तार स्वतः तिनेंच केली असतां, तारेखालीं दुसरें कोणाचें खोटें तरी नांव घालावयास पाहिजे होतें.

उ०—अशी खोटी निनांवी तार करून तिचा काय परिणाम होतो हें मेरीला पाहावयाचें होतें. तिनें अनोळखी माणसाचें नांव घातलें असतें तर कांहींच उपयोग झाला नसता. ओळखीच्या मनुष्याचें नांव घातलें असतें तर त्याला तार-पत्र पाठवून चंदूला माहिती काढतां आली असती, ती मेरीला इष्ट वाटत नव्हती. स्वतः आक्षेपकानेंच सुचविला तो खुलासा खरा. म्हणजे 'अकल्पित दुःखद बातमी अचानक कानावर आल्यानें मनुष्य भांबवून जातो' आणि चंदूचीहि तीच गोष्ट झाली. निनांवी तारेचा पत्तामुद्दा काढण्याचा प्रयत्न कांहीं 'उशीराने' चंदूनें किती कसोशीनें केला, हें प्रकरण वीस यांत सविस्तर सांगितलें आहे.

आ०—मेरीचें प्रेत सुमारें २८-२९ तास पडून होतें. मग त्याचें दफन झालें हें कसें?

उ०—विलायतेंत आपल्या इकडीलप्रमाणें मृताचा अंत्यविधि झटपट उरकला जात नाहीं. मृताच्या मापाची पेटी तयार करणें, स्मशानांतील जागा ठरवून घेऊन खड्डे खणविणें, मरतीकाचा भटजी प्रार्थना म्हणण्याला

हजर ठेवणें, इत्यादि गोष्टींना वेळ लागतोच. पण मृताचें शेवटचें दर्शन इष्टमित्रांना घेतां यावें याकरितां शव विवक्षित ठिकाणीं बराच काळ ठेवण्याची चाल पाश्चात्य लोकांत आहे.

आ०—सर गंगाराम वर्मा हें नांव हिंदी असतां त्यांच्या कुटुंबांतील संस्कृति महाराष्ट्रीय कशी ?

उ०—सर गंगाराम हे मूळचे हिंदी असले तरी त्यांचें घराणें शेंकडों वर्षे नागपूर प्रांतांतील एका महाराष्ट्रीय जिल्हयांत राहिलेलें होतें. त्यांच्या कुटुंबांतील सर्व लोकांना मराठी भाषा उत्तम येत होती, जशी आपल्या-इकडील गुजराथी, मारवाडी, परदेशी वगैरे वसाहतवाल्यांना येते. या कुटुंबांतील हिंदी लोकांचें म्हणून सगळेंच भाषण हिंदींत घालावयाचें होतें की काय ? म्हणजे सर्व पुस्तकच हिंदी लिहावयास पाहिजे होतें ! आणि समजा, ते लोक घरी हिंदी बोलत असले तरी मला तें मराठींत लिहिल्या-वांचून काय गत्यंतर ? आपल्या इकडील कांहीं मुली हिंदी कवनें म्हणतात तशा सर गंगारामाच्या कुटुंबांतील कुणी मुली मराठी कविता म्हणत असतील किंवा मायदेवांच्या त्या कवितेचें हिंदी भाषांतरहि झालें असेल ! आपल्याला काय माहीत !

आ०—सप्टेंबर महिन्यांत लग्नाचे मुहूर्त कसे ?

उ०—गोदावरीच्या उत्तरेस केव्हांहि लग्नाचे मुहूर्त निघतात.

आ०—मेरीच्या घरचा पत्ता चंदूला माहित नसावा हें कसें ?

उ०—तिचा ठराविक असा पत्ता नव्हता, इत्यादि खुलासा एल्. एन्. पेरीच्या पत्रावरून व ‘पहिली भेट’ या प्रकरणावरून मिळण्यासारखा आहे. मेरीनें मनिऑर्डर मागविली ती मार्बल आर्चच्या पोस्ट ऑफिसाच्या नांवानें ! हें आक्षेपकाच्या ध्यानांत असेलच.

आ०—बंगल्यापाठीमागें मोटेच्या पाण्याचे भाजीपाल्याचे मळे होते असें एके ठिकाणीं म्हटलें असतां दुसऱ्या ठिकाणीं बाग होती असें कसें म्हटलें ?

उ०—मोटेच्या पाण्याखालीं बगीचा व भाजीचे मळे दोनहि एकत्र असूं शकतात.

याबरून आक्षेप किती क्षुल्लक व निराधार आहेत हें दिसून येईल. म्हणून आक्षेपकानें स्वतःच लिहिल्याप्रमाणें ‘ एखादी गोष्ट अगर कादंबरी

वाचतांना त्यांतील मूलभूत उद्देश ध्यानांत घ्यावा. किरकोळ दोष काढीत बसणें ठीक नाहीं.' त्यानेंहि माझ्या या गोष्टींतील मुख्य उद्देश लक्षांत घ्यावा.

या बारीक दृष्टीच्या आक्षेपकाला एक आक्षेप सुचला नाहीं तो मीच सुचवितों. गोष्टीत सन १९४० मध्यें विलायतेंत झालेल्या आय्. सी. एम्. परीक्षेचा उल्लेख आहे. पण वस्तुतः यंदा म्हणजे १९४० सालीं ही परीक्षा घेण्यात आली नाही ! आणि हा आक्षेप मात्र शब्दशः खरा होता. पण करायचें काय ? म्हणतात ना ' जे न देखे रवि तें देखे कवि. ' आणि कवीच काय पण गोष्टी रचून सांगणारे उपद्व्यापी लोकहि !

लौकिक आक्षेपांना हें उत्तर झालें. आता अध्यात्म दृष्टीच्या आक्षेपकाकडे वळतों. हे आक्षेपक श्री. वा. ल. चिपळूणकर वकील, अकोला, हे असून त्यांचा सविस्तर टीका-लेख जनाच्या तसा जून महिन्याच्या सह्याद्रीत छापला आहे. त्यातील कांही आक्षेपांना उत्तर देतों.

आ०—मानसशास्त्राची चर्चा केलेला उपसंहार न लिहितां कादंबरी पूर्ण केली असती तर गैरसमजुत न होती ! बरें, चर्चा केली तर ती सर्वांगीण हवी होती.

उ०—मी ही गोष्ट लिहिली ती केवळ ललित वाङ्मय लिहिण्याची हौस पुरी करण्याकरितां लिहिलेली नाही. तिच्या बोधाचें केंद्र मानसशास्त्रीय अशा एका मुद्यावर आधारलेलें आहे; व त्या मुद्याचीच चर्चा कथानकाच्या रूपाने सर्व गोष्टभर करण्यांत आली आहे आणि गोष्टीच्या रूपाने उदाहरणादाखल मांडलेल्या चर्चेत मीं दिग्दर्शित केलेल्या सिद्धान्ताना मानसशास्त्रावरील ग्रंथातहि आधार मिळतो हे दर्शविण्याकरिता मी अवतरणें इत्यादि देऊन उपसंहार लिहिला. केवळ काहीं ललितवाङ्मय लिहिण्याच्या हौसेने मीं गोष्ट लिहिली असती तर असा उपसंहार दिला नसता. मी काय मानसशास्त्रावर स्वतंत्र ग्रंथ लिहित होतों, म्हणून मानसशास्त्रीय मुद्याची सर्वांगीण साधकबाधक चर्चा करूं ?

आ०—योगायोग म्हणून सकृत्दर्शनीं वाटणारे प्रत्यय वस्तुतः सर्व योगायोगाचेच असतात काय ?

अ०—सर्व प्रत्यय योगायोगाचे असतात असें मीं कोठेंच म्हटलें नाहीं. इतकें व्यापक विधान मी कसें करीन ? मी फक्त इतकेंच म्हटलें आहे कीं, कांहीं निवळ योगायोग अकल्पित रीतीनें घडून येतात, व अशा योगायोगाचा एक परिणाम मनुष्याची बुद्धि मंद किंवा भ्रष्ट करण्यांत होतो. ही गोष्ट खंबीर व चौकस बुद्धीच्या मनुष्याला लागू नाही. पण जगांत खंबीर बुद्धी-पेक्षां दुर्बळ बुद्धीचे लोकच फार आणि असे लोक सुशिक्षित म्हटल्या जाणाऱ्यांतहि आढळू शकतात. हा जो मुख्य मुद्दा व हा स्वतः माझा जो अनुभव तोच गोष्टीच्या रूपानें येथें मीं वर्णिला आहे. मृतांचे संदेश, भविष्यसूचक स्वप्नें, पूर्वसूचना इत्यादि गोष्टींच्या घटनेंत पुष्कळसे योगा-योगच असतात आणि अशा पुष्कळ घटनांना उद्देशूनच मीं लिहिलें आहे. अशा घटनांतील शास्त्रीय म्हटला जाणारा असाहि कांहीं भाग कसा वादग्रस्त असतो, हें चिपळूणकरांना माहीत असेलच. माझी तक्रार इतकीच कीं, मी जीं केलीं नाहीत अशीं अतिव्यापक म्हणजे अतिव्याप्ति करणारीं विधाने माझ्यावर कां लादावी ? मी गोष्टींत वर्णिलेला प्रकार अगदीं सुसंभाव्य आहे आणि लक्षांत ठेवावें कीं, तो एखाद्या चांगल्या सुशिक्षित म्हणविणारासंबंधानेंहि. एरवीं ९०–९५ टक्के बुद्धि शाबूत असते; पण एखादे ठिकाणीं तिला आयब असतो आणि त्यामुळेच कांही सुशिक्षित लोक या कादंबरीतील नायकासारखे वर्तन करूं शकतात.

आ०—कै. विष्णुपंत करंदीकर थिऑसॉफिस्ट यांनी १९१४ सालीं माझ्या घरीं लोखंडाच्या एका बारीक लोखंडी कांबीला पीळ पाडले; यावरून मानसिक सामर्थ्याविषयीं माझी मनोभूमिका अधिक अनुकूल झाली नाहीं काय ?

अ०—होय. कांहीं अकल्पित सामर्थ्याचा एक प्रकार मीं तेव्हां पाहिला व तो मी प्रांजलपणें प्रसिद्धहि केला. पण करंदीकरांनीं असे चमत्कार आणखी किती व कोठें कोठें केले ? किंवा हें विशेष प्रकारचें मनःसामर्थ्य त्यांना होतें म्हटलें तरी त्यावरून काय ठरेल ? तें त्यांचें कृत्य योगा-योगाचें म्हणजे सहज चुकून यदृच्छेनें घडलेलें असें मीं म्हटलें नाहीं. आपणाला अज्ञात अशा अनेक प्रकारच्या शक्ति असतात. पण त्यांचें

प्रदर्शन पाहिलें तरी त्यापासून निघणारीं अनुमानें मर्यादितच असावीं कीं नाहीं ? करंदीकरांनीं केलेला ' चमत्कार ' मीं पाहिला. पण त्यामुळें करंदीकर हे कोणी मोठे योगी होते असें त्यांच्या चरित्रावरून मला कधींच वाटलें नाहीं.

आ०—लेडबीटर यांनीं ' सूक्ष्म दर्शन ' सिद्धीचा उपयोग करून रसायनशास्त्रांतील कांहीं शोध लावले हें काय योगायोगानेंच ?

उ०—ऑकल्ट केमिस्ट्रीचा विषय मला स्वतःला समजत नाहीं. म्हणून मीं रसायनशास्त्राच्या एक दोन प्रोफेसरांना याविषयी विचारलें. पैकीं फर्ग्युसन कॉलेजचे प्रोफ़ेसर कोल्हटकर म्हणतात, " अनेक गोष्टी सांगितल्या असतां त्यांतील कांहीं खऱ्या ठरण्याचा संभव असतो. तेवढ्याच मानानें ऑकल्ट केमिस्ट्रींतील कांहीं भविष्यें बरोबर आहेत. पण त्यांत दिलेल्या कोष्टकांतील पुष्कळ आंकडे चुकलेले आहेत; म्हणून या पुस्तकांतील माहिती सूक्ष्म दर्शनामुळें मिळाली असें मी मानीत नाही. " दुसरे एक प्रोफेसर दि. धों. कर्वे यांनीं जें सविस्तर उत्तर पाठविलें तेंच याखालीं देतों.

" ऑकल्ट केमिस्ट्री ह्या पुस्तकांत १९०८ पर्यंत शास्त्रज्ञांना अज्ञात असलेलीं कांहीं मूलतत्त्वें पुढें सांपडतील असें भविष्य केलें आहे. हीं मूलतत्त्वें म्हणजे

| | परमाणुभार | |
|---|---|---|
| ऑकल्टम् | | ३ |
| मेटा-निऑन | | २२·३३ |
| मेटा-ऑर्गान | | ४२ |
| मेटा-क्रिप्टॉन | | ८३·६६ |
| मेटा-झेनॉन | | १३०·०० |
| मेटा कॅलॉन | | १६९·६६ |
| मेटा–,, | | १७२·०० |
| प्लॅटिनम्–बी | | १९५·२२ |

हीं होत असें वरील पुस्तकाच्या १९१९ च्या आवृत्तींत पृ. २० वर दिलें आहे.

" परमाणूंच्या रचनेवर सध्यां जी माहिती उपलब्ध आहे तीवरून असें दिसतें कीं, प्रत्येक मूलतत्त्व म्हणजे सारख्या रासायनिक गुणधर्मांच्या पण

निरनिराळ्या वजनांच्या परमाणूंचें मिश्रण असतें. उदाहरणार्थ हायड्रोजनचा परमाणुभार (म्हणजे सर्व परमाणूंच्या वजनाची सरासरी) जरी १·००८ असली तरी त्यांत १, २ व कदाचित् ३ ह्या वजनाचे निरनिराळे परमाणु मिश्रित असतात. ह्यांना एकमेकांचे आयसोटोप किंवा एकस्थानीय म्हणतात. निऑन ह्या मूलतत्त्वांत कांहीं २० व कांहीं २२ भाराचे परमाणु आहेत असा शोध ॲस्टननें लावला. त्यालाच मेटा-निऑन म्हणावयाचें असल्यास म्हणावें. ऑकल्टम् म्हणजेच ३ वजनाचा हैड्रोजनचा एकस्थानीय आहे असें म्हणतां येईल; पण ती गोष्ट अद्याप निश्चित नाहीं. कदाचित् २ वजनाचा हायड्रोजनचा परमाणु व १ वजनाचा परमाणु ह्यांच्या संयोगापासून तयार झालेला अणु हाहि तो असूं शकेल. आर्गानचे एकस्थानीय ४० व ३६ वजनाचे आहेत.त्यांत ४२ वजनाचा परमाणु नाहीं,व अर्थात् वरील कोष्टकांतील तें भविष्य खरें ठरलेलें नाहीं.त्याचप्रमाणें क्रिप्टॉनचे एकस्थानीय ८४, ८६, ८२, ८३, ८० व ७८ ह्या वजनाच्या आहेत; त्यांत ८३.६६ वजनाचा परमाणु नाहीं; एवढेंच काय, अपूर्णांक असलेल्या वजनाचा परमाणु जवळजवळ कोणत्याच मूलतत्त्वांत मिळालेला नाहीं. झेनॉनचे ९ एकस्थानीय आहेत. त्यांतील एक १३० वजनाचा आहे व तो वरील कोष्टकांत आहे. कॅलॉन व मेटा–कॅलॉन हीं मूलतत्त्वें कोणचीं हें सरळ प्रयोगांनीं रसायनशास्त्र शिकणाऱ्याला कळणें कठीण आहे; पण त्यांचे परमाणुभार अपूर्णांकयुक्त असल्यामुळें ते कोणत्याही ज्ञात मूलतत्त्वाला लागू होत नसून ते चुकीचे आहेत हें उघड आहे. प्लॅटिनमचाहि १९५.२२ वजनाचा एकस्थानीय नाहीं.

" वरील विवेचनावरून भविष्य वर्तवल्यापैकीं २-३ मूलतत्त्वांचा शोध लागला व बाकीच्यांचा लागला नाहीं हें उघड दिसेल. अज्ञात मूलतत्त्वांच्या अस्तित्वाबद्दल भविष्य वर्तविणे ही गोष्ट 'ऑकल्ट केमिस्ट्री' लाच साध्य होते असें नाहीं. मूलतत्त्वांचा परस्परसंबंध दर्शविणारी 'नियतांतर रचना' ( Periodic Classification ) शोधून काढणारा रशियन शास्त्रज्ञ मेंडेल्येफ ह्यानें एक-बोरॉन्, एक-ॲल्युमिनियम्,व एक सिलिकॉन अशा ३ मूलतत्त्वांच्या अस्तित्वाबद्दलचें व त्यांच्या अनेक गुणधर्माबद्दलचें भविष्य केवळ शास्त्रीय तर्कपद्धतीनें वर्तविलें होतें (१८७५). पुढें १०–१२ वर्षांत हीं तीनहि

मूलतत्त्वें म्हणजे अनुक्रमें स्कँडियम्, गॅलियम् व जर्‌मॅनियम् हीं शोधलीं गेलीं व त्यांचे गुणधर्मंहि मेंडल्येफच्या भविष्याप्रमाणेंच होते. तरीहि मेंडेल्येफला दिव्यदृष्टि असल्याबद्दलचा ओरडा कोणी केल्याचें ऐकिवांत नाहीं.

" खरोखरच दिव्यदृष्टि असेल तर आज ज्ञात असलेल्या शेंकडों निर-निराळ्या परमाणुप्रकारांचें बिनचूक भविष्य वर्तवलें जावयास पाहिजे होतें. पण तें तर वर्तवलें गेलेंच नाहीं; पण उलट वर्तवलेल्या भविष्यांतील कांहीं परमाणु सांपडलेले नाहींत व कांहींची वजनें भविष्यांतील वजनांहून निराळीं आहेत अशी वस्तुस्थिति आहे. "

असो. मी स्वतःपुरतें असें म्हणतों कीं, दिव्यदर्शन शक्ति असलेल्या माण-साला भौतिकशास्त्रांतल्या शेंकडों, हजारों गोष्टींपैकीं एखादी अवचितच अचानकच कां दिसावी ? त्या दृष्टीनें त्या शास्त्राचा सर्वच उलगडा कां न करतां यावा ? मनुष्यामनुष्यांतहि एकापेक्षां एक, शरीराप्रमाणें मानसिक शक्तीनेंहि, अधिक संपन्न व बलवान असू शकतो, ही गोष्ट मी काय म्हणून नाकबूल करीन ? पण त्यामुळें काय सिद्ध होतें ? म्हणजे आपण त्याला किती अंशानें ' दिव्य ' म्हणावें ? किंवा तिच्या प्रासंगिक दर्शनानें किती गांगरून जावें ? आणि विशेषतः ती एक बाब सोडून दिली तर इतर किती बाबतींत त्या शक्तीला शरणचिठ्ठी लिहून द्यावी ? हा प्रश्नच आहे. बिचारे भौतिकशास्त्रज्ञ आपल्या स्फूर्तिला ( Intuition ) 'दैवी' म्हणत नाहींत व स्वतःला योगी म्हणवीत नाहींत इतकेंच काय तें ! मद्रासेंतील अशिक्षित रामानुजन यानें केंब्रिज येथील गणिताच्या प्रोफे-सरांना आश्चर्यचकित करून सोडलें. पण त्या बिचाऱ्याला आपल्या ज्ञानाला दिव्य हें विशेषण लावण्याचें सुचलें नाहीं ! आपल्या ज्ञानाला गूढ स्वरूप न देतां लौकिक व सार्वजनिक असेंच स्वरूप त्यानें मानलें व दिलें. म्हणूनच त्याला कोणी योगी म्हटलें नाहीं. रा. चिपळूणकर यांनीं सम्यक्‌दर्शन, अपरोक्षानुभूति, अन्तःप्रज्ञा, दिव्यज्ञान, आत्मस्फूर्ति इत्यादि इतके अनेक सांप्रदायिक, पण अर्थाच्या दृष्टीनें निश्चित नसणारे शब्द या लेखांत उपयोगांत आणले आहेत कीं ते सर्व जमेस धरून त्यांचें उत्तर देणें कठीण आहे.

आ०——मनुष्य दुःखाच्या प्रसंगांत सांपडला म्हणजे संशोधनाला प्रवृत्त होऊन दुःखाचें कारण शोधून नवीन ज्ञानप्राप्ति करून घेतो कीं नाहीं ?

उ०——कांहीं लोक तसे करतात. पण कांहीं लोक, माझ्या गोष्टीत वर्णन केल्याप्रमाणें मोठे सुशिक्षित असूनहि अकल्पित दुःखानें पराभूत होऊन त्यापुरते दुर्बळ बुद्धीचे, मूर्ख व हास्यापद ठरतात कीं नाहीं ? माझ्या कादंबरीत वरील दोहोंतील पहिली गोष्ट मी कोठें नाकबूल केली आहे ? पण दुसरी गोष्ट स्वतः चिपळूणकर तरी नाकबूल करतील काय ? दुःखांत सांपडलेले किती लोक शुद्ध ज्ञान मिळविण्याच्या मार्गाला लागतात ? व किती लोक अगतिक होऊन गुरुभजनीं लागून आपल्या दुर्बळतेचें प्रदर्शन करितात ?

आ०——चमत्कार करणारे सर्वच लोक रोगट असतात हें म्हणणें चूक आहे

उ०——तसें मीं म्हटलें नाही. मी माझें मत स्पष्ट शब्दांनीं प्रकरण २३ पृ. २२४ यांत दिलें आहे. कोणाहि मनुष्याला ईश्वराच्या उंची मापानें मोजतांना जर त्याच्यांतील हीनपणा दिसून आला तर त्याच्या दैवीपणाची कल्पना टिकत नाहीं. पृ.२४९ व २५० यामध्यें मी या वादाच्या दोनहि बाजू दिल्या आहेत. बरें, साधु म्हटल्या जाणाऱ्या पुष्कळ लोकांत कांहीतरी वेडेपणाची झांक आढळते हें स्वतः चिपळूणकरहि नाकबूल करणार नाहीत. शिवाय खरा योगाभ्यासी कोण, योगी कोण, साधू कोण हें ठरविणें फार कठीण असतें. त्यांत मतभेद होतो. चिपळूणकरांना मॅक्डुगल जेम्स वगैरे युरोपियन लोकांचे आधार घेतलेले खपत नाहींत ! पण सर ऑलिव्हर लॉज इत्यादिकांचे मात्र खपतात ! ९५ दांभिक तर ५ खरे साधु-वृत्त असतात, या गोष्टीवरच माझा मुख्य कटाक्ष आहे हें चिपळूणकर विसरतात.

आ०——ज्ञानेश्वर व टिळक यांचा संवाद कादंबरीच्याच जोडीला कां घातला ?

उ०——हाहि शुद्ध योगायोगच घडला. तो संवाद २० फेब्रुवारी रोजीं मुंबई रेडिओवर वाचण्याकरितां आधींच सह्याद्रीच्या टाईपांत छापून घेतला होता व कादंबरी निम्मी लिहून होण्यापूर्वींच तो लिहिला होता. तो तयार मजकूर मीं मार्चच्या अंकांत घातला इतकेंच. माझीं रेडिओवरचीं सर्व भाषणें सह्याद्रींत आलीं आहेत. तसेंच हें कादंबरींतील मानसचर्चेतील

नास्तिकपणाला उठाव देण्याकरितां हा संवाद घातला हा चिपळूणकरांचा गैरसमज आहे.

आ०--ज्ञानेश्वरांच्या तोंडीं त्यांना अपरोक्षानुभूति नव्हती, त्यांना ब्रह्म-दर्शन नव्हतें, असे शब्द घातले ही चूक आहे.

उ०--ज्ञानेश्वरांना खरोखर ब्रह्मज्ञान असतें तरी विनयानें ते 'नाहीं' असेंच म्हणाले असते. उच्च प्रतीच्या माणसांची कोणी थोरांनीं तोंडावर स्तुति केली म्हणजे ते ती स्तुति म्हणजे तींतील अतिशयोक्ति अशीच पातळ करितात. शिवाय ब्रह्मज्ञान म्हणजे तरी काय, हा मोठाच प्रश्न आहे. ब्रह्मा-परतें कांहीं नाहीं म्हणून ब्रह्माचें ज्ञान म्हणजे संपूर्ण ज्ञान. पण एका ईश्वरा-खेरीज असें संपूर्ण ज्ञान कोणाहि मनुष्याला असेल असें मी मानीत नाहीं. मग तो महाज्ञानेश्वर असो आणि असें म्हणण्यानें मी नास्तिकहि ठरत नाहीं. "An aspectual finite perception of the infinite" इतकाच ब्रह्मज्ञानाचा अर्थ घेतला तर ज्यांना योगी म्हणतां येत नाहीं अशा अनेक श्रेष्ठ गुण-अलौकिक गुण-अंगीं असणाऱ्या, लोकांना ही असते. तात्पर्य, एकदां कोणाला योगी म्हटलें म्हणजे डोळे मिटावे, मान खालीं घालावी, आणि हात उंच करून त्याला सर्वज्ञत्व अर्पण करावें हें मला मान्य नाहीं. ब्रह्मज्ञान, सम्यक्ज्ञान, अपरोक्षानुभूति इत्यादि शब्दांची निश्चित व्याप्ति आपली म्हणून कोणी कोणची सांगेल तेव्हांच त्याच्याशीं याविषयीं वाद करतां येईल. साधारण थोडा अलौकिक गुण कोणाच्या अंगीं दिसला कीं लगेच त्याला ईश्वराच्या पायरीपर्यंत नेऊन बसवावयाचा यावरच माझा कटाक्ष आहे. गुरुसांप्रदायांत गुंडाळलेले पुष्कळसे लोक हें करतात आणि कादंबरींतील नायक चंदू याच्या उदाहरणानें तीच गोष्ट मी समजावून सांगितली आहे इतकाच माझा दोष !

( सह्याद्रि, जुलै १९४० ) न. चिं. केळकर

# पपा, मॅचेस प्लीज ! : : १

ठण-ठण-ठण-ठण-ठण-ठण-ठण-ठण.

टप-टप-टप-टप-टप-टप-टप-टप.

आठांचे ठोके घड्याळांतल्या वाटीवर पडायला आणि चंदूच्या घोड्याच्या शेवटच्या आठ टापा आगाशींतल्या फरशीवर पडायला एकच गांठ पडली.

हा योगायोग विलक्षणच नव्हे काय ? आणि जगाच्या अमर्याद जीवनांत असले योगायोग, किंवा पताकास्थानें, क्षणोक्षणीं पदोपदीं घडून येत असतातच. या क्षुल्लक गोष्टींना ईश्वराचा संकल्प आणून भिडविणें यांत मनुष्याला आपण तत्त्वज्ञान प्रतिपादलें असें वाटतें. पण आपल्या बरोबरीच्या क्षुद्र गोष्टींत ईश्वराला ओढल्यानें का मनुष्य स्वतः मोठा होईल ? घटनांचे अनुप्रास किंवा यमकें जुळविण्यापेक्षां, किंवा त्यांचा ताल संभाळण्यापेक्षां ईश्वराला दुसरीं मोठीं कामें खचित पुष्कळ आहेत.

पण योगायोगाची संभावना मनुष्य भेटेल त्याप्रमाणेंच होते. योगायोग हा भोळ्या मनाला चमत्कार. भित्र्याला बुजगावणें, धीटाला आव्हान, करणाराला मुहूर्त, न करणाराला निमित्त आणि विवेचकाला तर नुसता विनोदविषय होतो !

एखाद्या गांवढळ माणसानें पाण्याची चूळ जमिनीवर थुंकावी, आणि त्यांतूनच एखादी सुंदर चित्राकृति निर्माण व्हावी असें घडूं शकेल. पण चित्रकलेच्या प्रदर्शनांत त्याला कोणी बक्षीस देईल काय ?

पण बा योगायोगा ! तूं आजवर या जगांत किती तरी मनें भ्रमविलीं आहेस ! किती तरी मनें श्रमविलीं आहेस ! चौकांत उभा राहून डावा उजवा हात दाखविण्याच्या विद्येंत निष्णात नसलेल्या पोलिस जवानाप्रमाणें तू निष्कारण किती वाहनांच्या गतीला कुंठित केलें आहेस ? आणि चुकीनें पुढें जाण्याची अनुज्ञा देऊन किती अपघात घडवून आणले आहेस ?

पण पोलिसानें हात दाखविण्याची चूक केली, तरी अगदीं शेवटच्या क्षणींहि अपघात टाळणें चलाख व दक्ष वाहकाला शक्य असतें. ती चलाखी व दक्षता अंगीं नसणारानें उगीच पोलिसाला नांवें ठेवण्यांत काय अर्थ? असो. अशाच एका योगायोगानें या नवलपुरांत काय घडलें पाहूं चला !

* * *

ठण-ठण-ठण ठण-ठण-ठण-ठण-ठण !

टप-टप-टप-टप-टप-टप-टप-टप ! !

नंदभुवनाच्या दगडी बुरजावरचें तें दणकट घड्याळ ! त्यांतल्या प्रचंड पंचरसी वाटीवर यांत्रिक हातोड्याचे ठोके घणघणले म्हणजे निम्मा गांव जागा व्हायचा ! आणि तो टापा टपकावणारा बादल घोडाहि तसाच. नुसता मस्त, रंगेल.चंदूलालानेंच त्यावर बसावें किंवा वाड्यांतल्या म्हाताऱ्या चाबुकस्वारानें. या दोघांच्या शब्दालाच तो मान देई. स्वारगिरी करणाऱ्या इतर कोणाची त्याच्यावर आरूढ होऊन फेरफटका करण्याची छातीच होत नसे.

आज प्रातःकाळच्या प्रसन्न वेळीं चंदूलाल या घोड्यावर बसून रपेटीला गेला होता. तो परत नंदभुवनाच्या बगीचाच्या तोंडापर्यंत दौडतच आला.पण तेथून पुढें चढ लागे. यामुळें आगाशीपर्यंतच्या रस्त्यावरून त्यानें तो दमलेला घोडा पावंडावर चालत आणला. घोड्यालाहि आपली कला दाखवावीसें वाटलें असावें. म्हणून आपल्या पोलादी खुराची टाप फरशीच्या दगडावर दिमाखानें आपटीत तो चालला होता. ऐकणाराला वाटलें असेल कीं कडक आवळलेल्या तबल्यावर एखादा तिरकवाच ऐटीनें थाप मारीत असावा.

आणि खरेखरच योगायोगाची मौज अशी झाली कीं, घड्याळांतील आठांच्या घंटयाचे आठ ठोके आणि बादल घोड्याच्या टापेचे शेवटचे आठ ठोके एकदमच वाजले आणि स्वार आगाशींत येऊन खडा झाला.

चंदूलालनें घोड्याच्या पाठीवरून ऐटींत लीलेनें घसरती उडी टाकली व तोंडासमोर येऊन बादलच्या मानेवर प्रेमानें शाबासकीची थाप मारली. तिचा स्वीकार बादलनेंहि मोठ्यानें फुरफुरून व तोंडांतला फेस उडवून केला.

दोघांनाहि आपण या रपेटीच्या आजच्या कार्यापुरतें कृतकृत्य झालों असें वाटलें असावें.

मोतदारानें घोडा वळवून नेल्यावर चंदुलाल जोत्याच्या पायऱ्यांवर चढला तो बुटाच्या टांचा खडखडवीतच !

या पायऱ्या संपल्या कीं नंदभुवनाचा दर्शनी व्हरांडा म्हणजे सोपा लागे. तो अठरा फूट रुंद व पन्नास फूट लांब इतका प्रशस्त. सगळा तुळतुळीत फरशीनें मढविलेला. जोत्याच्या तोंडाशीं लांबचलाब सुंदर कठडा. दोन्ही टोकांना भिंतींत काढलेल्या वर्तुळाकार कमानी. त्यांत एकेक शोभिवंत कोच. सोप्याच्या मध्यभागीं, दोन माणसें निजतील एवढा झोपाळा पितळी कड्यांनीं वर कडीपाटात अडकवलेला.

या झोंपाळ्यावर बसलेल्या आपल्या वडिलांशीं चंदुलालची पहिली सलामी झडली.

वडील सर गंगाराम वर्मा यांचा नित्यक्रम असा कीं सकाळीं आठ वाजण्याच्या सुमाराला या झोपाळ्यावर ते बसायचे.प्रथम आचाऱ्यानें समोर मांडलेल्या एका उंच चौरंगावर, चहाचीं भांडीं आणून ठेवलीं म्हणजे सरसाहेबाच्या पत्नीनें खुर्चीवर बसून तो त्यांना ओतून द्यायचा, आपण घ्यायचा, आणि दोघांनीं सावकाश गप्पागोष्टी बोलत हास्यविनोद करीत चहापान करावयाचें. त्याप्रमाणें आज तो विधि संपून सर गंगारामांनीं हातातील पेला खालीं ठेवला तों त्यांना पायऱ्या चढून आलेल्या चंदूलालची रम्य मूर्ति दिसली.

चिरंजीवाच्या त्या सुंदर मूर्तीकडे पाहून वडिलांना धन्यता कां न वाटावी ? चोविशींतला तारुण्याचा बहर. उंच पतली अंगयष्टि. श्रमानें कपाळावर घाम फुटलेला. गोऱ्या गोऱ्या गालांवर गुलाबी रंगाची छटा उमटलेली. सकाळींच ताजी श्मश्रू केल्यामुळें चेहऱ्यावर तुळतुळीतपणा आलेला. कमरेखालीं अर्धी पाटलोण व तंग कमरपट्टा. पायांत खूप कमावलेल्या कातड्याचे पातळ चिवट चढाव. अंगांत उत्तड्या छातीचा गडद निळ्या रंगाचा लोकरी शॉर्ट कोट. खिशांतून बाहेर डोकावणारा रंगीत रेशमी हातरुमाल.

बापलेकांची हंसतमुखानें नजरानजर झाली.

" काय चंद्, रपेट झाली कीं नाहीं ठीक ? आजची गुलाबी थंडी फायद्याचीच झाली असेल घोडदौडीला ! बादल इतके दिवस जवळजवळ होता ठाणबंद. मग केलेन् का कांहीं मस्तवालपणाचे चाळे ? " वडिलांनीं आस्थेनें विचारलें.

चिरंजीवांनीं दोनहि हात कमरेवर ठेवले. भिवया किंचित् वर उचलल्या. ठेक्यांत म्हणाले, " तो चाळे करायला कमी करायचा नाहीं पपा ! पण पाठीवर कोण आहे हें त्याला चांगलं ओळखतं. "

" आहे आतां नित्यच दोघांची गांठ म्हणा ! असिस्टंट कलेक्टरला वर्षाचे आठ महिने फिरतीवर काढावे लागतात ना रे चंदू ? घोड्याची आणि स्वाराची दोघांचीहि हौस पुरी होईल. "

" माझा चंदु असिस्टंट कलेगटर ! आणि तो कधीं झाला बाई ! म्हनजे तार आली कीं काय चंद् अेशी एस पास झाल्याची ? " मासाहेबांनीं आश्चर्यानें हनुवटीवर बोट ठेवून विचारलें. त्यांना झालं तरी चंदु आय. सी.एस. परीक्षा पास झाल्याची तार यावी ही इच्छा होतीच. पण त्यांच्या स्वभावांत सावधपणा असे.

" काय वेडी आहे चंद् , तुझी आई ! अग, तार आल्यावर ती गुप्त का राहील ? पण तार यायची शंका कशाला ? आज नाहीं तर उद्यां यायचीच आणि चंदु असिस्टंट कलेक्टर व्हायचाच ! अन् याला उद्देशूनच मी बोललों, आठ महिन्यांच्या फिरतीचं, समजलां मासाहेब ! आहे काय अन् नाहीं काय ! "

चंदुलालचें मत त्याच्या वडिलांसारखेंच होतें. पण तो अधिक कांहीं बोलला नाहीं; नुसता हसला. इतक्यांत त्याला सिगारेट ओढण्याची लहर आली. तो लेटून झोपाळ्यावर बापाशेजारीं बसला. खिशांतून सिगारेट काढलीन्. पण काड्याची पेटी सांपडेना तेव्हां बापाला म्हणाला, " पपा, मॅचेस प्लीज़. " ( बाबा, तुमची आगकाड्याची पेटी द्या पाहूं जरा इकडं ! )

सर गंगारामांनीं खिशांतली आगकाड्यांची पेटी काढली. एक काडी ओढून

मुलाच्या तोंडांतल्या सिगारेटखालीं धरली. चंदूनेंहि तिजवर खुशाल विडी पेटविली आणि कडीपाटाकडे मान करून लीलेनें तोंडांतून वर धूर सोडला.

मासाहेब हें पाहून चकित झाल्या. त्यांना वाईट वाटलें. अगदीं लाज वाटली. म्हणाल्या—

" हें काय पाहतें आहें मी चंदू ? अरे, कांहीं नात्याची मर्यादा संभाळावी ! जनाची लाज धरावी ! तूं उद्यां आय. सी. एस. व्हायचा असलास, नाहीं मोटा गव्हर्नर झालास, तरी काय झालं ? वडिलांच्या मांडीला मांडी लावून विडी ओढणं शोभतं का तुला ? आणि वरती त्यांनाच आगकाड्याची पेटी मागतोस ? आणि तेहि भले आपले स्वतः काडी ओढून तुझी विडी पेटवून देतात ? आहे काय हा सारा पोरकटपणाचा प्रकार ? कुणी पाहिलं तर काय म्हणतील ? "

बापलेक दोघेहि मोठ्यानें हसले. त्या हसण्याचा अर्थ हाच होता कीं या बुरसटलेल्या मताच्या सनातनी ' बिलकुल हिंदू ' स्त्रीची कीव करावी तेवढी थोडीच होईल !

चंदुलालला मासाहेबांनीं केलेला स्वतःच्या धूम्रपानाचा निषेध मनांतून फारसा पटला नाहीं. पण तो स्वतः आत्मसमर्थनालाहि सरसावला नाहीं. त्याचा बापच त्याच्या साहाय्याला धावला.

" अग, तुला चंदूबरोबरच विलायतेला राहायला पाठवीत होतों तेव्हां कां गेली नाहींस ? जातीस तर विलायतेंत बापलेकांचे स्नेहसंबंध किती मोकळ्या मनाचे असतात, परस्परांच्या वागण्यांत स्वतंत्रता देण्याघेण्याची किती उदार बुद्धि असते, हें कळलं असतं. विडी ओढणं हें स्वतःच जर येवढं मोठं पातक किंवा व्यसन, तर मी चिरूट ओढतों त्याची नाहीं कधीं निंदा केलीस ती ? नवराबायकोची बरोबरी होते तशीच चंदुसारख्या, वयांत आलेल्या, कर्ता झालेल्या, मुलाची अन् बापाची ! त्यानं चोरून चिरूट ओढला तरी वास यायचाच ! मग उघडाउघड ओढला तर तो बरा नव्हे का ? त्याच्या वयाचा, विलायतेला, एकहि मुलगा सिगारेट ओढल्याशिवाय राहत नाहीं ! "

" ओढीत असेल ! पण तो असा अगदीं बापाच्या मांडीला मांडी लावून ओढीत असेल, अन् वरती बापाला काडी पेटवायला सांगत असेल, हें मला नाहीं बाई खरं वाटत, मी विलायतेला गेलें नाहीं तरी ! सांग रे चंदु तूंच याचं उत्तर. तुझ्याकडूनच न्याय होऊं दे. "

चंदूनें न्याय काय केला असतां याची कल्पना वाचकमंडळी तुम्ही करालच. पण तितक्यापुरती मजल न नेतां तो हसून म्हणाला, " आई, तुझी तरी मर्यादा मला संभाळूं दे ना ! बाबा म्हणतात तें कांहीं खोटं नाहीं, अन तूं म्हणतेस तेंहि बरोबरच आहे. "

तात्पर्य, हें बोलणें वाढविण्याची इच्छा चंदुलालला नव्हती. त्याला आपल्या आईबद्दल प्रेम व आदर होता. ती चूक असली तरी, तिची चूक लगेच तिच्या पदरांत घालून, तिला दुखवून खजील करावी ही गोष्ट त्याला आवडणारी नव्हती. म्हणून त्यानें आवरतें घेतलें. थोड्या वेळानें ' वेल ! अच्छा ' असें म्हणून तो उठला. हातांतलें विडीचें थोटूक अंगणाकडे फेकून देऊन त्यानें सरळ जिन्याची वाट धरली.

मुलगा आतां जवळ नाहीं यामुळें नवराबायको अधिक मोकळ्या मनानें बोलूं लागलीं. पण समंजस मासाहेबांनीं वादाच्या मुद्याला बगल देण्याकरितां दोघांनाहि सारखीच प्रिय अशी तिसरीच एक गोष्ट काढली.

" खरंच, चंदु पास झाल्याची तार आल्यासारखं आपण मगाशीं बोलला, म्हणून विचारलं हो ! आहे का कांहीं खरंच तारेचा सुगावा ? होऊं दे बाई एकदांचा तो पास. म्हणजे माझा नवस फेडायची मी तयारी करीन अन् तो पास झाला म्हणजे त्याला एकदम नोकरीवर रूजू व्हावं लागेल, नाहीं का ? अन नोकरी म्हटली म्हणजे परतंत्रपणा. कुठं नेमतील तिथं गेलं पाहिजे. पण नेमीनात का कुठंहि ! जगाच्या पाठीवरच नेमतील. " समजूतदार माणसें आपल्या शंकांचें समाधान होतां होईतों आपलें आपणच करितात.

" मग तूं जाणार कीं नाहीं त्याच्याबरोबर राहायला ? त्याचा संसार थाटून द्यायला ? " पतिराजांनीं विचारलें.

" हो, मला गेलंच पाहिजे कीं ! मुलाचा पहिला संसार थाटून देणं हें

आईचं कामच नव्हे का ? पण ठरल्याप्रमाणं त्याचं लग्न करून टाकलं म्हणजे तो संसार थाटून देण्याचं माझं काम बरंच कमी होईल बाई. त्याची भावी बायको, रायबहादूर शामलालजींची मुलगी शरयू, कांहीं कमी हुषार नाहीं. पण ती कशीहि सुग्रण असली तरी मी आपली पहिल्या खेपेला त्यांच्याबरोबर जाणारच हो ! मला गेल्याशिवाय राहवायचंच नाहीं. पण आपला बेत काय?"

"अग, आय्. सी. एस्. मुलगा नोकरीवर निघाला म्हणजे त्याच्या-बरोबर आईनं जाणं एक वेळ चालेल. कारण तें कुणाला दिसून पडत नाहीं. पण बापानं जाणं शोभणार नाहीं. त्याचं असं आहे बघ ! चंदू असिस्टंट कलेक्टर म्हणून त्याचा स्वतःचा सरंजाम थाट हा असणारच. पण मासाहेब, मलाहि सरकार-दरबारीं मान्यता आहे बरं का, माझी म्हणून ! मला 'सर' ही पदवी आहे. माझाहि सरंजाम थाट असणारच ! चंदू आय. सी. एस्. असला तर मी आय. सी. एस्. चा बाप आहें ! होय कीं नाहीं मासाहेब ?"

सर गंगाराम खूप मोठ्यानें खदखदां हंसले. त्यांना आपण मोठी कोटी केली, एक मोठें सुभाषित निर्माण केलें, असें वाटलेंच. पण त्या सुभाषि-तांतून आत्मप्रौढीचा जो ध्वनी निघाला तो त्यांना त्या सुभाषितांतील वाङ्मयाहून अधिक प्रिय होता.

"अहो मासाहेब, एका म्यानांत दोन तरवारी कशा मावणार ? चंदू उद्यां असि. कलेक्टरच काय, पण कलेक्टर कमिशनर होणार ! त्याला स्वतंत्रपणानं रुबाबदारीनं रहायला आतांपासून शिकलं पाहिजे."

"अन् त्याचे वडील त्याच्याजवळ राहिल्यानं त्याचा रुबाब काय बिघडेल?"

"बिघडेल तर ! मी समोर गेलों अन् तो लोळत असला कोचावर, तर त्याला अदबशीरपणें उठून बसावं लागेल आणि हें लोकांनीं पाहिलं म्हणजे त्याच्या साहेबीचा साहेबपणा कुठं राहिला ? अग, आय्. सी. एस. म्हटला म्हणजे त्यानं असं वागलं पाहिजे झोकांत बेगुमानपणं, सगळ्या लोकांच्या दृष्टीनें, कीं जगांत त्याला वरचढ असा कोणी नाहीं, अन् तूं ही अशी अडाणी; रागावूं नका हां मासाब, कीं चंदु विडी ओढतांना मला दिसला

चार लोकांदेखत, कीं त्यानं विडी फेकून देऊन लाजलं पाहिजे असं तूं म्हणणार ! अशानं प्रतिष्ठा कशी राहते ? कळलं तुला त्याची विडी मीं काडी ओढून कां पेटविली ती ? तसंच दुसरं. आतां त्याचं लग्न होऊन त्याची बायको त्याच्याबरोबर गेली म्हणजे तीं दोघं हातांत हात घालून हिंडणार– केव्हा खांद्यावर खांदा टाकणार–आम्ही कुणी त्याच्या घरीं दारीं असलों म्हणजे त्यांना चोरीच कीं नाहीं ? म्हणून मी म्हणतों कीं चंदू नोकरीवर गेला म्हणजे तूं त्याच्याकडे राहायला जाऊं नको आणि जाशील तेव्हां मी तरी तुझ्या बरोबर जाणारच नाहीं. त्याचा पाहिला संसार मांडून देण्याचं निमित्त करून तूंहि पण जाऊं नयेस हें बरें ! मर्यादा संभाळण्याची कदर तुझी माझ्याहून अधिक. अपमान होण्याच्या संकटांत स्वतःला आधीं घालायचं, अन् मग अपमान झाला म्हणून रागवायचं ! एवढा कुणी सांगितला आहे द्राविडी प्राणायाम ? ”

“ तें कांहीं नाहीं. मी जाईन त्याच्याबरोबर. माझी मर्यादा कशी संभाळावी हें तरी चंदूला कळतं बरं का ! मघाशींच नाहीं का पाहिलंत ? ”

“ जा, जा, खुशाल जा. पण माझ्या दृष्टीला काय वाटलं तें मीं आपलं सांगितलं. पण तुझंहि बरोबरच आहे. अपमान केलान् चंदूनं तर सोसशीलहि. लहानपणीं अंथरुणांत मुलांच्या लाथा खाल्लेल्या आईला आवडतात, तशाच मोठेपणीं. पण आम्हा पुरुषांचं तसं नाहीं. ”

“ ठीकच आहे. पण मुलानं अपमान करण्याच्या सगळ्या गोष्टी दूरदृष्टीनं आधींच लक्षांत आणून त्याला त्या माफ करण्याचं शिक्षण दिलं, म्हणजे मग कशाला होतो आहे अपमान बापा-पुरुषांचा ? आपण काडी ओढून त्याची विडी पेटवितां हा त्या शिक्षणांतलाच एक धडा असला पाहिजे. उद्यां आपल्याबरोबर त्याच्याहि हातांत ग्लास देऊन, आपल्याजवळ बसवून, द्याल त्याला तांबडं पाणी प्यायला. पण जाऊं दे कीं, आधीं तो पास झाल्याची तार येऊं दे, मग पुढच्या गोष्टी ! ”

नवराबायकोचा वाद संपला. सर गंगारामांनीं चिरूट शिलगावला. थट्टेनं

म्हणाले, " काय ग, मला तंबाकू ओढूं नको असं म्हणत नाहींस हें तरी भाग्यच म्हणायचं ! "

" हो हो ! मी पुष्कळ म्हणेन. पण बायकांचं ऐकलं तर नवऱ्यांचा नवरे-पणा कुठं राहिला ? आपणहि या घरचे आय. सी. एस्च कीं नाहीं ? माझ्यापुढं आपण नमतं घेतलं असं लोकांना दिसलं तर मग आपली अब्रू काय राहिली ? बाकी मी उद्यां चिरूट ओढायला लागलें तर मात्र आपण काय म्हणाल कुणाला ठाऊक हो ! " असें म्हणून मासाहेब हसल्या.

सरसाहेबांना हा मार्मिक विनोद आवडला. त्याची परतभेट देण्याकरिता आपल्या तोंडांतला चिरूट काढून त्यांनीं मासाहेबांपुढें धरला. म्हणाले, " मी काय म्हणेन तुझ्या चिरूट ओढण्याला हें पाहायला लांब जायचं काय कारण ? लग्नांत आपण एकमेकांच्या उष्ट्या विडय़ा तोडल्याच कीं नाहीं ? त्या आतां ओढ्ं म्हणजे झालं ! आपल्या लग्नाची ज्युबिली साजरी करण्याची वेळ जवळच आली आहे, नव्हे का ? "

पण ' इश्श ' इतकंच म्हणून मासाहेब रागावून झटकन घरांत निघून गेल्या.

ʘ ʘ ʘ

## सर गंगाराम आणि कंपनी : : २

सर गंगाराम वर्मा हे सागर प्रांतांतले एक मोठे जमीनदार होते. कांहीं जमीनदारी वडिलार्जित, तर कांहीं त्यांनीं स्वतः संपादिली होती. सालिना उत्पन्न पन्नास हजार अविच्छिन्न होतें. नवलपूरचा त्यांचा रहाता वाडा जुना नवा दोन्ही प्रकारचा होता. मागच्या तोंडाला वेशीसारखा भक्कम दरवाजा, तटाची भिंत, आणि बुरूज; तर पुढच्या तोंडाला कलाकुसरीचे खांब, शोभि-वंत कमानी, मेहरपीचे दिवाणखाने आणि नव्या पद्धतीच्या आगाशीवरच्या बुरुजावर सगळ्या गांवाला दिसेल एवढें मोठें घड्याळ. पुढच्या तोंडची बाग

अगदीं आंखीव रेखीव विलायती पद्धतीची. पण मागच्या बाजूला मोटेच्या पाण्यावर होणारे भाजीपाल्याचे वाफे.

सर गंगाराम यांचें शिक्षण बेताचेंच. संभाषणापुरतें इंग्रजी ते पढले होते. पण त्यांतहि गमतीच्या चुका करीत आणि त्यांच्या चुकांचा मानसिक आनंद लुटण्याकरितां, लुच्चे साहेब लोक त्यांना संभाषणाच्या नादीं मुद्दाम लावून असे विषय काढीत कीं, त्यांनीं भलतेच इंग्रजी शब्द बोलून स्वतःला हास्यास्पद करावें. पण सरसाहेबांच्या राजभक्तीमुळें त्यांना इंग्रजी भाषेंतल्या चुकांप्रमाणें जमीनदारीच्या वहिवाटींतलेहि कांहीं कांहीं अपराध माफ असत.

सर गंगाराम याचें घर म्हणजे तें एक ' मोफत हॉटेल ' च होतें. त्यांत मुख्यतः उतरणारे पाहुणे म्हणजे त्या विभागाचे सर्व प्रकारचे सरकारी अधिकारी. त्या सर्वांची उत्तम बडदास्त ते ठेवीत आणि या कामीं कितीहि खर्च झाला तरी जुमानीत नसत.

त्यांना कुटुंबांतला गोतावळा असा फारसा नसे. त्यांचें कुटुंब मासाहेब, एकुलता एक मुलगा चंदूलाल, आणि एकुलती एक मुलगी बिम्बा ! इतकीं तीनच खास घरचीं अशीं माणसें असत. त्यांना गरीब नातेवाईकांचा गोतावळा कांहीं होता. पण तो सरसाहेबांना भिऊन दूरदूरच राही. कारण त्यांच्या याच्या राहणींत फार फरक आणि गरीबांचें दैन्य पाहून त्यांची कींव करण्याऐवजीं उलट त्यांच्यावर रागावण्याचा स्वभाव सर गंगाराम यांचा असे. एखादे वेळीं लहर लागली तर ते आपल्या गरीब नातेवाईकांना पैशाची थोडीबहुत मदत करीत. पण ती म्हणजे स्पर्श टाळण्याकरितां भिकाऱ्याच्या पदरांत दुरून अन्न टाकावें त्याप्रमाणें. या त्यांच्या तऱ्हेवाईक स्वभावामुळें त्यांचा हेवा व द्वेष करणारे कांहीं नातेवाईक असत. पण ते यांच्या वाऱ्यालाहि उभे राहात नसत. तात्पर्य, अशा रीतीनें घरगुती पाहुण्यांचा उपद्रव सर गंगाराम यांना मुळींच नसे. यामुळें आपलें सर्व लक्ष अधिकारी पाहुण्यांवर खर्च करण्याला त्यांना सवड सांपडे.

बिनपाऊसकाळच्या दिवसांत खालच्या सर्कल इन्स्पेक्टरपासून वरच्या कमिशनरपर्यंत सर्वांची हजेरी त्यांच्या वाड्यांत वर्षांतून एखाद वेळ तरी

लागावयाची आणि यांपैकीं प्रत्येकाचा सत्कार ज्याच्या त्याच्या योग्यते-प्रमाणें करण्याकरितां सर्व प्रकारच्या नोकरांचे वेगवेगळे संच किंवा सट तयार असत. पांच वर्षांतून प्रान्ताचा गव्हर्नरहि एखादे वेळीं, त्या बाजूनें जातांना, चहाच्या वेळीं त्यांच्या वाड्यांत अर्धा तासभर थाबे. पण तेवढ्या-करितां त्यांचे २।३ हजार रुपये तरी खर्च होत.

त्यांना लहानपणापासूनच सरकारी पट्ट्यांची प्राप्ति होत गेली आणि 'मी अवघ्या वीस वर्षांच्या अवधींत रावसाहेबापासून सर झालों' असा आपला पराक्रम म्हणून ते सांगत. केव्हांहि आपल्या उपयोगी पडणारा राज-निष्ठेचा इतका साठा सर गंगारामांच्या रूपानें आपल्या पदरीं असल्यावर 'सर' हीं दोन अक्षरें त्यांना बक्षीसादाखल देण्याला सरकारला कांहीं फार महाग पडत नव्हतीं. कारण वेळींवक्तीं ही पन्नास हजार रुपये उत्पन्नाची मातबर जमीन-दारी, तींतील प्रत्येक पैशागणिक व माणसागणिक आपली आहे असें प्रान्ताच्या सरकारला विश्वासानें वाटे.

सरसाहेबांच्या पत्नी मासाहेब या जुन्या बाळबोध वळणाच्या होत्या आणि सरसाहेब हे स्वतः सनातनी धर्माला न जुळणारीं अशीं काहीं कृत्यें करीत असले तरी, आपल्या पत्नीच्या धार्मिक व्यवहारांत ते आड येत नसत आणि या सहिष्णुतेचा मोबदला म्हणून मासाहेबहि आपले पति काय खातात, पितात, किंवा इतर कोणाच्या संगतींत काय करतात, याकडे दुर्लक्ष किंवा कानाडोळा करीत. जशीं कांहीं हद्दीला हद्द चिकटलेलीं दोन गृहराज्येंच ! मागें या वाड्याच्या वर्णनांत दोन भाग पडलेले सांगितले. त्यांतला अगदीं पुढचा म्हणजे सोप्याच्या माडीवरचा भाग हें सरसाहेबांचें राखीव टालन असे. मासाहेबांचा प्रवेश त्यांत, गोकुळ अष्टमीच्या दिवशीं कथाकीर्तन होई त्याखेरीज एरवीं सबंध वर्षांत होत नसे. उलट सरसाहेबहि वर्षांतून तीनशें चौसष्ट दिवस देवघराला पारखे असत. जुन्या पद्धतीनें श्राद्ध होईल त्या दिवशीं त्यांचे पाय एक दिवस देवघराला लागावयाचे.

सरसाहेबांची मुलगी बिम्बा ही बुद्धीनें तरतरीत. ती कधीं शाळेंत गेली नव्हती. तथापि तिला घरीं शिक्षक ठेवून इंग्रजी लिहिणें-वाचणें, संभा-

षण करणें, गाणें बजावणें, कलाकुसरीचीं हातकामें करणें इत्यादि सर्व विद्या शिकविल्या होत्या. मासाहेब केव्हां पडदा ठेवीत, तर केव्हां काढीत. पण बिम्बेनें पडदा कधींच संभाळला नाहीं. बापाची लाडकी लेक म्हणून तिला त्यांच्याजवळ केव्हांहि प्रवेश असे. कांहीं प्रसंगीं ती आपली हौस म्हणून बापाच्या कचेरींत येऊन बसे, तर कांहीं प्रसंगीं बापाची हौस म्हणून तिला मुद्दाम पाचारण करण्यांत येई आणि घरांतील दाखविण्यासारखी हीहि एक सर्वोत्तम वस्तु अशा भावनेनें, सर गंगाराम हे प्रतिष्ठित पाहुण्यापुढें तिला आणवून बोलवून तिचें कौतुक करीत. त्यांत पुष्कळ वेळां मौज मात्र अशी होई कीं सर गंगाराम यांच्यापेक्षां इंग्रजी शुद्ध बोलण्याची कला बिम्बेलाच अधिक साधत असे. यामुळें त्यांच्या भाषणांतील चुका सुधारून घेण्याचा प्रयत्न ती करी. पण तो फसे, तेव्हां तिला आपली लाज आवरण्याचें मोठें संकट पडे !

बिम्बा वीस वर्षांची झाली तरी तिच्या लग्नाचा विचार सर गंगाराम यांनीं केला नव्हता. बहुतेक सर्वच गोष्टींत आपल्या कुळापेक्षां विलायतचें खूळ त्याना अधिक मानवत असल्यामुळें त्यांनीं मुलीचें लग्नहि उशिरा आणि तें देखील स्वयंवर पध्दतीनें करविण्याचें ठरविलें होतें.

मासाहेबांना या कामीं तिच्या वडिलांपेक्षा अधिक भेदक दृष्टि होती. तिचें लग्न लवकर झालें तर तें त्यांना हवें होतें. पण तो बेत अंमलांत आणण्याला प्रतिकूल कारणेंच पुष्कळ. या कामीं मुख्य खटपट करणारे सर गंगाराम उदासीन. मासाहेबांना या किंवा बाहेरच्या प्रांतीं, आपल्या तोलाचे कुमार किंवा राजपुत्र किंवा जमीनदार लग्नाचे कोण आहेत ही माहिती कशी होणार ? शिवाय स्वयंवराच्या तत्त्वाची घोषणा सर गंगाराम यांच्याकडून होत असल्यामुळें, आईबापांच्या अधिकारानें हें लग्न न होणारें असेंच ठरून गेलें होतें !

आणखी एक अडचण ही होती कीं, घरचा एकुलता एक मुलगा, म्हणजे बिम्बेचा वडील भाऊ चंदुलाल, हा विलायतेंत शिक्षण घेण्याला गेला असल्यामुळें, तो आल्यावर जुळेल त्याप्रमाणें दोघांचींहि लग्नें एकदम करून

मोकळें व्हावें हा विचार सहजच सुचणारा ! आणि खरें बोलावयाचें तर आणखीहि एक प्रतिकूल कारण होतें.तें असें कीं मासाहेबांना आपली आवडती मुलगी शक्य तितके दिवस आपल्याजवळून जाऊं नये असेंहि मनाच्या आंतल्या कोपऱ्यांत प्रेमामुळें वाटत होतें !

चंदुलाल हा आज चार वर्षे विलायतेंत ऑक्स्फर्ड विद्यापीठांत शिक्षण घेत होता. तो अत्यंत बुद्धिमान आणि विद्येचा हौशी असल्यामुळें, विद्यापीठाची एम् . ए. ची पदवी, बॅरिस्टरीची परीक्षा, आणि इंडियन सिव्हिल सर्व्हिसची परीक्षा, हीं तीन ध्येयें त्यानें आपल्या डोळ्यांपुढें ठेविलीं होतीं. विलायतेंतील श्रेष्ठ विद्यापीठांतील अभ्यासक्रमाची, अभ्यासविषयांची नुसती ओळखहि सर गंगाराम यांना नव्हती. पण त्याच्या ज्ञानाची उणीव त्यांच्या महत्त्वाकांक्षेनें भरून काढली होती. ही महत्त्वाकांक्षा म्हणजे घरचा मुलगा आय्. सी. एस्. व्हावा !

त्यांनीं आपल्या प्रान्तांत आय्. सी. एस्. च्या अधिकाऱ्याचें वैभव डोळ्यांनीं लहानपणापासून पाहिलेलें आणि आय्. सी. एस्. चा अधिकार आणि जमिनदारीचा अधिकार हे संगीतांतील वादी-संवादी स्वराप्रमाणें त्यांना वाटत असल्यामुळें, चंदुलालला पाळण्यांत घातल्या दिवसापासून त्याला विलायतेला पाठवून आय्. सी. एस्. करून आणण्याची इतकी प्रबळ इच्छा त्यांनीं धारण करून ठेवली होती कीं, आपल्या जन्मांतलें तेंच एक मुख्य कर्तव्य असें त्यांना वाटे.

सुदैवानें मुलगाहि बुद्धिमान आणि शिक्षणाभिलाषी मिळाला. पैशाला तर कांहीं तोटाच नव्हता ! सर गंगाराम यांनीं विलायतेंत त्याला अशा थाटानें ठेवलें होतें कीं, चंदुलालचे सोबती त्याला ' प्रिन्स ऑफ नवलपूर ' असें म्हणत. नोकरी करण्याला चाकर मनुष्य, बसायला घोडा, राहायला स्वतंत्र फ्लॅट, दर वर्षी सुटीच्या दिवसांत युरोपांत नव्या नव्या ठिकाणीं प्रवासाची सफर, मित्रमंडळींना देण्याच्या जाफ्ती व मेजवान्या, या सर्वांना लागेल इतकी रक्कम सर गंगाराम यांनीं चंदुलालच्या नांवानें बँकेंत आगाऊ भरूनच ठेवलेली असे.

योजलेल्या अभ्यासक्रमांत मधून मधून यश येई. त्याचे दाखले चंदुलाल आपल्या बापाकडे पाठवी. पण त्या दाखल्याची किंमत ओळखण्याचें ज्ञान सरसाहेबांना नसल्यामुळें, ते राजधानीच्या शहरीं जाऊन आपल्या युरोपियन अधिकारी मित्रांना ते दाखले दाखवीत. त्यांना मात्र त्या दाखल्यांचें महत्त्व लक्षांत येई, आणि ते जेव्हां सरसाहेबांचें खूप अभिनंदन करीत, तेव्हां पदरांत धन्यतेचें गाठोडें घेऊन ते नवलपुरास परत येत. अखेर आय्. सी. एस्. ची लेखी व तोंडी परीक्षा झाली आणि आपण 'बहुधा पास होणार' अशी तार चंदुलालकडून घरीं आल्यावर, सर गंगाराम यांनीं मुलाच्या स्वागताची सर्व सिद्धता केली. चार वर्षांनीं मुलगा भेटणार म्हणून मासाहेबांना, आणि भाऊ भेटणार म्हणून बिम्बेला, अतिशय आनंद झाला. सर गंगाराम यांनीं सगळ्या राहत्या वाड्याची साफसुफी केली , आणि भावी मनोराज्याचेहि नवे वाडे बांधण्याला प्रारंभ केला !

पहिल्या प्रकरणांत वर्णन केलेला प्रसंग घडला त्याआधीं चंदुलालला विलायतेहून परत येऊन सुमारें वीस पंचवीस दिवस झाले होते. आय्. सी. एस्. च्या निकालाची तारीख इतक्यांतच चार-दोन दिवसात होती. यामुळें घरच्या सर्वांचें सगळें लक्ष त्याकडे लागून राहिलें होतें. पण त्यांतल्या त्यांत चंदुलालला तोंडी परीक्षेच्या अदमासावरून आपण पास होण्याची खात्री वाटत असल्यामुळें, बाकी मंडळी किंचित सचिंत असतां तो मात्र निश्चिंत असे आणि आईबापांची व बहिणीची काळजी कमी करण्याकडे आपल्या ख्यालीखुशालीची भर घाली. चार वर्षांपूर्वीचे जुने मित्र व क्रीडादिकांचे जुने कार्यक्रम त्यानें पुनरुज्जीवित केले. फक्त त्याच्या जाण्यायेण्यांत फरक पडला तो रायबहादुर शामलाल यांच्या घरासंबंधानें.

चार वर्षांपूर्वीं असा एक विचार निघाला होता कीं, रायबहादुराची मुलगी शरयू इचा चंदुलालाशीं विवाह होऊन मगच त्यानें विलायतेला जावें. कांहीं आकस्मिक कारणानें आयत्या वेळीं तो बेत रहित करावा लागला. पण चंदुलाल परत आल्यावर तरी तो विवाह होणारच अशा समजुतीनें दोन्ही कुटुंबें एकमेकाशीं वागत होतीं. बिम्बा व शरयू या बाळपणच्या

मैत्रिणीच. पण भावी नात्याच्या संबंधानें त्या मनानें अधिक जवळ आल्या असून, पुढचें नातें आधींच वसूल करून घेतल्याप्रमाणें त्या वागत.

पण चंदुलालच्या वागण्यांत मात्र चार वर्षांपूर्वींसारखा जिव्हाळा आतां राहिलेला दिसत नव्हता. ही गोष्ट सहज दिसून पडण्याइतकी प्रगट नव्हती; पण सूक्ष्म दृष्टीच्या माणसाला ती दिसल्याशिवायहि राहिली नसती. गेल्या दोन आठवड्यांत चंदुलाल रायबहादुरांच्या घरीं बोलावणें नाकारतां येईना म्हणूनच, चारदोन वेळ चहाला व एकदां भोजनाला गेला. उलट रायबहादुरांच्या कुटुंबीयांनींहि सरसाहेबांच्या घरीं तशाच परतभेटी दिल्या होत्या. पण लग्नाच्या गोष्टी निघाल्या म्हणजे त्यांत चंदुलालचा संबंध यावयाचा, आणि त्या निघाल्या म्हणजे मात्र तो किंचित् ओठ दाबून बोले व आपलें मनोगत निःसंदिग्धपणें प्रगट करीत नसे.



## चंदूची शिकार : :

पहिल्या प्रकरणांत सांगितलेल्या प्रसंगानंतर सुमारें अर्ध्या तासानें साडेआठ वाजतां, चंदुलाल पोषाख बदलून माडीवरून खालीं उतरला. त्याच्या तोंडांत सिगारेट व उजव्या हातांत शिकारी बंदूक ( शॉटगन ) होती.

मागच्या बाजूला अंगणांत उतरल्यावर त्यानें मोठमोठ्यानें हाका मारण्यास व शिव्या हासडण्यास सुरुवात केली. प्रथम वाड्याचा व्यवस्थापक पुढें आला.

" क्यों बंकट ! मी सांगितल्याप्रमाणं माझ्या निजण्याच्या खोलीची व्यवस्था केली ? "

" होय सरकार. "

" काय केली सांगा पाहूं. "

" छपरी पलंग एकाऐवजीं दोन घातले. दारांना-खिडक्यांना पडदे लावले. तसबिरी सांगितल्याप्रमाणें हारीनं लावून ठेवल्या. भिंतीचा जुना रंग काढून

नवा अस्मानी लावला. झुंबरांत मेणबत्त्या घातल्या. विजेच्या दिव्यांत ग्लोब घातले आणि पंखा चालू केला."

आणि इतक्या दुरुस्त्या करायला सांगितल्या त्या करायला सांगण्यांत धन्याला आपली चूक वाटूं नये म्हणून वंकट म्हणाला, "सरकार विलायतेला गेल्यापासून त्या खोलीकडं लक्ष दिलं होतं कुणी? सदा कुलूप पडलेलं. मी मुद्दाम महिना पंधरा दिवसांनीं कुलूप काढून झाडून जागा साफसूफ करवून घेई. आपण सांगितल्या त्या सगळ्या दुरुस्त्या करणं योग्यच होतं आणि त्या करण्याला खर्चहि म्हणण्यासारखा लागला नाहीं."

"खर्चाचं कुणी म्हटलं आहे म्हणा! पण सांगितल्याशिवाय करायला सुचूं नये हें कांहीं चांगलं लक्षण नाहीं व्यवस्थापकाचं."

"तसं नव्हे सरकार! पलंगाच्या जोडीसुद्धां सगळं कांहीं मला सुचलं होतं आणि मी करणारहि होतों तें. पण मासाहेब म्हणाल्या, धनी लवकरच विलायतेहून येणार आहेत. ते आल्यावर सांगतील तसं कर. काय व्हायचं तें एकदम त्यांच्या मनासारखंच झालेलं बरं. नाहीं तर आज एक कराल आणि उद्यां तें बदलून दुसरं करावं लागेल."

"ठीक आहे. यापुढं आणखीहि व्यवस्था कांहीं कांहीं त्या खोलींत लागेल. ती सांगेन तशी करा."

दहा वीस पावलें पुढें गेल्यावर एका तुळशीवृंदावनाकडे बोट दाखवून चंदूलाल म्हणाला, "दिवाणजी, हें हेंगाडं उठाणू मी विलायतेला जाण्यापूर्वीं इथं होतं?"

"नव्हतं सरकार; पण तुळशीला पाणी घालायला सोईचं पडावं, माजघरांतून बाहेर पडल्याबरोबर म्हणून, मासाहेबांच्या सांगण्यावरून तें वृंदावन इथं बांधण्यांत आलं."

"डॅम दॅट वृंदावन! या अंगणाच्या कोपऱ्याची शोभा घालवितं सगळी आणि निजायच्या खोलींतून बाहेर डोकावणाराला ही काय रानटी तुळसच दृष्टीस पडावी? तें कांहीं नाहीं. उद्यांच्या उद्यां तें पाडून टाका, आणि त्याच्या जागीं रातराणीचं झाड लावा."

दिवाणजी फिकीरींत पडले. पुटपुटत म्हणाले, " तें पाडून टाकण्याच्या आधी मासाहेबांना एकदां विचारलेलं बरं नव्हे का ? "

" कांहीं नको विचारायला तुम्ही. मी सांगेन त्यांना काय सांगायचं तें. असल्या किरकोळ कामाला जर असे उलटे सुलटे सवाल जबाब लागूं लागले, तर कामं लवकर उठणार कशीं ? असं करीत नाहीं कुणी विलायतेंत. "

" ठीक आहे सरकार ! " दिवाणजींनीं खालीं जमिनीकडं पाहात उत्तर केलं.

बागेच्या कंपाउंडाची भिंत एका टोकाला थोडीशी ढासळलेली दिसली. फार नाहीं, फक्त दहापांच दगड उसकटून खालीं पडले होते. त्याकडे हात दाखवून चंदुलाल म्हणाला, " आणि हें काय कुणीं केलं ? "

" केलं नाहीं; पण झालं आहे सरकार. "

" समजलं मला. त्याचाच बाप तो. पण झालं म्हटलं तें तरी झालं कसं ? माझ्या घरांत 'होणारानं' हि जपून वागलं पाहिजे, बरं का दिवाणजी ! "

"होय सरकार. पण या पडझडीचं खरं कारण असं कीं घरच्या गोठ्यां-तले बैल फार रगेल झाले आहेत. इकडून गाडी नेतांना वळणावर खुशाल धक्के देऊन जातात. त्यामुळं कोसळला हा भिंतीचा कोपरा थोडासा. आहे माझ्या लक्षांत तें. गवंड्याला कालच वर्दी दिली आहे मी तो कोपरा बांधून घ्यायला. "

" पण गवंडी पुनः पुनः किती वेळ तेंच काम करील ? बैल रगेल झाले तर त्यांचा खुराक तोडा. "

" मीं तसंच सांगितलं होतं. पण—"

" पण काय ? ज्याला त्याला पण !"

" पण मासाहेबापर्यंत तें प्रकरण जाऊन त्यांनीं रागावून सांगितलं कीं, गोठ्यांतलीं जनावरं माझीं लेकरं आहेत. त्यांचा घास तोडण्याचं पातक कोणीहि करतां कामा नये. "

चंदुलाल हंसून म्हणाला, " वा रे आमच्या मासाब ! मला एकदम किती

तरी भाऊ बहिणी मिळाल्या. कारण गोठ्यांतलीं सारीं जनावरं माझीं भावंडं !"

दिवाणजी आज्ञाधारक सेवक खरा. पण मासाहेबांच्या पश्चात् त्यांची अशी टवाळी, त्यांच्या भावनेचं असं पावित्र्यविडंबन केलेलं त्यालाहि आवडलं नाहीं. तो तोंडाला पदर लावूनच बोलला; पण म्हणाला, "मासाहेब मायाळूच आहेत तशा. किडामुंगीचाहि घास त्यांना तोडवत नाहीं. त्या म्हणतात, जो तो आपल्या नशीबानं खातो."

"पण दिवाणजी, त्यांना माहीत नाहीं कीं जें नशीब खाऊ घालतं तेंच एखादे दिवशीं त्या खाणाऱ्याला काळाचा घास म्हणून त्याच्या तोंडांत नेऊन वाढील कीं ! समजा, गोमांसाची आवड लागलेल्या एखाद्यानं या गोठ्यांतला चांगलासा बैलच मारविला तर ?"

हे शब्द अैकून दिवाणजींनीं खंतीनें मान फिरवून दुसरीकडे पाहिलें.

चंदु म्हणाला, "तें असो. पण गाडीवानालाहि ताकीद द्या कीं, सावधपणानं गाडी हाकीत जा कोपऱ्यावर. भिंत पुनः कोसळली तर म्हणावं, पुनः बांधण्याचा खर्च पुढच्या खेपेला लेका, तुझ्या पगारांतून कापून घेईन. विलायतेंत काय रगेल घोडे बैल नाहींत ? आणि गाडीवाले ! पण विलायतेंत सर्वजण आपापलीं कामं सावधपणानं समजून करतात."

मग बागेंतल्या न कापलेल्या गवताकडे चंदुलालची दृष्टि गेली. त्याला त्याचा राग आला.

"हें काय हो दिवाणजी ? तुम्ही अगदीं बेवकुफ आहां ! या गवताकडे तुमची नजर नाहीं जात कधीं ? कापलेल्या गवताची शोभा किती असते तें तुम्हाला समजत नाहीं ? विलायतेंत असं होत नाहीं कधीं. घरधनी एक वेळ आपली रोजची हजामत विसरेल. पण गवत कापायचं विसरणार नाहीं !"

विलायतेंतली ही रीत ऐकून दिवाणजींना खुदकन हंसू आलं. कारण रोजच्या या अशा हजामतीचा त्यांना परिचय नव्हता आणि रोजच्या या

नसत्या उपद्रवाचा त्यांना मनांतून तिटकाराहि आला. ते इतकेंच म्हणाले, " सांगतों आज कान्या माळ्याला गवत कापायला."

इतक्यांत स्वतः कान्या माळीच पुढें येऊन त्यानें लवून धन्याला मुजरा केला. चंदुलालचा रोख आतां या दगडी कंपाउंडाबाहेरच्या मोठ्या राखीव बगीचाकडे वळला आणि हातांत बंदुक असल्यामुळें तो लवकर परत फिरणार नाहीं असें पाहून दिवाणजींनीं त्याला मुजरा केला आणि मागें वळून चटदिशीं आपली सुटका करून घेतली. आज थोडक्यावर निभावल्याचा त्यांना मनांतून आनंद झाला.

चंदुलाल व कान्या माळी हळुहळू पावलें टाकीत चालले. भेटेल त्या झाडाच्या डहाळ्या उलट्या मुलट्या करून चंदुलाल पाही. तशींच मोठीं पानेंहि आणि एखादा किडा त्यावर आढळला म्हणजे तो त्याला झटकून खालीं पाडी, आणि लगेच बुटाच्या टाचेनें कचकन त्याचा चेंदामेंदा करी. झाडावर किडे आढळल्यावरून सिद्धच झालें कीं, माळ्यानें या दृष्टीनें बागेकडे पाहिलें नव्हतें. कदाचित तसें करावयाचें त्याला सुचलेंहि नसेल.

पण चंदुलाल म्हणाला, " कान्या, गाढवा, दर झाडागणिक जर असे किडे खुशाल राहूं दिले तर झाडें वाढायचीं कशीं ? आपण राबून त्यांना पाणी द्यावें, खर्च करून खत घालावें, कष्ट करून मुळें उकरावीं, आणि या दुष्ट किड्यांनीं पानाआड दडून कोवळे कोंब खात बसावे, हा काय न्याय झाला ? ही बागायतीची रीत तुला कुणी शिकविली ? बघ बघ हें गुलाबाचं झाड. तसंच हें अशोकाचं. तसंच हें लिंबिणीच. यांच्यावर एक तरी धड पान या किड्यांनीं ठेवलं आहे काय ? सगळ्या कोंवळ्या पानांचीं यांनीं जाळीं केलीं आहेत, हें तुझ्या ध्यानांत कसं येत नाहीं ? "

" होय धनीसाहेब, माझ्याहि थोडं लक्षांत येतं तें. रोज किडे झाडतोंहि मी. पण पुन्हा ते वर चढतात. "

"हीच का लेका तुझी अक्कल ? अरे, किडे झाडावरनं खालीं पाडले तर ते पुनः वर चढल्याशिवाय कसे राहतील ? त्यांना हुडकून खालीं पाडून असे

कचाकच तुडवावे लागतात. फक्त मेलेलाच किडा झाडावर पुनः चढूं शकत नाहीं, समजलास ? "

आणि इतक्यांत एका झाडावर एक किडा दिसला. तो त्यानें पटकन खालीं पाडून बुटानें, वस्तुपाठाच्या प्रयोगादाखल चिरडून दाखविला.

कान्यानें हें दृश्य पाहून शिसारी आल्यासारखें करून किंचित तोंड फिरविलें. मग पुनः वळून म्हणाला, " धनीसाव, या किडयांना चेंगरून मारण्याबिगर दुसरी एकादी तोड सांगा ना ते नाहींसे करायला ? "

चंदुलालला हा प्रश्न मोठा चमत्कारिक वाटला. न मारतां नाश करावयाचा—हें कोडें ब्रह्मदेवालाहि सोडवायला कठीणच नव्हे काय ? तो म्हणाला—

" आम्ही हिंदुस्थानचे लोक गाढव खरे. नव्हे कान्या ? "

" होय धनीसाब ! "

सगळ्या गाढव लोकांबरोबर आणि त्यांतल्या त्यांत आपल्या गाढव धन्याबरोबर आणखी एक गाढव होण्याचें कान्याला कठीण वाटलें नसेल. म्हणून त्यानें चंदुलालच्या प्रश्नाला तत्परतेनें होकार भरला. पण आपण एक गाढव ठरूं हवे तर; तथापि शक्य तर आपल्या धन्याला त्या आपत्तींतून वाचवण्याची संधि द्यावी या उदार बुद्धीनें तो म्हणाला—

" पण त्यें कसं म्हटलं धनीसाव ? माझ्या गाढवीचाच्या नाहीं आलं लक्षांत ! "

" म्हणजे असं कीं दयाबुद्धीचं, खोटया आहिंसेचं स्तोम माजवून आम्ही या जगांत आपलं आर्थिक नुकसान परोपरीनं करून घेतों. फुकट खाऊं घालून जसे साधू पोसतों, आणि सगळ्या गांवाला उपद्रव करायला त्यांना पोळासारखे कुत्र्यां-डुकरांसारखे मोकळे सोडतों, त्याप्रमाणंच या किडयांना न मारतां त्यांना कोंवळ्या कोंबावर पुष्ट होऊं देऊन बागांची नासाडी करूं देतों. ही कसली भूतदया ? एखाद्या उपाशी माणसाला चार फळं फुकट खायला द्यावीं हा परोपकर मला कळतो. पण झाडांवरचे किडे वाचवायचे ? विलायतेंत शहाणा माळी असं कधींच करीत नाहीं आणि कान्या, मी

मगाशीं किडा मारल्याबरोबर चटकन तोंड फिरविलंस, तो तूं कधीं मेंढरूं मारून खात नाहींस वाटतं ? निदान देवीला तरी बळी द्यायला मारीत असशील ! ”

आपल्या चमत्कारिक वर्तनाचा सुसंगत खुलासा करायची संधि मिळा-लेली पाहून कान्याला बरें वाटलें. त्यानें आपला सदरा गळ्यापाशीं उघडून गळ्यांतली तुळशीची माळ चंदुलालला दाखविली आणि म्हणाला, “धनीसाब, हा माळकरी मेंढरूं-बकरं कसं मारील ? त्याबिगर देव काय पावत नाहीं ? अन् पोट काय जळत नाहीं ? ”

“ अरे मूर्खा, मांस खाल्ल्याशिवाय पोट जळतं, तर हिंदुस्थानांतल्या भोळ्या माळकऱ्यांशिवाय आणि खुळ्या बामणाशिवाय जगांतले सगळे लोक प्राणी मारून कां खाते ? ”

“ आवड द्वाड, अन् दुसरं काय म्हणून धनीसाब ? ” कान्या धिटाईनं व विनोदबुद्धीनें म्हणाला.

“ अरे लेका, निम्म्या जगाची आवड दुसऱ्या निम्म्या जगानं द्वाड म्हणावी हें ठीक आहे. कुणी तोंड धरावं कुणाचं ? पण मला हें सांग कीं, सगळं जग जर मांस टाकून धान्यच खायचं ठरवून शेतजमिनीवर येऊन उलथून पडेल, तर ती बिचारी शेतजमीन काय करील सांग रे ? ”

“ पण धनीसाब, लोक जनावरं मारून खातात तीं पण शेतच्या धान्या-वर गवतावरच जगतात, न्हवं काय ? ”

हा प्रश्न उत्तर द्यायला थोडा अवघडच वाटला चंदुलालला. तेंव्हां त्यानं त्याला बगल देऊन कान्याला अडविण्याकरितां भलताच मुद्दा काढला. तो म्हणाला, “ पण काय रे कान्या ! मेलं झाड आन् जितं झाड हीं दोनहि एकच काय ? ”

“ न्हाई बा ! असं कसं होईल धनीसाब ? ”

“ बरं, तूं मेलेलं झाड सर्पण म्हणून जाळतोस ! पण जित्या झाडाला पाणी घालतोस, खत घालतोस ! तें खाऊन तें मोठं होतं. आपल्याला मुलं होतात तशीं त्याला फळंफुलं येतात. असं असून तूं भाजी चिरून शिजवून

खातोस, फळं खातोस, तें जित्याला मारल्यासारखं होत नाहीं काय ? तुझ्यासारख्या पुण्यवान माळकऱ्यानं ही हत्या रोज करावी काय ? "

आतां उत्तराकरितां अडण्याची काऱ्याची पाळी आली;पण तो म्हणाला,

" अन् काईबी खाल्ल्याबिगर मी जगलों तर मी त्ये बी नाहीं करणार धनीसाब—न्हाई मी भाजीपाला खाणार ! "

" अस्सं ! एकुण आपण जगायचंच तर दुसऱ्याची हत्या करायला हरकत नाहीं म्हणतोस ! चला, तुझ्याच तोंडून न्याय झाला."

ऑक्सफर्डचा एम्. ए. बॅरिस्टर, तो काय काऱ्यामाळ्याला दाद देणार ?

या वादयुद्धांत जय मिळाल्यावर चंदुलालनें तो वाद थांबविला, व थोडें हसून तो विजय साजराहि केला आणि पुढें चालला. त्याची दृष्टि कांहीं शिकार दिसते कीं काय यावर होती. प्रथम तो जमिनीकडे नजर देऊन चालला. त्याला आशा होती कीं एखादा ससा चुकून दृष्टीस पडायचा. पण कांहीं वेळानें ती निराशा झाल्यावर तो मोठमोठ्या झाडांकडे पाहूं लागला. त्याप्रमाणें दूरच्या झाडावर कांहीं पक्षी दिसलेहि. पण बंदूक सरसावून चंदुलाल पुढें जातांच ते भुरदिशीं उडून गेले.

कांहीं वेळानें एका झाडाकडे चंदूचें लक्ष वेधलें. त्याच्या उंच भागीं एक शिंकें टांगलेलें असून, त्यांत भाजल्या मातीचे दोन उथळ परळ होते. एकांत पाणी भरलेलें असून दुसऱ्यांत धान्य भरलें होतें. त्यानजीक दोन कपोत पक्षी जोडीनें बसून चोचीनें एकमेकांचे पंख साफ करीत आहेत, मधून मधून ते एकमेकांच्या चोची एकमेकांशीं घाशीत आहेत, एकमेकाभोंवतीं घिरट्या घालीत आहेत, माना वेळून एकमेकाकडे पाहात आहेत, आणि आनंदानें मंजूळ घुमणाऱ्या पडसादाच्या लहरी उठवीत आहेत, असा देखावा दिसला.

तो पाहातांच चंदुलाल आनंदला व थबकला. मात्र इकडे काऱ्याच्या पोटांत चर्रर झालें.

झाडाच्या आसपास हीं दोन माणसें आलेलीं पाहूनहि ते दोन पक्षी

टचकले किंवा घाबरले नाहींत. यांना न पाहिलेंसें करून ते आपली क्रीडा तशीच करीत होते.

चंदुलालनें आवाज न करितां हळुहळू बंदूक वर उचलून सरसावली असें पाहतांच कान्या किंचित पुढें होऊन हलक्या व काकुळतीच्या स्वरानें म्हणाला, " धनीसाब, नका नका; येवढं करूं नका कांहीं केल्या. मी गरीब भिकारी माणूस. माझ्या हातनं पुण्य काय होणार ? म्हणून या झाडावर मींच तें शिंकं टांगलं आहे. त्या परळांत मंचि घरचे दाणे आणून घालतों आणि विहिरीचं ताजं पाणी रोज ओतून ठेवतों आणि कुणा उडत्या पांखरानं येऊन क्षणभर थाबून चार दाणे खाल्लेले आणि पाण्याला चोंच लावलेली मीं पाहिली म्हणजे मला बरं वाटतं धनीसाब. आपण त्यांच्यावरच काय, पण माझ्यावरहि दया करा, आन् त्याचा घात करूं नका. मी तुमच्या पाया पडतों. "

असं म्हणून डोळ्यांत आसवें आणून कान्यानें खरोखरच चंदुलालचे पाय धरले. पण रागाचा झटका येऊन चंदूनें त्याला लाथेनें एकीकडे सारलें. " चल, दूर हो मूर्खा. मोठा आला लेकाचा पुण्यवान माळकरी ! " अशी शिवी हासडून त्यानें बंदूक सरसावली आणि झाडली. सराईत शिकारी तो ! त्याचा नेम कसा चुकेल ? आणि बंदुकींतल्या छऱ्यांनींहि आपलें काम नीट बजावलें ! बंदुकीच्या आवाजाबरोबर त्या जोडींतला एक पक्षी मरून दगडासारखा खालीं पडला, आणि दुसरा आक्रोश करीत त्या दोघांच्या व झाडाच्याभोंवतीं चक्राकार गिरक्या घेऊं लागला. एखाद्या वेळीं तो खालीं येऊन मरून पडलेल्या पक्षाला चोंचीचा स्पर्श करी, व फिरून वर जाई. पण अशा त्याच्या पांचचार फेऱ्या झाल्यावर तोहि हतबल होऊन आपल्या सोबत्याच्या जवळ येऊन पडला. त्या दोघांचेहि पंख पसरलेले असून अगांतून रक्ताचा झिरपा वाहात होता !



*

## योगायोगाचा बीजमंत्र : : ४

कान्या माळी मटकन् खालीं बसला. मांडींत मान घालून तो स्फुंद-स्फुंदून रडूं लागला. डोक्यावर हात आपटून घेऊं लागला.

चंदुलालनें बंदूक खालीं ठेवली आणि पुढें सरून वाकून तो त्या पक्ष्यांना हात लावणार, इतक्यांत चार सहा हातावरून कोणी रागानें ओरडून त्याला मोघम हाक मारल्यासारखी ऐकूं आली.

" हा अधमा, हा चांडाळा, हें तूं काय केलेंस ? केवढ्या पापाचा धनी झालास ? "

त्या वृक्षापलीकडून एक रुळलेली रुंद पाऊलवाट जात होती. ती नंदभुवनाच्या बागेंतून जाणारी म्हणून खासगी तथापि क्वचित कोणी लोक सोयीसाठीं वापरीत आणि त्या बाबतींत अगदींच मनाई नसे. अपरिचितांना ती सार्वजनिकच वाटे. या वेळीं या वाटेनें दोन अशाच अपरिचित व्यक्ति येत असतां त्यांनीं रस्त्याचा कोपरा वलांडायला, व चंदुलालच्या बंदुकीचा बार उडायला एकच गांठ पडली.

त्या दोघांपैकीं एक प्रौढ वयाचा आणि दिसण्यांत जवळ जवळ वृद्ध असा असून किंचित स्थूल देहाचाहि होता. त्याच्या दाढींतले निम्म्याहून अधिक केस पिकलेले होते. अंगावर व्याघ्राजिनाचा तुकडा, एका हातांत काठी, दुसऱ्या हातांत कमंडलू, पाठीवर एक बिछान्यासारखें लांबट गांठोडें, पायांत पातळ लाकडी खडावा, असा बैरागी वृत्तीचा त्याचा सारा थाट होता. दुसऱ्या माणसाचा थाट सांगायचा म्हणजे ती या पहिल्याच्या थाटाची रेखीव नक्कल होती इतकें सांगितलें म्हणजे पुरें होईल. त्याला फक्त नक्कल करतां आलेली दिसत नव्हती, ती वयोमानांत व शरीराच्या स्थूल अंगलटींत. कारण तो अजून तिशींतला तरुण असून त्याचा देह कसलेला म्हणून मांसल नव्हता. एरवीं दाढीच्या रंगांत सारखवटपणा यावा म्हणून त्यानें आपल्या दाढीला मधून मधून हलक्या हातानें पांढरी राख फासली होती आणि ' हा अधमा, हा चांडाळा ' इत्यादि जे शब्द त्या

वृद्धानें रागानें म्हटले त्याबरोबर तेच शब्द या तरुणानें तितक्याच रागाच्या आवाजानें त्याच झोकानें उच्चारले.

त्या दोघांपैकीं वडील तो गुरू व धाकटा तो शिष्य होता हें सांगण्याचें कारण वरील वर्णनावरून उरूं नये असें वाटतें.

' हा चांडाळा ' इत्यादि तीव्र निषेधाचे रागाचे मोठ्या आवाजाचे शब्द अकाल्पित रीतीनें कानावर पडल्यामुळें चंदुलाल दचकला. जमिनीवर पडलेले पक्षी उचलण्याकरितां पुढें केलेले हात त्यानें न कळत मागें घेतले; पण तेच कमरेवर ठेऊन वरील जोडीकडे कुतूहलानें पण तुच्छतेनें पहात तो जमिनींत पाय रोवल्यासारखे करून ताठ उभा राहिला. तो दचकला, तरी क्षणांत त्याच्या मनांत रागाची उर्मि येऊन प्रतिकारबुद्धि जागृत झाली.

वडील गोसाव्यानें खालीं बसून आसन ठोकलें, मांडी घातली. जमिनी-वर पडलेल्या एका पक्ष्याला एका मांडीवर आणि दुसऱ्याला दुसऱ्या मांडी-वर घेतलें. प्रथम आपल्या कमंडलूंतलें पाणी हातावर ओतून घेऊन एका पानाच्या पन्हळींतून तें दोघांच्या चोचींतून घशांत घालण्याचा प्रयत्न केला. तो थोडाबहुत साधला. पण त्यामुळें फक्त एकाच पक्ष्यानें जिवंतपणा दर्शविणारी हालचाल किंचित केली. दुसरा अगदीं निपाचित पडून होता. कारण त्याचें प्राणोत्क्रमणच झालें होतें.

त्या दोघां पक्ष्यांच्या अंगावरून हात फिरवितांना गोसाव्याच्या उजव्या हाताच्या तळव्याला बरेंच रक्त माखलें गेलें. पण त्यानें तें पुसण्याचा प्रयत्न केला नाहीं. त्यानें वर पाहून चंदुलालला उद्देशून बोलण्याला प्रारंभ केला. या वेळीं त्याचा रागीट आवाज पूर्वीपेक्षां किंचित उतरला होता. तरी निषेधाची तीव्रता किंवा त्याचा कडकपणा लोपला नव्हता. तो म्हणाला, " बेटा, तुझा माझा परिचय नाहीं. मीं तुला कसं बोलावं ? पण हें तूं काय केलंस ? या गरीब निरपराधी जीवाची व्यर्थ हत्या तूं कां केलीस ? आणि अशा घोर पापाचा धनी कां झालास ? पहा बरं ! हीं गोजरिवाणीं पक्षी बालकं नरमादी आहेत. या वृक्षावर तीं सुखानं क्रीडा करीत असतां त्यांच्या सुखाचा उच्छेद करण्याचा तुला काय अधिकार होता ? "

असें म्हणून तो रडूं लागला. वृद्धपणामुळें कदाचित् त्याच्या डोळ्यांतून अश्रू येत नसतील; पण त्याला रडूं आवरेचना आणि गुरुजी रडूं लागले असें पाहून शिष्यहि त्याच स्वरांत रडूं लागला. गुरूच्या एका हुंदक्यावरोबर शिष्य दोन हुंदके देई.

चन्दुलाल प्रथम कांहींच बोलला नाहीं. तो नुसतें ऐकून घेत होता. गुरुजींच्या तीव्र भावनाप्रदर्शनानें त्याच्या मनावर थोडासा गंभीर परिणाम झाला. पण शिष्यानें आपल्याकडे रागावून पाहण्यांत आणि आतां रडण्यांत गुरूची थेट नक्कल केलेली पाहून चन्दूला किंचित् हंसूच आलें आणि यामुळें त्याची मनोवृत्ति थोडी पालटलीहि. पाणलोटावरून पाणी अडथळयामुळें उलट दिशेला परतावें तसें झालें. निषेधाच्या पहिल्या भरांत या गोसाव्याला उलट उत्तर द्यावें असें चंदूच्या मनांत आलें नाहीं. पण आतां उलट उत्तर देण्याला त्याचें मन तयार होऊं लागलें.

तो प्रौढ गोसावी पुनः त्या पक्ष्यांच्या अंगावरून ममतेनें हात फिरवूं लागला आणि चन्दूला म्हणाला, " बेटा, तुझें सुरूप पाहून मन मोहतें. पण तुझें हें कुरूप आचरण पाहून तितकाच तिटकारा वाटतो. "

हे शब्द ऐकून मुंगी डसावी तसा चन्दूला रागाचा लहानसा झटका आला. तो म्हणाला, " पण काय रे गोसावड्यांनो, मीच तुम्हांला आधीं विचारतों कीं, या खास बागेंतल्या खासगी पाऊलवाटेनें तुम्ही कुणाला विचारून चालला होतां ? "

" ती आमची चूक असेल. आम्ही या गांवीं परके असून प्रथमच आलों. भद्रेश्वराच्या यात्रेला निघालों आहों. आजचा मुक्काम कुठें सोईचा पडेल हें पाहात जात होतों. आमच्या अतिक्रमणाबद्दल तुला आम्हांला काय शिक्षा करायची असेल ती खुशाल कर. पण बाबा, या पापाचा धनी कां झालास ? " असें म्हणत तो व अर्थातच शिष्य दोघेहि पुनः रडूं लागले.

चन्दू म्हणाला, " शिक्षा राहो. पण काय हो बुवाजी, मी तुम्हांला विचारतों कीं, माझ्या जागेंत अनधिकारानें प्रवेश करून वरती माझ्या निषेधाचं नाटक तुम्ही हें काय चालविलें आहे ? तुम्ही कोण, मी कोण ?

तुमचा माझा काय संबंध तुम्ही असं रागावून मला बोलण्याचा ? आणि मीं ते सोसून घेण्याचा ? माझ्या खास बागेंत मी स्वच्छंदानें शिकार करून हे पक्षी मारले अन् पुनः वाटलं तर पुनः मारीन. त्यांत तुमच्या बापाचं काय जातं ? या गोष्टींत तुम्हांला तोंड घालायला कुणी सांगितलं ? आणि हा तुमचा छोटा साथीदार तर पहा. कसा एखाद्या मारकट म्हशीसारखा माझ्याकडे टवकारून पाहतो आहे तो ! वाटतं कीं, जसं काहीं हा आपल्या पुण्याईच्या भाल्यानं आतांच मला नरकाच्या विवरांत दडपून कोंबणार आहे किंवा यमपुरींतल्या तापलेल्या तेलाच्या कढईत लोटणार आहे. पण म्हणावं, या गमज्या चालू देणार नाहीं. या पाखरांची एवढी कड घेण्याचा तुम्हांला कुणी अधिकार दिला ? ”

“ बेटा, ईश्वराघरचा प्राणी ही दुनियेची मिळकत आहे. तिचा अपहार किंवा तिच्यावर अत्याचार थांबवण्याचा स्वतंत्र अधिकार देवानं प्रत्येकाला दिला आहे. ”

“ झालं तर.! तुमच्याच तोंडून न्याय झाला. मीं हे पक्षी मारले हा या दुनियेच्या मिळकतीचा अपहार नाहीं किंवा तिजवर अत्याचारहि नाहीं. ” आतां शिकारी नव्हे, तर बरिस्टर चंदूलाल बोलूं लागले. “ कारण कोणच्याहि दुनियेच्या म्हटलेल्या मिळकतीवर जितका कोणाचा एकाचा हक्क पोचेल तितकाच दुसऱ्याचाहि पोचतो, नव्हे का ? बरं बुवाजी, तुम्हांला हिंदु धर्मांचीं तत्त्वं कळत असलीं तर त्याहि दृष्टीनं सांगतों कीं, मी जातीचा क्षत्रिय आहें, ब्राह्मण नाहीं. मग तुम्ही कुणीहि असा. मला शिकार करण्याचा हक्कच आहे आणि शिकार करून मारलेला प्राणी खाण्याचा ! ”

“ अहाहा, अहाहा, काय पण क्षत्रिय धर्माची बढाई ! ” तो गुरु गोसावी एक युक्तिवाद सुचून म्हणाला—“ तरुण मनुष्या, तुला लाज वाटायला पाहिजे कीं, क्षत्रिय धर्माची खोटी सबब सांगून तूं या क्रूर हिंसेचें समर्थन करूं पाहतोस. अरे बाबा, क्षत्रियाला निरपराधी पाखरं मारणं आणि तीं खाणं एवढ्यापुरताच आतां क्षत्रियधर्म उरलासा दिसतो. तूं क्षत्रिय म्हणवितोस, तर असा कधीं केला विचार आहेस काय कीं,या देशावर आज राज्य

कोण करतो ? क्षत्रिय कीं वैश्य ? आपला का परका ? स्वधर्मी कीं विधर्मी ? परक्यांचे दास्यांत आपला देश आज आहे, आणि त्यांतून त्याला सोडवूं तरच आपण क्षत्रिय म्हणून जगण्याला योग्य, असा विचार तुझ्या या तरण्या उमद्या मनांत कधीं आला आहे काय ? पण हें मी विचारतों तरी कशाला आणि कुणाला ? तुझा हा अंतर्बाह्य विलायती थाट पाहूनच तुझ्या क्षत्रियत्वाची खरीं किंमत मला कळून आली. क्षत्रिय कुळाचा अभिमान ज्यांना यथार्थपणें गाजवतां येत नाहीं त्यांनीं दुष्कृत्याच्या समर्थनांत तरी त्या उज्ज्वल कुळाचा व कुलधर्मांचा उल्लेख करूं नये. अहाहा, किती हीं निरपराधी गरीब पाखरं. त्यांना मारणारी ती तुझी बंदूक अिश्वरानं मोडून कां टाकली नाहीं ? आणि तिचा उपयोग करणाऱ्या या तुझ्या हातावरनं त्यानं वारं घालवून ते निरुपयोगी कां केले नाहींत ? पण संभाळ, पापी तरुणा, संभाळ ! ईश्वर पापाचं प्रायश्चित्त आज नाहीं तर उद्यां, या नाहीं तर त्या रीतीनं तुला दिल्याशिवाय राहणार नाहीं. हा दिवस व ही घटका नीट लक्षांत ठेव ! " एखाद्या नाटकांतील नटानें पाठ केलेल्या नकलेप्रमाणें बैराग्यानें हें भाषण बिनचूक न अडखळतां केलें.

चंदुलालचा राग आतां भडकूं लागला. तो म्हणाला, " या पाखरांना निरुपद्रवी म्हणणाऱ्या गोसाव्या, तुझं दुनियेचं ज्ञान मला कळून आलं. हीं पाखरं दिसतात सालस, गरीब; पण तीं आपला उदरनिर्वाह कशावर करतात हें तुझ्या ध्यानांत येऊं नये याची मला कींव येते. हे कपोत कांहीं शाकाहारी नाहींत ! कीडमुंगी दिसली कीं त्यावर हे अशा वेगानें झडप घालतात कीं, माझी ही बंदुकीची गोळी त्यापुढं कांहींच नाहीं. त्या कीडमुंगीची दया करणारा एखादा तुझ्यासारखा नाटकी गोसावी मिळत नाहीं इतकंच आणि खाण्याला कीडमुंगी पुरेशी न मिळाल्यानं पडणाऱ्या पक्ष्यांच्या उपोषणाचं पारणं फेडायला, या मूर्ख माळकऱ्या कान्यानं वरती हीं परळं शिंक्यांत घालून त्यांत त्यांच्या दाण्यापाण्याची सोय लावून ठेवली आहे ! वाहवा रे पक्षी ! साधला मांसाहार, नाहीं तर शाकाहार ! दुहजबी खाशी सोय ! भूतदयेच्या, हिंसेअहिंसेच्या खोटया कल्पनांनीं वेडावलेल्या तुम्हां नेभळट लोकांना

अशा रडण्याहून अधिक काय सुचणार ? आणि उन्मत्त गोसाव्या, तूं मला शापाचा धाक दाखवून दम भरूं पाहतोस काय ? काय म्हणे, ' पापी तरुणा, संभाळ. ईश्वर तुझ्या पापाचं प्रायश्चित्त आज नाहीं तर उद्यां, या नाहीं तर त्या रीतीनं दिल्याशिवाय राहणार नाहीं ! ' ठीक आहे; मी पाहतोंच तर तुझी परीक्षा, तुझ्या शापांत काय सामर्थ्य आहे तें ! तुम्हां वैराग्यांना वाटतं कीं, अंगभर उदंड राखवडा फासला कीं तुम्ही ईश्वराचे फुकटे पोलीस अन् न्यायाधिकारी झालां. ईश्वराघरचे ऑनररी मॅजिस्ट्रेटच कीं नाहीं ? चला, चालते व्हा पाहूं इथून ! दयेचं, करुणेचं हें नाटक बस्स झालं. या तुमच्या प्रेक्षकाला तें आतां कंटाळवाणें वाटूं लागलं आहे. हें नाटक पुढें चालवाल तर नाटकगृहांतले प्रेक्षक देतात तसा कुचक्या अंड्यांचा मार खाल ! "

हें भाषण ऐकून बैरागी उठला. त्याचा पारा थोडा उतरला. तो म्हणाला, " अविवेकी तरुणा, मी बोललों तें भविष्य म्हणून नव्हे किंवा शाप म्हणूनहि नव्हे. भविष्य वर्तविण्याचं ज्ञान असण्याला मी कोणी ज्योतिषी नाहीं किंवा जगांतल्या घडामोडी आपल्या इच्छेप्रमाणं करून सुष्टांचं पालन आणि दुष्टांचं शासन करण्याच्या आपल्या सामर्थ्याचा अंश ईश्वरानं मला दिलेला नाहीं. मीं तुला शाप दिला नाहीं; कारण शाप देणं हें दुष्टबुद्धीचं प्रदर्शनच ठरतं. शिवाय शाप देऊन अहित चिंतणं ही मी हिंसा समजतों. माझ्या अहिंसेच्या व्रताला तें कुपथ्य आहे. ईश्वर तुला पाहून घेईल असं मीं म्हटलं, तें इतक्याच अर्थानं कीं ईश्वराच्या राज्यांत न्यायच प्रभावी होतो हा माझा दृढविश्वास आहे. असो. हा पहा मी आपल्या मार्गानं चाललों. "

असें म्हणून उठतांना त्यानं आपल्या मांडीवरच्या कपोत पक्ष्यांना प्रेमानें कुरवाळलें आणि हें करतांना फिरून त्याला रडें कोसळलें. तो म्हणाला, " मी जातों. पण मला एवढी भिक्षा तरी घालशील का ? हे कपोत पक्षी आपल्याबरोबर न्यावे असं माझं मन मला आदेश देत आहे. तेव्हां ते घेऊन जाण्याची परवानगी तूं मला देशील काय ? तुझ्या शिकारींतले आणि तुझ्या बागेंत पडलेले म्हणून हक्कानं ते तुझेच आहेत. पण भिक्षा घालायची ती मालकीच्या मालांतली घालणं उचितच ठरतं. "

गुरुजीनें भिक्षा मागितलेली पदरांत घ्यायला लगेच शिष्य पुढें सरसावला. तें पाहून चंदुलाल म्हणाला—

" ठीक आहे, एवढेंच म्हणणें असेल तर तें मी मान्य करतों. या तुमच्या शिष्याच्या तोंडाकडं पाहिलं तर असं वाटतं कीं आतां इथं हंडी शिजत लावायला विस्तव मिळेल तर तो लगेच या कपोतांना शिजवून पोटभर जेवील. पण बुवाजी, तुमच्या दयेचं अन् अहिंसेचं कांहीं अगदींच नाटक दिसत नाहीं. तुमचं तत्त्वज्ञान चुकीचं असलं तरी भावना प्रामाणिक दिसते. ठीक आहे, घेऊन जा हे पक्षी. काय वाटेल तें करा त्यांचं. मीं ते तुम्हांला खुषीनं दिले आहेत. शिकारी हा पक्षी किंवा श्वापदं मारतो तीं कांहीं केवळ खाण्याकरितां मारीत नाहीं. मृगयेचं सुख भोगण्याकरितां ! आणि आतांच ताकीद देऊन ठेवतों कीं, पुन्हा खाजगी बागेंतल्या या पाऊलवाटेच्या मार्गानें केव्हां जात जाऊं नका. हा बाग राखीव आहे. वाटेल त्यानं यावं आणि माझी वाट अडवावी हें मला खपायचं नाहीं. पाय मोडून हातांत देईन ! तुमचं दर्शन पुन्हा न घडलं तरी चालेल. "

शिष्य गोसाव्यानं दोन्ही पक्षी उचलून आपल्या हातीं एक घेऊन गुरुजींच्या हातीं दुसरा दिला; आणि कमंडलू उचलून घेतल्यावर दोघे त्याच पाऊलवाटेनें पुढचा मार्ग आक्रमूं लागले. शिष्य मधून मधून रागारागानं मागें वळून चंदूकडे पहात होता.



## गोसाव्याची फजिती : : ५

सुमारें १० मिनिटांनीं चंदुलाल बागेंतून वाड्यांत परत आला. शिकारींत मारलेले पक्षी मागण्याला ते दोन बैरागी अचानक भेटले नसते तर तेच हातांत घेऊन तो परत येता. पण बाहेर गेलेल्या माणसानें हात हालवीत रिकामे येण्यापेक्षां हातांत कांहीं तरी घेऊन परत जावें ही ख्यालीखुशालीची रीतच असते. त्याप्रमाणें चंदुनें येतां येतां खिशांतील रेशमी

हातरुमालांत जाईच्चीं व गुलाबाचीं फुलें बरीचशीं तोडून आणलीं. तो रुमाल वरचेवर नाकाशीं नेऊन वास घेत व तोंडानें इंग्रजी गाणें गुणगुणत व शीळ घालीत तो आस्ते कदम घरीं आला.

घरीं येतो तों त्याची अनेक मित्रमंडळी त्याची वाटच पाहात बसली होती. चंदु आय. सी. एस्. परीक्षा होण्याची सर्वांचीच खात्री—इच्छेनेंच पटविलेली का होईना—पण खात्री असल्यामुळें विलायतेहून तार येण्याच्या अदमासानें आज एकदोन दिवस ही मंडळी नंदभुवनाकडे येरझाऱ्या घालूं लागली होती. मंगळघटिकापात्र घंगाळांत बुडायला घातलें असतां तें केव्हां बुडतें याची प्रतीक्षा करीत ताटकळत बसणाऱ्या उपाध्याया-ज्योतिषा-प्रमाणें, किंवा हातांत अक्षता घेऊन त्या फेकण्याकरितां उत्सुक होऊन बसलेल्या मंडप सभासदाप्रमाणें, किंवा अन्तर्पाटाचें फडकें बाजूला ओढल्याबरोबर पिपाणीवर फुंक मारून लग्न लागल्याची वर्दी देण्यासाठीं टपून बसलेल्या वाजंत्र्याप्रमाणें, चंदूची मित्रमंडळी आतुर झाली होती. आपण निकालाच्या चौकशीकरतां जावें, आणि तेथें असतांच तो पास झाल्याची तार येऊन फुटावी आणि आपली खेप केवळ चौकशीची न ठरतां अभिनंदनाचीच ठरावी, अशी त्यांना मनांतून इच्छा होती. पण ते तरी करणार काय ? परीक्षेचा निकाल राहिला विलायतेंत पब्लिक सर्व्हिस कमिशनच्या अध्यक्षांच्या हातीं ! या मंगल कार्याची पाहिली टाळी वाजविणें किंवा शिंगावर फुंक घालणें हें त्या कमिशनच्या हातीं सांपडलें, म्हणून तूर्त या मित्रमंडळींच्या हातीं राहिलें तें इतकेंच कीं, त्यांनीं सदिच्छेच्या जोरावर हास्यविनोद करून भावी आनंद आधींच लुटावा आणि त्या लुटीच्या श्रमाकरितां मोबदला म्हणून चंदूच्या घरची चहा-कॉफी, अितर पेयें, चिरूट, सिगारेट व चमचमीत फराळ झोडावे.

आज चंदु शिकारीहून परत घरीं येण्याच्या वेळीं वाड्याच्या दर्शनी असलेल्या संगमरवरी फरशीच्या विस्तीर्ण सोप्यांत, एका मोठ्या वर्तुळाकार मेजाभोंवतीं खुर्च्या मांडलेल्या होत्या. त्यांवर कांहीं मित्रमंडळी आधींच

येऊन बसली होती. त्यांचे आपापसांतले सुखोपचार चालू होते. पण चंदु बाहेरून येण्याची ते वाट पहात होते आणि तो इतक्यांत आलाच !

त्याच्या उजव्या हातांतील बंदुक पाहून, आपल्या मित्राची स्वारी बागेंत शिकारीला गेली होती आणि त्याच्या हातरुमालांत कांहीं बांधून आणलें होतें हें त्यांना दिसलें. हें त्यांनीं ताडलेंच; पण त्या हातरुमालाला बाहेरून रक्ताचा रंग न लागतां झोळींत रक्तवर्ण जाई-गुलाबाचीं फुलेंच तेवढीं दिसत आहेत असें पाहून त्यांना आश्चर्य वाटलें आणि त्या उठावणीनेंच संभाषण सुरू झालें.

एकजण सिगारेटचा धूर सोडीत सोडीत म्हणाला—" अरे, बागेंत जाऊन फुलंच तोडायचीं होतीं तर हातांत बंदुक रे कशाला ? "

तोंडांतील विड्याचीं पिंक थुंकदाणींत टाकीत दुसरा म्हणाला, "विलायतेंत गेल्यावर शिकारीची विद्या राजेश्री विसरले वाटतं. तेव्हां शिकारीऐवजीं पदरांत फुलं बांधून आणण्याशिवाय हा दुसरं काय करणार ? बिचाऱ्या फुलांची शिकार मात्र कोणालाहि बिनचूक करतां येते !"

लेमोनेडचा ग्लास रिकामा करून खालीं ठेवणारा तिसरा म्हणाला, "विलायतेंतल्या शिकारीची गोष्ट कशाला सांगतोस बाबा ! चंदुची शिकारीची विद्या विलायतेंत जिवंत राहिली नाहीं हें तूं कशावरून म्हणतोस ? तिचें एक फळ तर आय. सी. एस्. परीक्षेच्या निकालानें आलेलं आज उद्यां दिसेलच. पण वेड्यांनो, विलायतेंतली शिकार ही काय एकच प्रकारची असते ? जसा शिकारी पारधी भेटेल तशी शिकार तिकडे हवी तितकी मिळते म्हणतात. पण त्या शिकारीची माहिती चंदु मोकळ्या मनानें सांगेल तितकीच आम्हांला मिळणार. आम्ही कांहीं त्याचे ख्रिस्ती धर्मातल्यासारखे 'कन्फेसर' नव्हे किंवा त्याच्यावर थोडेच गुप्त पोलिस आम्ही ठेवले होते, म्हणून त्याच्या शिकारीची खाजगी बातमी आम्हांला तो स्वतः किंवा ते कळवितील ?"

संत्र्याचे तुकडे सोलून तोंडांत भरणारा चौथा म्हणाला—

" विलायतच्या शिकारीचं मरो रे. पण आज बागेंतली या बंदुकीची शिकार कां फसली, कशी फसली, हें तरी चंदू आम्हांला सांगेल खरा! ती तरी निदान तसली कांहीं कॉन्फिडेन्शिअल बातमी नव्हे. "

या संभाषणांत मध्येंच शिरून भाग घेण्याला चंदूला ही खिंड बरी सोयीची सांपडली. विलायतेंतलि शिकारीचा विषय त्याला टाळावयाचा होता; म्हणून तो पूर्वींच कांहींच बोलला नव्हता. पण आतां तो म्हणाला, "सांगतोंच तर आजच्या शिकारीची कहाणी. इंग्रजींतली म्हण आहे ना तुम्हांला माहीत, कीं It is the Hare that shows the Hunter—ज्याच्या हातीं ससा तो पारधी! पण ही म्हण खोटी कशी ठरते त्याचा आतांच मासला घडला तो सांगतों. मी शिकारीला गेलों आणि दोन कपोत पक्षी मारून शिकार साधली हें खरें आणि सावजाशिवाय हात हलवीत परत आलेला, तरी पण खरा शिकारी हा तुम्ही समोर पाहत आहां. उलट, आतां इतक्यांत आमच्या बागेपलीकडच्या पायवाटेनें जाल, तर शिकार न करता खांद्यावर शिकार टाकून चाललेले दोन आगन्तुक तुम्हांला दिसतील आणि हा खरा प्रकार ज्याला न कळला तो त्यांनाच शिकारी म्हणेल कीं!

" पण त्यांतच एक मौज होऊन राहिली आहे रे गड्यानो! ती अशी कीं, ज्यांच्या हातीं ती शिकार आहे ते दोघे बैरागी गोसावी आहेत, आणि बैरागी गोसावी तर कधीं पक्ष्यांची शिकार करीत नाहींत. तेव्हां ' ज्याच्या हातीं शिकार तो पारधी '. या म्हणीचें कोडें तें पाहणाराला पडल्यावांचून राहणार नाहीं. "

" नवलच म्हणावयाचें! पण काय रे चंदू, तूं मारलेली शिकार त्या आगंतुक गोसाव्यांच्या हातीं जाण्याचें काय कारण? "

तेव्हां चंदूनें बागेंत घडलेली सर्व इत्थंभूत हकीकत मित्रमंडळींना हसत हसत सांगितली आणि तो म्हणाला, " जग हें असें आहे रे बाबांनो, निदान हिंदी जग तरी हें असें आहे! कोणी अंगाला राख फासून जटा वाढविल्या कीं त्याला इतर सगळ्या जगाला धर्माचार, तत्त्वज्ञान, नीति

सगळं कांहीं आढ्यतेनं सांगण्याचा अधिकार मिळाला—म्हणजे नुसता मिळालाच काय पण प्रत्यक्ष ईश्वरानेंच दिला असं वाटूं लागतं. माझ्या बंदुकींतले छरे लागून तो पक्षी खालीं पडायला आणि ते गोसावी यायला एकच गांठ पडली आणि त्यांतल्या एकानें-तो गुरू होता असं वाटतं-भूतदयेचं असं कांहीं सोंग आणलं आणि करुणविलापाचं नाटक केलं, कीं मला त्याचं हसूंच आलं. मींच काय आज मुलखावेगळे पक्षी मारले ! पण त्या गोसाव्यानं स्वतः रडून तर आकांत केलाच; पण 'पापी, दुरात्मा, अधम, चांडाळ' अशा शेलक्या शब्दांनीं माझी पूजा बांधली, अीश्वरा-घरचा न्याय मला सांगितला, आणि शेवटीं मला असा शापहि दिलान् कीं-"

"तुझी आयू. सी. एस्. परीक्षा नापास होईल म्हणून कीं काय ?" एक मित्र घाईनं उद्गारला !

"अरे, त्या बैरागड्याला काय माहीत आयू. सी. एस्. परीक्षेचं नांव तरी ? आणि मी तिला बसलों आहें हें तरी ? किंवा पास काय आणि नापास काय हें तरी ? पण त्या गब्रूनं मला असा एक Comprehensive (व्यापक) शाप देऊन ठेवला कीं त्याच्या चौकटींत कांहींहि बसावं."

"अरे वाः ! असा कोणता व्यापक शाप बुवा !"

"तो म्हणाला, 'या पक्ष्याची हिंसा तूं केलीस, तेव्हां ईश्वर तुला आतां पाहून घेईल. हा दिवस आणि ही घटका लक्षांत ठेव !'"

"बरोबरच आहे. या चौकटींत कांहींहि बसेल; कारण यापुढें तुला जें जें वाईट घडेल तें तें ईश्वरानें शिक्षा करण्याकरितांच तुला घडविलें असें होईल, नव्हे का ?"

"आणि जें घडणार तें ईश्वरच घडविणार असला, तर लेकाचा हा बैरागी रे मध्यें कशाला ? त्यांत त्या वैराग्याचं असं कर्तृत्व तें काय ?"

"अरे, कर्तृत्व हेंच कीं, त्यानं त्याचं आधीं 'भविष्य' केलं म्हणे ! ती News before the mail, ठरली, नव्हे का ?"

"अरे, एवढेंच काय, पण त्याला मी न्यूज बिफोर धी इव्हेंट (News before the event) असेंहि म्हणण्याला तयार आहें."

" अंगाला राख फासून दाढी वाढविल्यानें जर इव्हेंट ( Event ) घडण्यापूर्वींच न्यूज ( News ) निर्माण करतां आली, तर तें बरंच झालं कीं या लढाईच्या दिवसांत ! या विद्येमुळें मला ' लंडन टाईम्सचा ' ( War Correspondent ) वॉर कॉरस्पॉन्डन्ट हटकून होतां येईल कीं ! "

" अरे हो, पण ही News before the event खरी ठरली तर ना ! आणि Event च न घडली तर ? "

" वा ! तर त्याला मी ' इन्टेलिजंट ॲन्टिसिपेशन ' म्हणेन ! "

" खरं ठरलं तरच तें झालं इन्टेलिजन्ट, नाहीं तर त्याला केवळ 'वुइशफुल ॲंटिसिपेशन ' म्हणावं लागेल. म्हणजे त्यात कांहींच अर्थ नाहीं!"

" चला, कसंही असो. ईश्वर चंदूला पाहून घेणार असें बैराग्यानं भाकीत तर केलं, शाप तर दिला. आतां, तो कसा काय सफळ होतो–म्हणजे ईश्वर त्याला कसा काय पाहून घेतो–हें पाहण्याची आपणहि तयारी ठेवली पाहिजे. "

" आणि कोणचीहि तयारी म्हणजे तिला आधीं न्याहरी हें ओघालाच आलं ! चला चंदुसाहेब, न्याहरी मागवा पाहूं ! " असा रोकडा सवाल एका खादाड मित्रानं टाकला. रिकाम्या पोटीं होणाऱ्या वटवटीच्या श्रमाला तो कंटाळला होता. पण या मित्राच्या या सूचनेची गरजच नव्हती. कारण त्याची ही मागणी म्हणजे ती देखील ' न्यूज बिफोर दी इव्हेन्ट'च होती. घरच्या चाकरांनीं फराळाचे पदार्थ व पेयाचे प्याले घातलेलीं जीं ताटं–तबकं आधींच सोप्यांतील निम्मी वाट चालून आलीं होतीं, त्यांचाच प्रवास या गोलमेजावर समाप्त झाला, इतकेंच काय तें !

पण ते पदार्थ खातांना एका चोखंदळ मित्रानं म्हटलंच, " अरेरे ! चंदूनें मारलेले पक्षी त्या बैराग्याच्या हातीं न जातां घरीं आले असते म्हणजे आज काय बहार झाली असती ! पण काय रे चंदू, शाप देणाऱ्यालाच उलट शापितानं बक्षिसी द्यावी हा रे कुठचा न्याय ? तूं येशू ख्रिस्ताचा अनुयायी आहेस वाटतं ? वास्तविक तूं त्या बैराग्यांच्या तोंडांत देऊनच त्यांना घालवावयाचं होतं ! "

चंदू म्हणाला, " आणि खरोखरच तसं केलंहि असतं. कारण त्या जोड वैराग्यांपैकीं तरुण वैरागी पाहून-तो त्या गुरूचा शिष्य असावा—मला असा राग आणि तिटकारा आला कीं, मला भूतदयेचा, अहिंसेचा उपदेश करण्या-बद्दल मीं त्याचं तोंड चांगलं सडकून थोबाडूनच काढलं असतं. पण त्या तशा गुरुच्या संगतींत तो होता म्हणूनच वांचला ! "

" पण त्या गुरूंत तरी असं काय होतं रे, कीं त्याची तूं अशी उपेक्षा करावी ! "

चंदु म्हणाला, " इतकंच कीं, त्याचं मत चुकीचं असलं तरी त्याची भावना प्रामाणिक असावी असं भासलं. त्याचा तो शिष्य मात्र पुरा भोंदु आणि लबाड होता हें त्याचे डोळेच मला सांगत. ती राखाडी आणि त्या जटा आणि दाढी त्या वृद्ध गुरुला वयपरत्वें तरी शोभत होत्या. पण या शिष्याच्या दाढी आणि जटा यांच्यावर 'हजामतीचे पैसे वाचविण्याची युक्ति' असं एखादं विनोदी लेबल मीं चिकटविलं असतं. त्याचे गहिरे डोळे पाहून कोणीहि सांगेल कीं हा पक्का छटेल बदमाष आहे, अनीतीचा अर्क आहे, पापाचा पुतळा आहे. या गुरूची आणि या शिष्याची कोणत्या देवानं कशी गांठ घातली याचेंच मला कौतुक वाटतं ! शिष्यानं गुरूची नक्कल इतकी हुबेहुब उठाविली होती कीं काय सांगूं ! केवळ हजामत न केल्यानं कोणाहि दोघा मनुष्यांच्या दाढ्या व जटा नुसत्या वाढतील; पण एकीचा आकार आपोआप दुसरीसारखा असणार नाहीं. या शिष्यानं आपल्या दाढीचे व जटेचे काने-कोपरे गुरूच्या दाढी-जटांवरून असे बरोबर नकलले होते कीं, जणूं कांहीं त्यानं फूटपट्टी आणि कंपासच हातांत घेतला होता तें करतांना ! पांढऱ्या केसाचं सोंग तरुणाला साधत नाहीं म्हणून त्यानं केसांना थोड-थोडी राख लाऊन वृद्ध गुरूच्या दाढीचा शबल रंगहि साधण्याचा प्रयत्न केला होता. "

" अरे, मरो तो शिष्य ! पण चंदू, शिकारी पक्षी तूं त्यांना कां देऊन टाकलेस हें तूं अजून सांगितलेंच नाहींस ! "

चंदु म्हणाला, " त्या गुरूनं त्या पक्ष्यांची मागणी केली म्हणून आणि

तो कांहीं त्यांना शिजवून खाण्याकरितां मागत नाहीं असं मला दिसल्या-वरून. ”

“ पण मग त्यानं ते मागितले तरी कशाला ? तुझं ओझं हलकं करायला खचित नव्हे ! ”

चंदु म्हणाला, “ त्यांपैकीं एक पक्षी, जो पुरा मेलाच होता, त्याचं तो काय करणार कळत नाहीं. पण ज्या दुसऱ्या पक्ष्यांत अजून थोडो धुगधुगी होती तो नेऊन, त्याला सांभाळून, पुरा जगवावा अशी त्या गुरूला कळकळ वाटत असावी कदाचित ! ”

“ असो, पक्षी तर हातचे गेलेच. आतां ईश्वर तुला काय पाहून घेतो तेवढंच पहावयाचं उरलं आणि या चमचमीत फराळानं तरी आम्ही तें पाहण्याची तयारी करून बसलों आहों. ”

हें वाक्य पुरें उच्चारून होतें न होतें इतक्यांत तार खात्याचा शिपाई एक तार घेऊन आला. चंदुलालनें सही करून देऊन ती तार फोडली, वाचली, आणि आनंदानें उठून उभा राहून त्यानें ती उलटी करून मित्र-मंडळींच्या नजरेला घालून वाचून दाखविली. तारेंतले शब्द असे होते—

“ अगदीं मनापासून मी तुमचें अभिनंदन करतों. तुम्ही आय. सी. एस. परीक्षा पास झालां व त्यांत बहुमानहि मिळाला. एकंदर तेहतीस लोक पास झाले. त्यांत तुमचा तिसरा नंबर लागला आहे.तुमची नेमणूक कोणत्या प्रांतांत होईल हें मात्र तूर्त जाहीर झालेलें नाहीं. ”

सगळी मित्रमंडळी ताडकन उठून उभी राहिली आणि आनंदानें बेहोष झाल्याप्रमाणें माकडचेष्टा करूं लागली. कोणी गाऊं लागला, कोणी आपली टोपी वर सोप्याच्या छताकडे त्रिवार फेकून ती त्रिवार झेलली, कोणी घंटेच्या ऐवजीं चहाच्या प्याल्यावर चमचा आपटून खण्खण् आवाज काढ-ण्यास सुरुवात केली, कोणी दोघे हातांत हात घालून कोतवाल घोड्याप्रमाणें नाचूं लागले, आणि एकानें तर चंदूच्या गळ्याला मिठी मारून त्याच्या गालाचा मुकाच घेतला !

सर्वांत विचारी व गंभीर होता तो म्हणाला, “ पहा रे गड्यांनो !

बैराग्याच्या शापाचं फळ ! ! अीश्वरानं चंदूला पाहून घेतलं खरंच. पण तें पाहून घेतांना अीश्वराला तेहतीस यशस्वी उमेदवारांतील हा तिसरा हेंहि दिसलें असेल ! ”

चन्दू म्हणाला, “ अरे, तुम्ही काय वेडे आहांत, त्या बैराग्याचे विक्षिप्त शब्द उगाळीत बसतां ते ? बरं, आतां तुम्हांला बक्षीस काय देऊं सांगा ! ”

लगेच सोडयाच्या आणि शाम्पेनच्या बाटल्यांचीं बुचं उडण्याचे आवाज होऊन रंगीत पेयांचे पेले गोलमेजावर येऊन थडकले, हें काय सांगावयाला पाहिजे ?



## हिला हवा ग आय्. सी. एस्. ! : : ६

चन्दुलाल आय्. सी. एस्. पास होण्याची सर्वांची खात्री होती तरी त्या गोष्टीचा खरा आनंद पदरांत पडण्याला प्रत्यक्ष तार येणें अवश्य नव्हतें काय ? म्हणून ती तार आल्याबरोबर आनंदप्रदर्शनाचीं सगळीं कारंजीं खुलीं झालीं.

सर्वांत अधिक आनंद कोणाला झाला असेल, तर तो सर गंगाराम यांना. गंगेच्या अवतरणानें भगीरथाला, राम वनवासाहून परत आल्यानें भरताला, कीचकवधामुळें द्रौपदीला, अहल्येच्या उत्थानानें गौतमाला, शिवाजीमहाराज मोंगलाच्या कैदेंतून सुटून येऊन भेटल्यानें जिजाबाईला, फार काय पण सरकाराकडून ‘ सर ’ पदवी मिळाल्यानें स्वतः सर गंगाराम यांना–तात्पर्य, जितक्या प्रकारचे महान् आनंद तुम्हांला कल्पितां येतील तितके मनांत आणा, आणि समजा कीं त्या सर्वांपेक्षां, चन्दु आय्. सी. एस्. पास झाल्याचा सर गंगाराम यांचा हा आनंद अधिक भरला असता.

कारण आय. सी. एस्. चें महत्त्वच त्यांना तसें वाटत होतें. एके दिवशीं सर गंगाराम आपल्या एका मित्राशीं बोलत असतां त्यांनीं रंगांत येऊन त्यांना वाटणाऱ्या आय्. सी. एस्. च्या महत्त्वाचें वर्णन केलें तेंच देतों. ते

म्हणाले, " काय सांगूं हो ! आय. सी. एस्. हें एक फूल आहे; जसा कांहीं गुलाब ! रंग, सुवास अगदीं माषुक ! तें एक फळ आहे,जसा कांहीं आक्रोड. या झाडानं फळं धरायला साठ वर्षं लागतील. पण एकदां फळ धरूं लागलं कीं पुढं साठ वर्षं सारखं फळ पदरांत घ्यावं. ओळीनं चार चार, पांच पांच पिढ्या आय्. सी. एस्. ची नोकरी मिळणारीं मुलें निघालीं, अशीं घराणीं विलायतेंत अनेक आहेत म्हणतात. आय्. सी. एस्. हें सरकारी नोकरीच्या लोकरीवरचं फूल आहे, रेशमावरचं तेज आहे, सोन्यावरची जिल्हई आहे, शस्त्रावरची धार आहे. आज सर गंगारामांचा मुलगा म्हणून चंदूचं वर्णन करतात त्याऐवजीं तेंच उद्यां, चंदूलालाचा बाप म्हणून माझं वर्णन होऊं लागलं म्हणजे मला धन्यता वाटेल ! "

त्यांच्या वाड्याच्या दाराशीं डाव्या हाताला ' सर गंगाराम वर्मा ' अशा अक्षरांची पाटी पितळी फलकावर खोदून लावली होती. तशीच उजव्या हाताला आतां ' चंदूलाल वर्मा, आय् सी. एस्. ' अशा अक्षरांची तस-लीच एक पाटी, सर या शब्दाची जागा मागें सोडून, तयार करून लाव-ण्याची आज्ञा त्यांनीं आपल्या दिवाणजींना त्याच दिवशीं केली.

मासाहेबांना आनंदहि झाला. पण एकुलता एक मुलगा नोकरीच्या कारणानें दूर राहणार याच्या खेदाची आंचहि त्याबरोबरच त्यांना जाणवूं लागली; कारण तें मातेचें हृदय होतें. त्यांना वाटे कीं घरीं सालिना पन्नास हजार उत्पन्नाची जमीनदारी. चंदु कितीहि नोकरींत वर चढला तरी त्याला इतका कांहीं पगार मिळणार नाहीं. बरें, मिळाला तरी उपभोगाच्या दृष्टीनें एक लाख व पन्नास हजार यांत फारसा फरक नाहीं. एकदां डोकें बुडेल इतकें खोल पाणी असल्यावर, मग त्याखालीं आणखी चार माड पाणी असलें काय किंवा महासमुद्र असला काय सारखेंच. लाख रुपये खर्चणाराचं सुख पन्नास हजार खर्चणाराच्या दुप्पट का असतं ? बरें, उधळणाराच भेटला तर त्याला लाखहि थोडेच होणार. तात्पर्य, पैशाच्या प्रत्यक्ष सुखाच्या दृष्टीनें आय्. सी. एस्. होण्याकडे चंदूच्या आईनें कधीं पाहिलेंच नाहीं. पण आपला नवरा अगदीं जीव टाकल्यासारखें ज्याला महत्त्व देतो तें तसेंच कांहीं

मोठें असणार, अशी त्या बिचारीची स्वाभाविक कल्पना होती. आपल्या मुलानें ही परीक्षा पास होऊन कांहीं लोकोत्तर असें यश मिळविलें इतकीच स्थूल कल्पना त्यांना होती.

चंदूची बहिण बिम्बा ही थोडेंबहुत शिकलेली. तिला आय्. सी. एस्.चें ज्ञान अधिक होतें. म्हणजे तो शब्द तिला आपल्या आईपेक्षां अधिक शुद्ध रीतीनें उच्चारतां येत होता. आमच्या मासाहेब आय्. सी. एस्.च्या ऐवजीं ऐशीयस म्हणत ! शिवाय साहेब लोकांच्या संगतीनें येणाऱ्या महत्त्वाची कल्पना तिला अधिक होती. कारण आपल्या बापाबरोबर ती साहेब लोकांच्या पार्ट्यांना हजर असे. आपल्या भावाच्या यशाबद्दल तिला सहजच मोठा अभिमान वाटला; पण त्यामुळें आपल्याला एरवींहून अधिक चांगलें स्थळ लग्नाला मिळेल याविषयींहि तिला मनांतून अंधुक अपेक्षा असावी.

गांवच्या पुष्कळ लोकांना आय्. सी. एस्. चा खरा अर्थ कांहीं कळत नव्हता. पण वर्षांतून एखादे वेळीं कलेक्टरसाहेबांचा मुक्काम नवलपूरला पडला म्हणजे केवढी मोठी गडबड चालते, गांवाला केवढा मोठेपणा येतो, हें त्यांना माहीत होतें. यामुळें आपल्या गांवचा नागरिक चंदुलाल हाच कलेक्टर होऊन या आपल्या स्वतःच्या गांवीं आला, तर त्या भेटीचें महत्त्व त्यांना अवर्णनीय वाटावें हें अगदीं स्वाभाविक होतें. कलेक्टर आला म्हणजे राजधानीच्या रहदारी बंगल्यावर निशाण लागतें, कम्पौंडांत लहानमोठ्या राहुट्या उभारल्या जातात, पितळी किंवा रुप्याचा चांद लावलेलें पट्टे घालणारे शिपाई चोहोंकडे हिंडलेले दिसतात, गांवच्या दुकानदारांना आपल्यावर संकट आलें असें वाटत असलें तरी सरबराई करण्यांत गुंतलेल्या चार लोभी लोकांचे हात ओले होतात, कोर्ट–कचेरीकरितां गांवगन्नाहून येणाऱ्या लोकांची गर्दी होते; तात्पर्य, गांवांतील एखादी जत्रा किंवा उरूस उभा राहावा त्याप्रमाणें कलेक्टरच्या स्वारीची दंगल माजते.

आणि त्यांतली उत्सवमूर्ती आपल्या गांवचा चन्दुलाल हा एके दिवस होणार या कल्पनेनें साधारण गांवकऱ्यांचें मनहि रंगांत दंग होतें. मग कांहीं

जे त्याचे खुद्द मित्र-सोबती यांच्या मनांत यापलीकडे जाऊन आणखी कांहीं निराळ्या आशा-अपेक्षा उमटल्या, तर त्यांत आश्चर्य काय ? आपण चन्दूच्या खुर्चीला खुर्ची भिडवून ऐटींत बसून त्याची सिगारेट घेऊन ओढीत बसल्याचें लोक पाहातील, तेव्हां आपले पितर स्वर्गाला जातील, असें वाटणारे न्यूनगंडी कांहीं होते; तर आपल्या मित्राच्या हातून लाभाचीं अशीं कांहीं सरकारदरबारी कामें आपणाला उगवून घेतां येतील असें वाटणारे लोभीहि कांहीं होते.

नवलपूरच्या नागरिकांनीं सभा भरवून चन्दूलालला मानपत्र व मेजवानी देण्याचें ठरविलें. त्याकरितां त्यांतला एक कर्ता फडगुंड वर्गण्या जमविण्याकरितां बाहेर पडला. दुसरा कोणी मानपत्राचा मजकूर लिहून काढण्याकरितां दाखले हुडकूं लागला. मानपत्र कशावरून किंवा कशांतून द्यावें याविषयीं मतभेद होऊन कडाक्याचें भांडण झालें. पण वर्गणीचा आंकडा पाहून मग याचा निर्णय करावा अशा समजूतदार रीतीनें तें भांडण मिटलें ! मानपत्रांत काय मजकूर लिहिला जाईल याची काळजी कोणालाच नव्हती व त्याबद्दल मतभेदहि झाला नाहीं. मानपत्र देणाराचें नांव, तें घेणाराचें नांव आणि प्रसंगाचें निमित्ताचें नांव, याशिवाय बाकी सर्व मजकूर कोणाच्याहि मानपत्रांत जवळ जवळ ठरलेलाच असतो आणि एखाद्या मोठ्या छापखान्यांत मानपत्र कंपोज करायला हेड कम्पॉझिटरकडे दिलें म्हणजे तो फक्त वरील तपशिलाचे खाने मोकळे टाकून बाकीचा सर्व मजकूर आपल्या पूर्वपरिचयानें कंपोजहि करूं शकतो. मेजवानीनंतर दारूकाम व्हावयाचें; त्यांतील फर्माशीची ऑर्डर देण्यांत आली. हा सर्व समारंभ प्रत्यक्ष साजरा व्हावयाला अजून कांहीं थोडया दिवसांचा अवकाश होता; पण त्याची पूर्वतयारी जोरानें सुरू झाली होती.

तार आल्यादिवशींच तिसरे प्रहरीं राय बहादुर शामलाल यांच्या घरीं अनेक लहानमोठ्या स्त्रियांचा लहानसा मेळावा जमला होता. त्याचा हेतु शरयूचा भावी पति आय्. सी. एस्. पास झाल्याबद्दल अभिनंदन कर-

ण्याचा होता. या प्रसंगीं शरयूच्या मनांत आनंदाचा पूर एरवीं किती लोटला असता याची कल्पना ज्याची त्यानेंच करावी; पण !—

चंदु विलायतेला जाण्यापूर्वी, म्हणजे चार वर्षांखालीं, आपल्या नियोजित श्वशुरांच्या घरीं नेहमीं जाणारा येणारा आणि तेव्हां त्याची व शरयूची ओझरती गांठ पडून हास्यमुखानें त्यांच्यामध्यें चार-दोन शब्दांची देवघेवहि व्हायची. फक्त नव्हतें तें इतकेंच कीं किती झालें तरी सागर प्रांतांतलें हें नवलपूर म्हणजे मागासलेलेंच. तेथें सुशिक्षित वर्ग थोडा. यामुळें सामाजिक सुधारणेच्या नव्या चालीरीति, नवे ढंग, चोचले फारसे प्रचारांत नव्हते. विलायती कोर्टशिपच्या पद्धतीनें भावी वधूवरांनीं जोडीनें फिरावयाला जाणें, नाटकाला जाणें, किंवा हास्यविनोद करीत गप्पा मारीत चारचौघांदेखत एकत्र बसणें घडत नसे. चार वर्षांपूर्वीं स्वाभाविक होतें तें. पण आतां चार वर्षें लोटल्यावर शरयू अधिक मोठी जाणती झाली आणि चंदु तर विलायती समाजांतील सुधारणेचा, उदारमतवादित्वाचा, स्त्रीदाक्षिण्याच्या तत्त्वाचा अर्क किंवा रसायन पिऊन आलेला. यामुळें आणि विशेषतः आतां लग्नाचा काळ अगदीं समीप आलेला, यामुळें चंदुच्या खेपा भावी सासऱ्याच्या घरीं अधिक पडूं लागतील अशी सर्वांची कल्पना होती आणि तसें होतें तर शरयू व चंदु दोघेहि मोटारींतून हिंडाफिरावयास गेलेलीं अधिक दिसलीं असतीं. पण !—

पण उलट चमत्कार असा झाला कीं, चंदु विलायतेहून परत आल्यावर, कांहीं विशेष निमित्त निघालें आणि विशेष आग्रहाचें बोलावणें आलें तरच रायबहादुरांच्या घरीं जाऊं लागला आणि गेल्यावरहि शरयूशीं बोलण्याचालण्यांत त्याच्या भावनेची उत्कटता दिसून येत नाहींशी झाली. शरयूला विलायतेंतून चंदुचीं पत्रें पुढें पुढें कमी येऊं लागलीं; व येत तींहि तांत्रिक मजकुराचीं येऊं लागलीं. याचा अर्थ तिनें प्रथम असा केला कीं, चंदु अभ्यासांत गढून गर्क झाला असेल, आणि पत्रें सविस्तर किंवा खुलवून लिहिण्याला त्याला वेळ मिळत नसेल. शिवाय प्रेमपत्रें झालीं तरी त्यांत कोणी नवीन जिव्हाळ्याचा मजकूर रोजरोज काय लिहिणार ? पण चंदु परत आल्यावर

त्याच्या वागणुकींत स्निग्धता कमी झाली याचा अर्थ तिला कळेना. तिला अनेक प्रकारच्या शंकाहि येऊं लागल्या.

चंदु विलायतेहून परत आल्यावर राय बहादुरांनीं सर गंगाराम यांच्या-जवळ गोष्ट काढून लग्नासंबंधीं ठाव घेतला. तेव्हां सरसाहेब म्हणाले, " अगदीं थोड्या दिवसांत सर्वच अनुकूल होईल. चांगले चांगले मुहूर्त निघूं लागतील आणि दरम्यान चंदूची परीक्षा उतरल्याची तार आली म्हणजे तिथि-निश्चय पूर्ण उत्साहानें करतां येईल. " हें लग्न चंदू विलायतेला जाण्यापूर्वींच व्हावयाचें. पण आतां चार वर्षें गेलीं त्यांतच आणखी कांहीं थोडे दिवस. मात्र उभयपक्षीं व्याह्या-विहिणींची तरी वधू-वरपसंती निश्चित होती यांत शंका घेण्याला कारण नव्हतें.

असो. आज रायबहादुरांच्या घरीं बायकांचा मेळा भरला. त्याचा कार्य-क्रम निरनिराळ्या प्रकारांनीं सुरू होता. या कामीं सारविलेलीं आंगणें, बागेंतील लतामंडप, उघड्या झांकल्या जागेंतील झोपाळे,या सर्वांना भरपूर काम मिळालें होतें. प्रथम गोट्या खेळून झाल्या, फुगड्या घालून झाल्या, गोष्टी सांगून झाल्या, उखाणे घालून झाले. शेवटीं झोपाळ्यावर बसून गाणीं म्हण-ण्याला प्रारभ झाला. ज्या गोड गळ्याच्या चारदोन मुलींना तो मान मिळाला त्यांनीं प्रथम देवाचीं गाणीं म्हटलीं. पण कोणाला तीं फारशीं आव-डलीं नाहींत. एकजण म्हणाली, " अग, म्हातारपणीं कम्बर मोडल्यावर देवघरांत बसून म्हणावयाचीं हीं गाणीं काय चालविलीं आहेस ?" तेव्हा तीं टाकून देऊन नवीं सिनेमांतलीं गाणीं सुरू झालीं. त्यानंतर लग्नसोहाळ्याचीं गाणीं सुरू व्हावीं असें ठरलें आणि कांहीं तशीं म्हटलींहि गेलीं.

पण एका धीट मुलीनें त्यावर ' ऑडिट ' काढलें आणि म्हणाली, " हीं गाणीं खरेंखुरें लग्न झाल्यावर म्हणायचीं असतात, तीं आज कुठलीं काढ-लींस ? योग्य वेळीं लग्नाच्या सोहाळ्यांत तीं म्हणूं. "

" मग आतां म्हणूं तरी काय ? " असा एकीनें प्रश्न विचारल्यावरून दुसरी चतुर होती तिनें आठवण करून एक आधुनिक भावगीत सुचविलें. तें मायदेवांच्या कवितांच्या पुस्तकांतील असून त्याचें पालुपद सुप्रसिद्ध झालेलें

'हिला हवा ग आय्. सी. एस्. ' हें होतें. आय्. सी. एस्. हीं अक्षरें बिनचूक पाठ म्हणणाऱ्या तर सगळ्याच होत्या; पण या कवितेंतील मर्म ओळखण्याइतक्याहि कांहीं होत्या. वाचकांच्या स्मरणाकरितां ती सर्वच कविता याखालीं देतों—

**बघ हिची हौस! हिज हवा ग आय्. सी. एस् ॥ ध्रु. ॥**

**पहा हिची तर नाजुक यष्टी**
**चहा पिउनि किती चढली कांति**
**चष्मा बघ हा डोळ्यावरती**
**हाउ नाईस! हिज हवा ग आय्. सी. एस्. १**

**सशक्त इथला शिकला तरुण**
**हिजला वाटे खविसच पाहुन**
**डेलिकेट ना धड मॅनर्स न**
**हा न चॉईस! हिज हवा ग. आय्. सी. एस्. २**

**सुटाबुटाच्या स्वारीजवळुन**
**मोटारींतून केव्हां मिरविन**
**हींच स्वप्नें हिज रात्रंदिन**
**गुड् ग्रेशऽस! हिज हवा ग आय्. सी. एस्. ३**

**बापाघरचा पैसा ओतुन**
**मोटार हुंडा सर्वहि देऊन**
**गुलाम झाली जरिही पूर्ण**
**नाहिं व्हॉईस! तरि हवा ग आय्. सी. एस्. ४**

**मडम-सुरांनीं पैसा फन्न**
**झाला तरि ना होइल खिन्न**
**सोशिल झाली माराहाण**
**नाहिं कांहिं सेन्स! हिज हवा ग आय्. सी. एस्. ५**

ही कविता म्हणून झाल्यावर तिच्यावरच कांहीं मुलींनीं भाष्य करण्यास सुरवात केली. एक म्हणाली, " गाणारणीनं गोळी मारली; पण लागली नाहीं ग ! "

दुसरी म्हणाली, " तें कसं ? "

" शरयूच्या अंगयष्टीला नाजूक कोण म्हणेल ? पहिल्या कडव्यांत सांगि-ल्याप्रमाणें ती कधीं चहाच पीत नाहीं. तिच्या अंगावर कांति चढली असेल तर ती तारुण्याची व सौंदर्याची आहे आणि ती डोळ्याला चष्माहि लावीत नाहीं. हौस म्हणून नाहीं आणि गरज नाहीं म्हणून नाहीं. अर्थात् हें गाणं शरयूला लागू पडतच नाहीं. "

तिसरी एक म्हणाली, " गाण्याचं दुसरं कडवं तरी कुठें ग लागू पडतं? तिच्या लग्नाचं नांव निघाल्यापासून विलायतेला गेलेल्या एका तरुणाचं नांव पुढें येतं. आम्हीं तर दुसरं कोणतं कधीं ऐकलंच नाहीं. मग तिनं इथल्या सशक्त तरुणाला ' मॅनर्स ' नाहींत म्हणून झिड्कारला हें वर्णन खोटं ठरतं. बाकी गाणं तें गाणंच म्हणा. त्याला शेंडा-बुडखा, खरं-खोटं काय कधीं लागतं ? "

आणखी एकजण म्हणाली, " तें तिसरं कडवंहि लागू पडत नाहीं शर-यूला. घरची मोटार असतांहि शरयू तिच्यांत बसून फारशी हिंडलेली तुम्हीं कधीं पाहिली आहे का ग ? नाहींच दिसली मुळीं, आणि म्हणे तिला नव-ऱ्याच्या मोटारींत बसून त्याच्याबरोबर हिंडण्याचीं स्वप्नं पडतात ! गोष्ट खोटी, अगदीं खोटी. "

असाच आक्षेप आणखी एकीनं चवथ्या कडव्यावर काढला. "गंगाराम साहेबांच्या घरीं जावईबुवांची स्वतःची मोटार नसेल तर सासऱ्यानं मोटार देऊन मुलगी गळ्यात बांधायची गोष्ट ! सासऱ्याकडनं त्यांच्या मुलीबरोबर हुंड्याचा खूप पैसा आणि मोटारी उकळणारे पोरटे आपल्या घरचे भिका-रडे दळभद्रे असतात, हें नाहीं का तुम्हाला ठाऊक ? बुद्धि तरतरीत म्हणून प्रथम इकडच्या मोठमोठ्या परीक्षा पास होतात. मग मुलगा होतकरू असं पाहून त्यांच्यावर कोणी धनिक लोक कृपा करून देणग्या किंवा कर्ज देतात, त्या वेळीं त्यांची किती लाचारी असते ! विलायतेला गेल्यावर तिथंहि नशिब हात देऊन आय्. सी. एस्. ची परीक्षा पास करवितं

आणि मग काय ? हे बनले तालेवार जगजांवई ! लग्नाच्या बाजारांत अगदीं दुकान मांडून उभे ! भावी श्वशुरांमध्यें हुंड्याचा लिलाव चालायचा आणि मग हे दरिद्री नारायण लखपति बनायचे ! पण बाई गर्भश्रीमंत तो गर्भ-श्रीमंत हो ! गंगाराम साहेबांचे चंदुलाल विलायतेला गेले ते कांहीं भिक्षा मागून किंवा कर्ज काढून गेले नाहींत. चार वर्षंभर बापानं विलायतेंत मुलावर पैशाची अगदीं धार धरली होती. म्हणजे काय ? बापाच्या घरचा पैसा ओतून, मोटारीचा हुंडा देऊन, शरयू कांहीं गुलाम म्हणून विकली जाणारी मुलगी नाहीं, समजलांत ! गंगारामसाहेब आधींच इतके श्रीमंत आहेत कीं, त्यांना कुणाहि श्रीमंत सासऱ्याच्या हुंड्याचा लोभ नाहीं आणि जो मुलगा गर्भश्रीमंत असतो तो उसन्या पैशाच्या जोरावर मस्त होऊन आपल्या बायकोला गुलामासारखी वागवीतहि नाहीं. इथं दोन्ही घराणीं अगदीं सारखीं श्रीमंत आहेत. आतां शरयूला नव्या घरीं 'व्हॉइस' कितपत असेल हें आपोआप कळेलच. पण तिच्या हातच्या चापटपोळ्या तुमच्या आमच्यापैकीं ज्यांनीं नेहमीं खाल्ल्या किंवा कानपिचक्या घेतल्या, तिच्या हातचे धपाटे सोसले, त्यांना शरयू कांहीं गोगलगाय नाहीं हें पक्कं माहीत असेल आणि 'व्हॉईस' म्हणजे नुसता आवाज दोघांपैकीं कुणाचा मोठा आहे हें लग्नांत दोघेजण उखाण्यानं नांव घेतील तेव्हां कळून येईलच !"

शेवटीं एक चिचुंद्री पुढें आली आणि म्हणाली, "आतां शेवटचं कडवं मी सांगतें हो !" इतका वेळ शरयू गप्प राहिली होती. ती आपल्या ठिकाणीं हांसतहि होती; शेजारणीला म्हणत होती, "वात्रट पोरी या ! झोपाळ्यावर बसून तोंड सुटलंय् हवं तसं. कुणी लागावं त्यांच्या नादीं ?" पण अजून गाण्यावरची टीका संपेना असं पाहून ती आतां झोपाळ्यावर बसलेल्या मुलींच्यासमोर जाऊन उभी राहिली आणि मागच्या मुलीनं सांगितल्याप्रमाणं आपण मेंगी गोगलगाय नाहीं हें तिनं प्रत्यक्ष दाखवून दिलं. रांगेंतल्या सगळ्या मुलींच्या गालावर एकामागून एक गोड चपाट्या लगावल्या, गालगुच्चे घेतले, कान पिरगाळले आणि हंसून म्हणाली,

" अशी माझी चेष्टा करायला लागला का ग सायकाळ्यांनो ! याकरितां का तुम्हांला इथं बोलावलं होतं आज कुणी ? " आणि मग किंचित् इकडं तिकडं पाहून म्हणाली, " मला हवा असेल आय्. सी. एस्. नाहीं तर नको असेल; मी होईन त्याची गुलाम, नाहीं तर तर करीन त्यालाच गुलाम. मी मोटारींतून फिरायला जाईन, नाहीं तर पायानं जाईन. तुम्हांला कुणी दिला अधिकार माझं भावी चरित्र वर्णन करण्याचा ? तोंडाला एखादं गाणं आलं आणि म्हटलं, तर तें आपलं सहज गमतीनं विनोदानं म्हणून मी गप्प बसून ऐकून घेतलं. पण या कारट्यांनीं गाण्याची आणि त्याबरोबर माझीहि चिरफाड चालविली कीं ! " असं म्हणून ती मोठ्यानं हांसली आणि स्वतःच झोपाळ्यावरील मुलींच्या मेळ्यांत जाऊन बसून दोनहि हात पसरून तिनं त्यांत सांपडतील तितक्या मुलींना वेंग मारली. तेव्हां गाणं संपल्यावर अगदीं प्रथम जी मुलगी बोलली होती ती पुढं होऊन म्हणाली, " मीं नव्हतं तुम्हांला सांगितलं कीं, गाण्याचं निशाण मारलं; पण तें फुकट गेलं म्हणून !"

पण गाण्याचं हें नुसतं उपाख्यान होतं. मुख्य आख्यान म्हटलं म्हणजे ज्या एका गोष्टीवर चंदुलाल व शरयू यांचं लग्न होण्याचं अडून राहिल्यासारखं होतं ती गोष्ट म्हणजे नवऱ्या मुलाची आय्. सी. एस्. परीक्षा पास होणं. ती घडून येऊन निकालांत निघाली. अर्थात् लग्नसमारंभ आतां निश्चयानें होणार. मुहूर्त निघण्यापुरते दोन दिवस आरते-परते. तेव्हां लग्नापूर्वीं केळवण करतात तसं शरयूच्या मैत्रिणींनीं, वरून दिसायला साधं हळदकुंकूं पण हें केळवण म्हणून मनांतनं योजलं होतं आणि तें करण्याला आपलाच वाडा योग्य; कारण मुलींचा मेळा भरणं आणि त्यांची खाण्यापिण्याची व्यवस्था होणं हें आपल्या घरींच चांगलं होईल, असं जाणून मेळ्याला केळवणाचं नांव न देतां, पण मनांत तीच कल्पना योजून शरयूच्या आईनं, हा सोहाळा घडवून आणला होता.



चंदूच्या अभिनंदनाकरितां काय करूं आणि काय न करूं असें सर गंगाराम याना होऊन गेलें होतें. या सर्व कार्यक्रमाचीं सूत्रें त्यांनीं आपल्या हातीं घेतलीं होतीं. मासाहेब भाविक. त्यांचा आनंद कांहीं कमी नव्हता. पण त्यांच्या भावना उच्छृंखल नव्हत्या. त्यांनीं कोणाला न कळत चंदूला कांहीं निमित्तानें हळूच एकीकडे बोलावून त्याची दृष्ट काढली. पुजाऱ्याकडून देवाची महापूजा केली. पंचामृताचा महानैवेद्य दाखविला. त्याकरितां घरांतले रुप्याचे कलश झाडून सगळे हजेरीला आले होते. त्यांनीं कांही दक्षिणा वांटली. सुवासिनींना लुगडीं--खण दिले. पण हें सर्व त्यांनीं विशेष गाजावाजा न करतां केलें. आपला नवरा व मुलगा यांच्यावरील प्रेमाखेरीज इतर सर्व गोष्टींत समजूतदारपणाला शोभेल असा त्यांचा नेमस्तपणा मर्यादशीलपणा दिसून येत असे. त्यांना देवघर–माजघराबाहेरच्या सोहळ्यांत फारसें लक्ष घालण्याचे सर गंगाराम यांनीं ठेवलें नव्हतें. म्हणून त्यांनीं ज्योतिष्याला बोलावून, चंदूच्या लग्नाला तिथि चांगली कोणती लाभते, जुन्या नव्या दागिन्यांची योजना कशी करावी, सणगें उपयोगाचीं व अहेराचीं कोणतीं घ्यावीं, इत्यादि गोष्टींकडे आपलें लक्ष लावलें होतें.

सर गंगाराम यांनीं मात्र समारंभाचा हैदोस उडविला होता. सर्व वाडा शृंगारण्यांत आला, मांडव घालण्यांत आला, नव्या-जुन्या बैठकांची तजवीज सुरू झाली, तारा-पत्रें येऊं–जाऊं लागलीं. सर गंगाराम यांना बाहेरून येणाऱ्या अभिनंदनाच्या तारांपेक्षां त्यांनीं बाहेर स्वतः पाठविलेल्या आनंदप्रदर्शनाच्या ताराच अधिक होत्या. गंगाराम प्रासादाचे व्यवस्थापक बाहेरच्या व्यवस्थेंत गुंतले होते, तर आंत सरसाहेब व चंदूलाल हे आपापल्या कचेरीच्या खोलींत कागदपत्र पाहण्यांत व लिहिण्यांत गढून गेले होते.

सरसाहेबांनीं चंदूलाल पास झाल्याच्या तारा पाठविल्या; त्याशिवाय कांहीं पत्रेंहि पाठविणें त्यांना अवश्य वाटत होतें व तींच ते लिहीत होते. त्यांनीं नमुन्यादाखल पहिलें पत्र प्रांताच्या गव्हर्नराला लिहिलें, तें असें--

My dear respected Your Excellency,

I am graciously pleased to congratulate you for the conquest of my son Chandulal in the I. C. S. examination. He is a third in the class. God gives me great son, and now gives British Government great officer. He will face Your Excellency in few days and get orders of appointment. I hope he will receive your benefactions and stimulants.

यानंतर त्यांनीं खेळीमेळी असलेल्या जिल्हा कलेक्टराला पत्र लिहिलें. तें असें—

Dear Mr. Osborn,

Congratulations, my dear man, for my son passing your own examination. I hope you will one day come right-about-turn to Navalpore, and make me opportunist for introducing him to you. Bring with you large party for entertainment. My palace will give you full commode for any number. There will be grand feast and afterwards combustibles in all colours. If no tour programme fixed, you can easily manufacture special business to please me. My son may become your Assistant Collector, and then you will be his father and not me. Give my salams and secret inquiries to madam sab.

त्यांनीं तिसरें एक पत्र पोलीस चीफसाहेबाला लिहिलें तें असें—

Oh Bhai Simcox,

Shake hands with this your Pagal friend. My son

has toppled the ladder of glory and made me his father bahoot khoosh, bahoot khoosh ! Surely you never want special invitation to come to my house for any important occasion and eat, drink and make merry. Your badmash police work go hang for that day. D'ont forget to bring your sweet young wife with you. My son also is going soon to take a bridesmaid to his bed. Send my boy all your gratitude and good feeling for a brother District Officer, though remember he is I. C. S. man, and may have a right to tup you as superior one of these days.

( वरील पत्रें मूळ इंग्रजींतच वाचल्याशिवाय त्यांचें स्वारस्य कळणार नाहीं. म्हणून तें भाषांतर येथें दिलें नाहीं. निवळ मराठी वाचक त्याला मुकतील याला आमचा इलाज नाहीं. )

खुद्द सर गंगाराम यांच्या नांवच्या तारा व पत्रें येत तीं त्यांच्याकडे नेऊन देण्यांत येत. त्यातलें एकेक वाचून झालें म्हणजे ते तें कपाळाला लावून नीट तारेला टांचवून ठेवीत. सर्व जमवून झालीं म्हणजे मग चंदुलालास तीं दाखवून वासलात लावण्याचा त्यांचा विचार होता.

चंदुलालच्या नांवाचीं पत्रें व तारा येत तींहि अर्थातच थेट त्याच्याकडे नेऊन देण्यांत येत. औपचारिक अभिनंदनाच्या तारा व पत्रें त्याचीं, नजरेच्या एका झटक्यासरशीं, वाचून होत व तीं तो थोड्याशा हेटाळणीनेंच का म्हणा ना, टेबलावरच्या उघड्या ताडाच्या पेटींत फेकून देई. अनौपचारिक अशींहि कांहीं पत्रें होतीं. तीं त्यानें अधिक लक्ष लावून वाचलीं व एका बाजूला ठेवलीं. पण आज विलायतेच्या आयात टपालाचा दिवस होता हें पक्कें ध्यानांत असल्यामुळें त्या टपालानें येणाऱ्या पत्रांकडे तो ध्यान लावून बसला होता. परीक्षा पास झाल्याची तार विलायतेच्या एका हिंदी मित्राकडून, म्हणजे उदयशंकरकडून आल्यावर त्यानें त्या क्षणींच एक आभारप्रदर्शक तार त्याला पाठविली. पण त्याबरोबर दुसरीहि एक मोठी महत्त्वाची

तार विलायतेंतल्या दुसऱ्या एका व्यक्तीला पाठविली. तिच्या जबाबाची वाट तो आतुरतेनें पाहत होताच. पण पंधरा-अठरा दिवसांपूर्वी विलायतेहून निघालें असेल अशा आणि महत्त्वाच्या अशा त्या दुसऱ्या व्यक्तीच्या पत्राची वाट आज होती, व त्याकडे त्याचे डोळे लागून राहिले होते.

या व्यग्र मनःस्थितींत तो किंचित् त्रासिक बनला होता. यामुळें कोणी इतर कामाचें कांहीं त्याला येऊन विचारलें म्हणजे तो हिडिसफिडिस करी व दुरुत्तरानें त्याला वाटेला लावी.

" साहेब, घोडा तयार आहे. आणूं का ? "

" मरो तो घोडा आणि तूं. कुणी सांगितलं तुला या वेळीं यायला ! बाहेर रपेटीला जाण्याची वेळ मगाच टळली हें गध्ध्या, तुला कसं कळूं नये ? डोळे फोडून त्या घड्याळाकडं बघ म्हणजे कळेल. "

साईस निघून गेला. बटलर चहा विचारण्याला आला. त्याला उत्तर मिळालें, " यू ब्रूट, सारा दिवसभर चहाच ढोशीत बसतों कीं काय मी ! रपेटीला न जातां घरीं राहिलेला याने पाहिलं मला, आला चहा विचारायला ! केलाच असलास तर पाज टॉमी ( कुत्र्या ) ला. "

बिंबा सहज येऊन डोकावून म्हणाली, "दादा, आज बाहेर नाहीं गेलास फिरायला तो ? तुझी मोटार रिकामी असली तर जाऊन येणार आहें शरयूकडं कांहीं वेळ ! "

तिला मात्र उत्तर थोडें सौम्यपणानें मिळालें–" जा कीं मोटार घेऊन. रिकामीच आहे. पण उठल्या सुटल्या शरयूकडं येवढं काय काम ठेवलं आहे ? मैत्रिणीकडं झालं तरी जाणंयेणं बेताचंच ठेवावं. "

"होय रे; पण आई म्हणाली, शरयूच्या घरीं जाऊन मोत्याच्या बांगड्यांकरितां तिच्या हाताचं माप घेऊन ये. मग नको का जायला ? "

" होय का ? तर मी म्हणतों कीं जाऊंच नको म्हणून. बांगड्याबिगड्यांचीं कुणाचीं कसलीं मापं घेतां इतक्यांत रिकामटेकडीं ? आणि आपल्या घरांत जुन्या मोत्यांच्या बांगड्या थोड्या आहेत म्हणून नव्या करायच्या ? कांहीं नको याकरितां जायला. अन् हो, मी तुला सांगायला

विसरलोंच कीं ताई, मला थोडयाच वेळांत कदाचित् क्लबांत जावं लागेल. म्हणून मोटार लागेल. म्हणून ती नेऊं नको आत्तां."

कांहीं वेळानें स्वतः मासाहेबांची फेरी झाली. आपली आई खोलींत येऊन खुर्चीवर बसून बोलूं लागेल तर अधिक वेळ घेईल हें जाणून, आईला पाहतांच तो आपल्या खुर्चीवरून उठला आणि स्वाभाविक दिसेल अशा रीतीनें खोलीच्या दारांत उभा राहून बोलूं लागला, "कां मासाहेब, आज शिवमंदिराकडं खेप झाली नाहीं वाटतं ?"

"नाहीं रे बाबा" मासाहेब म्हणाल्या, "आतां घरचीं कामं लागलीं आहेत वाढायला. तीं पुरीं होईपर्यंत शिवमंदिराची खेप अगदींच न थांबली तरी होईल ती चुकूनमुकून. बिंबाला शरयूच्या घरीं पाठविणार होतें तिच्या हाताचं माप घ्यायला. तें तूं तिला नको कां म्हटलंस ? तुझी गाडी रिकामी असली तर पहा म्हणून विचारायला तुझ्याकडं तिला पाठविली होती. तूं काय म्हणालास तें तिला कांहीं कळलं नाहीं नीटसं. म्हणून म्हटलं आपणच जाऊन विचारावं. अरे, घरीं जुन्या बांगड्या मोत्याच्या आहेत खऱ्या. पण लग्नसमारंभाला जुने का दागिने कुणी वापरतं ? वास्तविक तुझ्यापर्यंत या गोष्टी येण्याचं कारण नाहीं. पण कारणानं निघाल्याच म्हणून मोकळ्या मनानं विचारतें हां. तसंच मोकळ्या मनानं सांग. तुला मोत्याच्या बांगड्या पसंत नसल्या तर हिऱ्यांच्या करूं. त्याचीहि मजजवळ तयारी आहे. असे जिन्नस एकेकदांच करावे लागणार; कारण शरयूच्या मनगटाची वाढ आणखी व्हायची नाहीं."

"आई" चंदुलाल म्हणाला, "माझ्यापर्यंत या गोष्टी आल्या म्हणूनच मी तुला थोड्या मोकळ्या मनानं सांगतों कीं, तुम्हीं योजिलेला बेत थोडा लांबणीवर टाकाल तर बरं होईल."

"वा ! मला तर आतां थांबायचं कांहींच कारण दिसत नाहीं कीं ! परीक्षेची तार येण्याची वाट पाहायची म्हटलंस तें योग्य होतं. पण ती तार आल्यावर उगीच वेळ गमावणं बरं नव्हे. मीच काय, पण शरयूची आईहि उतावीळच झाली आहे म्हणेनास आणि तें योग्यच आहे. चार वर्षांपूर्वी

तूं विलायतेला जाण्याआधींच हें कार्य उरकून घ्यायचं होतं आम्हांला. पण आल्या तशाच्च अभावित अडचणी. आतां त्याचं बोलून काय उपयोग ? पण चाल चंद्र, आतां आमच्या मनासारखं करायला वेळ लावूं नको बाबा. तुम्हा विलायतेसून आलेल्या मुलग्याना आमच्या जुन्या पिढीच्या मुलग्यां-सारखी लग्नाची उताविळी नसते हें ठाऊक आहे मला; पण आम्ही आहों ना जुन्या पिढीचीं माणसं तुझीं अजून ! म्हणून आमच्या मनासारखं थोडंसं वाग. कांहीं बिघडत नाहीं त्यांत, समजलास ! पुढच्या पंधरवड्यांत चांगले लाभणारे मुहूर्त निघताहेत असं उपाध्येबुवा मगाशींच सांगून गेले मला. "

" पण आई ! घरीं लग्नाचा मुलगा आणि लग्नाची मुलगी अशीं दोघं असलीं तर आधीं मुलीचं लग्न करावं आणि मग मुलाचं, अशी रीतच आहे कीं नाहीं ? म्हणून म्हणतों, बिंबाचं लग्न आधीं करूं आणि मग — "

हें बोलतांना चंदुलाल किंचित् हसत होता. पण हें आपलं हसणं कपटाचं आहे, खऱ्या मनाचं नव्हे, आपण तो एक बहाणा करीत आहों, केवळ वावदूकीचा डाव लढवीत आहों, याची जाणीव त्याच्या मनांत त्याला डाचत होती.

मासाहेबांना थोडा पेचच पडला. पण त्यांनाहि उत्तर सुचलें वेळेवर. त्या म्हणाल्या, " जवळजवळ समवयस्क उपवर मुलीचं लग्न आधीं करणं ही रीत आहे खरी. पण ती कशावरून पडली ? तर मुलीचं लग्न जुळविण्याला श्रम पडतात. तें संकटासारखंच वाटतं. म्हणून तें निस्तारलं म्हणजे मग मुलग्याचं लग्न. त्याला श्रम नाहींत, काळजी नसते. वराची मागणी घालणारे आपल्या पायानं चालून घरीं येतात.पण आमच्या बिंबाच्या लग्नाची काळजी का वाटण्या-सारखी आहे कुणाला ? अरे, तुला माहीत नाहीं, आम्ही तिला स्थळ पाहण्या-ऐवजीं खासगी गुप्त रीतीनं तिचीच मागणी आमच्याकडं पुष्कळांकडून आली. नक्षत्रासारखी मुलगी. पण बिंबानंच हट्ट धरला कीं, दादाचं आधीं लग्न झाल्याशिवाय मला माझं करायचं नाहीं आणि तुझं लग्न चार वर्षांआधीं ठरलेलंच राहिलेलं आहे, तें आधीं करूं; मग बिंबाचं. "

" आई, तें खरं; पण कीनाहीं माझीं दुसरींहि कांहीं कारणं आहेत हें कार्य लांबवायला. तीं तुझ्याजवळ थोडक्यांत सांगून होणार नाहींत. पण तूर्त हें राहूं दे एवढं मात्र खरं ! "

" माझ्याजवळ सांगायला काय झालं ? आणि त्याला वेळ तो कितीसा लागणार ? चल येत असलास तर आतांच माझ्याबरोबर असाच माडीवर. आपण बोलत बसूं. मला हवा तेवढा वेळ आहे. पण माझ्याजवळ मोकळं मन होतच नसलं तर तुझ्या वडिलांजवळ तें मोकळं कर. तूं त्यांच्या मांडीला मांडी लावून विडया ओढीत बसण्याइतका प्रतिष्ठित झालास, तर मग मनाला मन लावून मोकळेपणानं बोलण्याइतका प्रतिष्ठित बरोबरीच्या नात्याचा झालासच. "

आपण आईजवळ मोकळ्या मनानं बोलूं इच्छीत नाहीं असं तिला वाटूं देणं बरं नव्हे हें चंदुलालच्या लक्षात आलं; म्हणून तो म्हणाला, " नाहीं, नाहीं. आई, तसं नाहीं. तुझ्याजवळ मी मोकळ्या मनानं बोलणार नाहीं असं कसं होईल ? मात्र या क्षणीं नाहीं. मी टपालाची वाट बघत बसलों आहें, म्हणून आतां वेळ नाहीं इतकंच ! "

" पण आज रविवार ना ? "

" विलायतच्या टपालापुरता रविवारींहि बटवडा करतात. "

मासाहेबांच्या मनासारखी गोष्ट झाली नाहीं. पण करतात काय ? आधीं टपाल म्हटलं कीं, सगळ्या कामांनीं त्याला वाट दिली पाहिजे आणि विलायतेचें टपाल म्हटलें कीं, मग कांहीं बोलायलाच नको !

मासाहेब तोंड फिरवून निघून गेल्या आणि चंदुलाल पुनः खोलींत जाऊन खुर्चीवर बसला, तोंच शिपायानं विलायतच्या टपालाचीं पत्रें त्याच्या मेजावर आणून ठेवलीं. आधाशाप्रमाणें त्यानें तीं चाळलीं, आणि नक्की ओळखीच्या अक्षराचें एक गुलाबी रंगाचें पाकीट उचलून ओठाला लावून त्यानें तें फोडलें. आंतून सुंदर जनानी अक्षरानं लिहिलेलं पत्र निघालें. तें उघडून तो वाचूं लागला. पत्र असें होतें—

"12 August 1940

" Sweetest and Dearest Darling,

" Since you left me and England behind you, my spirit is like a wandering bird ever on its wings. It hovers, without rest, in the starry sphere to catch a glimpse of you and steal a little news about you.

I am awaiting the result of your I C. S. examination, with as much eagerness and anxiety here as you may be doing there. Eagerness yes. But perhaps you will object to the word anxiety. Yes, I know. It would be an insult to your intellectul brilliance to doubt your success even for a single moment. But love is a great coward.

I have begun, now that you have gone back to India, to dream dreams and conjure up images about that country; because that is soon to become my country also. Pr. Max Muller, it is said, loved India all his life without, poor fellow, ever getting an opportunity to see it with his own eyes. I have loved India for your sake, as deeply as that Sanskrit Pandit did for her culture; but how immensely greater must be my good fortune in that I can spend my life hereafter in India and in your company !

Tell me what a great tyrant you propose to be to me after our marriage. What sort of dresses will you dictate for my apparel ? And am I to put on my forehead, that little saffron mark to declare to the world that I am your own wedded wife? Of course I like the long flowing robes of Indian ladies. And as for the saffron mark, well, I will gladly adopt it, discarding the lip stick. ' Among the Romans you must do as the Romans do '—

a very wise saying indeed. For, are not consonance and harmony the very essence of culture?

The three hundred pounds which you had sent by wire were spent in no time. Another telegraphic postal order (C/o Postmaster Marble Arch) for the same amount will be convenient. I know I should be foolish to hurry you up or hustle you. But after the result of your examination, I would like to keep myself ready for receiving marching orders for India at any moment.

I do not care for unsnatched kisses. Do you? If so, I shall ask my spirit, now on its wings, to drop down a few on your bed, as father Christmas drops down chocholates in children's socks over-night.

Yours ever
MARY WODEHOUSE"

मेरीच्या इंग्रजी पत्राचें भाषान्तर—

" ता. १२ ऑगस्ट, १९४०

" माझ्या गोड गोड आणि प्रियोत्तम प्रियकरा—

" तूं इंग्लंडला आणि मला सोडून गेलास तेव्हांपासून माझा प्राण किंवा आत्मा एखाद्या पक्ष्यासारखा झाला आहे. म्हणजे त्याला पंख फुटले आहेत आणि तो सदा हवेंतच फिरत राहातो. खालीं येतच नाहीं. विश्रान्ति न घेतां तो उंच तारकांकित गगनांत जातो. हेतू हा कीं, टेहळणीला इतक्या उंच गेल्यावर तरी चुकून तुझें ओझरतें दर्शन होईल, आणि तुझी इवलिशी तरी खबर मिळेल. तुझ्या आय्. सी. एस्. परीक्षेच्या निकालाकडे तिकडे तूं जितक्या उत्सुकतेनें व काळजीनें डोळे लावून बसला असशील तितकीच इकडे मीहि बसलें आहें. पण लिहितांना थोडी चुकलें रे बाबा! कारण उत्सुकता कबूल; पण म्हणशील, वेडे, ' काळजी ' कसली? आणि तेंही खरेंच आहे. कारण परीक्षेंतील तुझ्या यशाबद्दल यत्किंचितहि शंका घेणें

म्हणजे तो तुझ्या तेजस्वी बुद्धिमत्तेचा अपमान करणें होईल. पण काय करावें बाई ! प्रेम हें माणसाला फार भित्रें करून सोडतें.

"आतां तूं हिंदुस्थानाला परत गेलास तेव्हां मलाहि त्या देशाविषयीं स्वप्नें पडावयास लागलीं असून, तिकडच्या गोष्टीविषयीं कल्पनाचित्रें मनश्चक्षुपुढें उभीं राहूं लागलीं आहेत. कारण तो देश आतां लवकरच माझाहि होणार आहे, नव्हे काय ? सांगतात कीं, प्रो. मॅक्सम्यूलर या पंडितानें सर्व जन्मभर हिंदुस्थानवर प्रेम केलें; पण त्या बिचाऱ्याला हिंदुस्थान कसें तें एकदांहि डोळे भरून पाहावयाला सापडलें नाहीं. भारतीय संस्कृतीमुळें पंडित मॅक्स-म्यूलर यांचें हिंदुस्थानावर प्रेम होतें, तसें त्या देशावरील माझें प्रेम तुझ्या-वरील प्रेमाखातर आहे. पण त्या पंडितापेक्षां मी कितीतरी अधिक भाग्यवान नव्हें काय ? कारण यापुढें मला माझा जन्म हिंदुस्थानांत आणि तुझ्या संगतींत काढतां येईल.

"पण आतां मला साग कीं, आपलं लग्न झाल्यावर माझ्यावर झोटिंग-शाही सत्तेचा जुलुम किती करण्याचा तुझा विचार आहे ? म्हणजे उदा-हरणार्थ, तिकडे मी कोणत्या प्रकारचीं वस्त्रें वापरलीं म्हणजे माझा पोषाक तुला आवडेल ? आणि मी तुझी लग्नाची बायको म्हणून जगाला जाहीर करणारा तो केशरी तिलक लावलाच पाहिजे का रे ? आतां पोशाकाविषयीं म्हणशील तर हिंदुस्थानांतील स्त्रिया ज्या लांब साड्या नेसतात, आणि ज्यांचा घोळ किंचित् जमिनीवर पसरतो, त्या मला खरोखरच आवडतात. पण कपाळावरील केशरी टिळ्याचें मात्र तसें नाहीं. तथापि तुझ्याकरितां तोहि मी लावीन. काय करावयाचें बाबा ! एक आलें, एक गेलें म्हणावें ! तुझा तो केशरी तिलक मी घेईन आणि त्याऐवजीं माझे ओठ रंगविण्याची तांबड्या खडूची कांडी टाकून देईन. मग झालें ना ! कारण म्हणच आहे कीं 'रोमला जायचें तर रोमन लोकासारखं वागण्याची तयारी हवी' आणि खरं पाहिलं तर परिस्थितीशीं एकरूप होणं, तिच्या सुराशीं सूर मिळवणं, हाच संस्कृतीचा आत्मा नव्हे काय ?

"असो. तूं तारेनें पाठविलेले तीनशें पौंड केव्हांच संपले.आणखी तितकेच

लवकर पाठविलेस तर सोयीचें होईल. मी कांहीं तुला कोणत्याहि प्रकारें घाई किंवा गडबड करूं इच्छित नाहीं. पण आपलं वाटतं कीं, तुझ्या परीक्षेचा निकाल लागून तुझं पत्र आलं कीं लगेच, तो एखादा लष्करी हुकूम मानून मीं तत्क्षणीं हिंदुस्थानकडे निघण्याची तयारी ठेवावी हें बरं.

"न फसवून घेतलेलीं चुंबनें मला आवडत नाहींत आणि तीं फसवून घ्यायचीं म्हणजे तूं समक्ष जवळच हवास. मला राहिलं, पण तुला तीं तसलीं आवडतात का सांग ? म्हणजे माझा प्राणरूपी पक्षी वर आकाशांत संचार करीत आहे असं जें वर म्हटलं आहे, त्याला सांगेन कीं, तुला न कळत तुझ्या बिछान्यावर माझीं चुंबनें नेऊन टाक. पांढरा दाढीवाला ख्रिस्टमस 'बाबा' नाहीं का दरवर्षीं ख्रिस्टमसच्या रात्रीं, लहान मुलांच्या पायमोजांत चॉकोलेटच्या वड्या नेऊन टाकीत, तसंच आपलं हें !

तुझी अखंड प्रियकरीण

**मेरी वोडहाऊस"**

*　　*　　*

हें पत्र चंदुलालनें खालीं न ठेवतां तीनदां वाचलें. त्यावर त्याचे डोळे खिळून राहिले होते. पत्र वाचून झाल्यावर त्यानें तें जाकिटाच्या आंतल्या खिशांत घातलें. आतां पुढच्या कामाला तयार झालों असें दर्शविण्याकरितां त्यानें बुटाची टांच फरशीवर वाजविली, आणि सिगारेट पेटवून धूर सोडीत तो खोलीबाहेर पडला.

० ० ०

## वज्राघात　:　:　८

आज नंदभुवनांत संध्याकाळीं अभिनंदनसमारंभांतली पहिली खाजगी मेजवानी व्हावयाची होती. त्याकरितां सर्व सिद्धता झाली. देशी-विदेशी, स्वजातीचे-परजातीचे सुमारें तीस पाहुणे भोजनगृहाला लागून असलेल्या

बैठकीच्या दिवाणखान्यांत खुर्चीवर येऊन बसले होते आणि रात्रीच्या मेजवानी-च्या आधीं युरोपियन पद्धतीनें जे मद्यप्राशनादि प्रकार क्षुधा उद्दीपित करण्या-साठीं करतात ते कांहींचे सुरू होते. कांहीं लोक मद्यप्राशनाला तिरस्कारणारे असल्यामुळें त्यांना हें पाहून कसेंसेंच वाटलें. म्हणून त्यांनीं खिडकीबाहेर पाहण्याचें निमित्त करून तोंडें फिरविलीं होतीं. धूम्रपानहि यथेच्छ सुरू होतें; यामुळें ज्या कोणाला त्या धुराची घाण येई ते तसेच निमित्त करून खिडकी-बाहेर तोंड फिरवून उभे राहत.

सर गंगाराम आणि चंदुलाल यांच्या येरझारा या दिवाणखान्यांत मधून मधून होत असून ते कोणास काय पाहिजे याची चौकशी करीत. मधून मधून चिठ्ठीचपाटी येई व त्याचें उत्तर तोंडीं किंवा तांत्रिक उभ्या उभ्या लिहून दिलें जाई. पण सर्व मंडळी जमल्यावर सर गंगाराम आपल्याला काम आहे असें सांगून रजा घेऊन अदृश्य झाले. त्यांना या तरुणांच्या मेजवानीला पूर्ण मनमोकळीक द्यावयाची होती.

चंदुलाल व सर गंगाराम यांच्या धार्मिक मतांमध्यें दोन पिढ्याइतकें अन्तर सहजच पडलेलें होतें आणि या हिंदु कुटुंबांत मासाहेबांचाहि समा-वेश असल्यामुळें सामाजिक चालीरीतींचें 'तिरपगडें' शब्दशः उमटत होतें. असें असलें तरी एका प्रेमजन्य सहिष्णुतेच्या आधारावर सर्व कुटुंब-व्यवहार बिनबोभाट चालू होता.

सामन्यांच्या आधुनिक खेळांत एक प्रकार असा असतो कीं खेळांतील दोन गड्यांपैकीं एकाचा उजवा व एकाचा डावा पाय जखडून बांधावयाचा; आणि दोन सुटे पाय व तिसरा हा जोडपाय मिळून तीन पायांनीं या जोडीनें सर्वांत लवकर भुंग्याला जाऊन शिवून येण्याचा प्रयत्न करावयाचा. सर गंगाराम यांच्या कुटुंबाच्या खेळांत दोहोंऐवजीं तीन खेळगडी होते, व प्रत्येकाचा एक एक पाय दुसऱ्या एकाच्या पायाशीं जखडला जाऊन ही एक चार पायांची व्यक्ति निर्माण झाली होती आणि खाटेची चौपाई एका पायानें ओढली असतां तिचे इतर तीन पाय त्याच दिशेला फर-फटले जातात. पण प्रत्येक पायाला तीच संधि मिळण्याचा हक्क व संभवहि

असतो. नव्या युगांतील संयुक्त हिंदु कुटुंब ही एक अशीच चारपाई आहे. सर गंगाराम यांच्या कुटुंबांतील तीन माणसांची चारपाई असेंच जीवन कंठीत होती.

चंदुलाल हा क्षत्रिय म्हणून मांसाहारी; पण विलायतेहून आलेला म्हणून गोमांसालाहि त्याची तयारी असे ! त्यानें परदेशाहून येतांच एक किरिस्ताव नोकर घरीं ठेवला, आणि ताज्या अंडयांचा खुराक चालू राहण्याकरितां बागेच्या एका कोपऱ्यांत कोंबडयांचें एक खुराडें उभें करून दिलें. एकल्या दुकल्या खाणाऱ्याकरितां घरांत कत्तलखाना काढावा लागत नाहीं. चंदूचा किरिस्ताव खाटिक बाजारांतून धन्याच्या आवडीचे पदार्थ आणून शिजवून त्याच्या खोलींत त्याला वाढी. तसेंच त्याच्या खाजगी कपाटांत मद्याच्या बाटल्यांचा सांठा असे.

सर गंगाराम हे क्षत्रिय खरे; पण त्यांनीं मांसाहाराचा निषेध पाळला नव्हता इतकेंच. एरवीं प्रायः ते शाकाहारीच असत. पण मांसाहारी माणसाच्या संगतीला एकत्र टेबलावर बसून जेवण्याला, म्हणजे मांसाचे पदार्थ समोर आणून कोणी खाल्लेले पाहण्याला त्यांची तयारी होती. सर गंगाराम हे शाक्तधर्मी क्षत्रिय असल्यामुळें शक्तिदेवीचा नैवेद्य म्हणून मद्यप्राशन करीत. इतकेंच कीं, त्या प्रसादाचें भांडें एखाद्या लहान रुप्याच्या वाटीएवढें असावयाचें, तें केव्हां केव्हां लहानशा रुप्याच्या फुलपात्राएवढें असलें तरी त्यांना चाले. ते स्वतः धूम्रपान करीत असल्याचें मागें सांगितलेंच आहे. त्यांना साहेब लोकांपुरता स्पृश्यास्पृश्य भेद जाणवत नव्हता. पण चंदूनें ठेवलेल्या ख्रिस्ती नोकराकडून ते कांहीं एक आपलें काम करून घेत नसत व त्याला सदरेबाहेरच्या बाहेर ठेवीत.

मासाहेब क्षत्रिय व त्यांचा धर्मपंथ शाक्त हें त्यांना मान्य होतें. पण नवरात्रांत अष्टमीला तीर्थ म्हणून एका संध्येच्या पळीभर मद्यप्राशनापलीकडे त्यांची मजल कधीं गेली नाहीं. तीच गोष्ट मांसाहाराची. त्या सर्वस्वीं सनातनी मताच्या; यामुळें धार्मिक बाबतींत आपल्या कामांत त्या नवऱ्याला किंवा मुलाला हात घालूं देत नसत आणि अशा कामीं त्यांची धर्मनिष्ठा

प्रेमाहून अधिक कठोर ठरे. यामुळें नंदभुवनामध्यें वर्षांतील निरनिराळ्या नैमित्तिक कार्यक्रमांत निरनिराळ्या वेळीं तीन-तीन प्रकारच्या पंगती उठत.

असो. आजचा मेजवानीचा प्रसंग सर गंगाराम व चंदुलाल या दोघांचा मेळ पडण्यासारखा होता. पण मासाहेबांना तो आवडण्यासारखा नसल्यामुळें त्यांनीं आपल्या एकदोन खास नोकरांशिवाय बाकी सर्वांना या मेजवानीच्या दिमतीला दिलें. पण स्वतःला मेजवानीचें दर्शनहि अप्रिय म्हणून त्यांनीं माजघरचें दार लावून घेऊन गढून जाण्यासारखीं आपलीं कामें चालविलीं.

रात्रीच्या आठाचे ठोके पडल्याबरोबर जेवणाची घंटा झाली व तयारीची वर्दीहि आली. त्याबरोबर दिवाणखान्यांतला एकेक पाहुणा भोजनगृहाकडे सावकाश जाऊं लागला. चंदुलाल एका जिवलग मित्राशीं बोलण्याकरितां एका कोचाच्या टोकावर आधारून उभा होता. इतक्यांत तारखात्याचा एक शिपाई तार घेऊन आला. ती चंदूलाल याच्या नांवची असल्यामुळें तो ती घेऊन आपल्या कचेरीच्या खोलींत गेला. त्यानें सही करून देऊन ती घेतली. शिपाई निघून गेला. चंदूनें ती तार फोडून तिजवर नजर टाकतांच, काय झालें कुणास ठाऊक, तो कोलमडून कोचाखालीं कोसळला. हें दुरून दृष्टीस पडतांच त्याचा एक स्नेही डॉक्टर जालंदर धावून जवळ आला. त्यानें चंदूला सावरून धरून त्याच्या अंगाखालीं हात घातला, आणि हा प्रकार काय आहे हें पाहण्याकरितां त्याच्या हातांतील कागद घेण्याचा प्रयत्न केला. पण त्यासरशीं चंदूनें घाईनें हात मिटून ती तार चुरगळून आंतल्या जाकिटाच्या खिशांत कोंबली. तार लपविण्याच्या प्रयत्नानें आलेल्या उसन्या बळानें तो उठून उभा राहिला, आणि ' तूं जा, मी थोड्या वेळानें येतों ' असें आपल्या मित्राला म्हणून, तडक जिना गांठून, माडीवर आपल्या खोलींत जाऊन त्यानें दार लावून घेतलें, व तो आरामकोचावर आडवा पडला.

खालीं मेजवान लोक टेबलाशीं जाऊन बसले होते आणि आपापले हातरुमाल उघडून मांडीवर टाकून जेवणाला सिद्ध झाले होते. डॉक्टर जालंदरहि येऊन टेबलाशीं आपल्या जागेवर जाऊन बसला. ' तूं जा, मी

इतक्यांत येतों ' असें चंदूनें सांगितलें असल्यामुळें, तो आतां येईल, मग येईल अशी तो त्याची वाट पहात बसला. मात्र आपण पाहिलेल्या दृश्याचा उच्चार त्यानें मनांतल्या मनांत गिळला. बोभाटा होऊं नये अशी त्याची इच्छा होती. पण पांचदहा मिनिटें झालीं तरी चंदु येत नाहीं असें पाहून डॉक्टर जालंदर म्हणाला, " मी वर जाऊन चंदूला घेऊन येतों. तुम्ही सुरू करा. चंदू एखादी जरूरीची चिठ्ठी खरडण्याकरितां वर गेला असेल ! " असें म्हणून तो माडीवर गेला. त्यानें चंदूच्या खोलीचें दार ठोठावलें. आंतून उत्तर येईना म्हणून पुनः जोरानें दार ठोठावलें. तेव्हां चंदूनें आंतून येऊन दार उघडलें. जालंदरानें पाहिलें तों चंदूचा चेहरा शंभर टक्के उतरला असून त्याच्या डोळ्यांतून अश्रू गळत होते.

जालंदर म्हणाला, " अरे, तं असा कां ? काय झालें काय ? तुला एकदम घेरी कशानें आली ? वाईट कशाचें वाटलें ?"

चंदु म्हणाला, " मी तें कांहीं सांगूं शकत नाहीं आणि खालींहि येत नाहीं. जिन्याखालीं उतरण्याइतकीही माझ्या पायांत आतां शक्ति नाहीं. "

जालंदर म्हणाला, " असं करूं नको; वेडा कुठला ! मी तुला संभाळून घेऊन चालतों. खालीं सगळी पंगत टेबलाशीं तुझ्याकरितां खोळंबून बसली आहे; तेव्हां असं करून कसं चालेल ? त्यांचा विरस होईल. तो थांबवायचा तर तुला, उसनं का होईना, पण अवश्य तें धैर्य अंगीं आणून, माझ्या बरोबर खालीं येऊन ही मेजवानी पार पाडलीच पाहिजे. लक्षांत ठेव कीं, मलाहि तूं आपल्या आजाराचं कारण वाटलं तर आतांच सांगूं नको, गुप्त ठेव. पण तूं आतां खालीं न आलास तर या साध्या गुप्ततेचाच एवढा बोभाटा होईल, एवढा नगारा वाजेल कीं तो तुझा तुला मग ऐकवणार नाहीं. हा एक प्रसंग कसा तरी सांवरून साजरा करून टाक. मग पुढं काय करावयाचं याचा विचार करायला तुला सगळी रात्र मोकळी आहे. तुझं संकट काय आहे हें मला कळत नाहीं. पण प्रस्तुत प्रसंगाचं महत्त्व मात्र मला कळतं. तूं समंजस आहेस म्हणून याहून तुला अधिक काय सांगूं ? "

तरीहि बराच वेळ चंदुलाल माडी उतरण्याला तयार होईना. तो म्हणे– "कांहीं केल्या माझे हे अश्रू मला आवरणार नाहींत आणि तेथें ते कोणाला दिसले म्हणजे तरी चौकशी सुरू होणारच. त्यापेक्षां दुसरें कोणी वर येण्यापूर्वीं तूंच खालीं जा. मंडळींना काय वाटेल ती सबब सांग. पण माझी वाट न पाहतां तुम्ही जेवण उरकून घ्या."

जालंदर म्हणाला, "वेडा आहेस तूं चंदूलाल. तुला घेरी आलेला असाच टाकून बाकीचे लोक जेवतील तरी कसे? शिवाय तुझ्या घेरीची बातमी ऐकून तुझ्या वडलांसुद्धां अनेक लोक तुझ्या समाचाराला वर येऊं लागतील आणि मग केवढा गोंधळ माजेल? त्यापेक्षां मनाचा निर्धार करून तूंच खालीं चल, टेबलाशीं बैस. कांहीं खाऊं पिऊं नकोस. सिगारेटचा धूर छातींत गेल्यानं तुला किंचित् घेरी आली असं सांगून तें सगळं मी कसं तरी निभावून नेईन. ही मेजवानी होऊन मंडळी सर्व घरोघर गेली म्हणजे मग तूं व मी दोघेच दोघे बसून बोलूं."

असं म्हणून डॉक्टर जालंदरनें खिशांतला रुमाल काढून, पाण्यानें भिजवून, चंदूचे डोळे व गाल पुसले आणि त्याला बळेंच उठवून, खाकेंत हात घालून, खालीं नेऊन त्याच्या खुर्चीवर बसविलें आणि इतरांकडून होणाऱ्या प्रश्नांच्या सरबत्तीच्या संकटांतून एकदम मोकळें होऊन जाण्याकरितां मोठ्यानें म्हटलें, "हें पाहा! छातींत सिगारेटचा धूर गेल्यानं चंदूला घेरी करते आहे. तरी डॉक्टर या नात्यानं मी सांगतों कीं, आपण तसं कांहीं नाहीं असं समजून जेवण होऊं द्यावें, कोणी त्याच्याशीं बोलूं नये, किंवा त्याला बोलवूं नये. म्हणजे कांहीं वेळानं तो वर जाऊन निजेल आणि झोप झाल्यावर अगदीं पहिल्यासारखा होईल."

झालेला खरा प्रकार या डॉक्टर मित्राशिवाय कोणीच पाहिला नव्हता आणि घेरीचें कारणहि डॉक्टरच सांगतो म्हणून तें सर्वांना खरें वाटलें. कसेंहि झालें तरी मेजवानींतला आनंद सारा निघून गेला. अगदींच अबोल्यानें जेवलेलें वाईट दिसतें म्हणून कोणी एकादें दुसरें वाक्य बोले. पण त्याचा रोख इतकाच असे कीं, त्यामुळें चंदुलालची विनोदबुद्धि किंचित् जागृत

झाली तर व्हावी व त्याला हसूं आल्यानें घेरी उतरावी. म्हणून कोणी 'आज बाजारांत एका वानरानें गुप्तपणें दुकानांतले कपडे उचलून नेले आणि चोराची हूल उठविण्याला तो कारण झाला' याचें खूप मजेदार वर्णन केलें. एकानें कोर्टांतल्या गमती सांगितल्या. तो म्हणाला, "आज तीन वाजेपर्यंत कोर्टाचें काम सुरूच होईना. तेव्हां बाररूममध्यें शिरस्तेदारानें येऊन सांगितलें कीं, 'कोर्टाची बायको' बाळंत होऊं घातली आहे; म्हणून कोर्ट बंद आहे." बाररूममधील चाहटळ लोकांना काय? मुन्सफ साहेबांची बायको म्हणण्याऐवजीं 'कोर्टाची बायको' हा शब्दप्रयोग चुकून झाल्यामुळें, विनोदी बुद्धीला त्यावर निरनिराळ्या कल्पना सुचूं लागल्या. प्रतिभा हास्यलहरी उठवूं शकेल तितक्या व तशा उठल्या. मग हें झाल्यावर कोणी बहुरुप्याच्या सोंगानें आपण आज कसे फसलों तेंच सांगितलें. कोणी आपल्या बायकोनें विस्मरणानें स्वैंपाकांत तिखट-मिठाचा अत्याचार कसा केला हें तोंडी तिखट-मीठ लावून सांगितलें. डॉ. जालंदराची खुर्ची चदुलालशेजारींच असल्यानें तो मात्र या विनोदांत भाग घेत नव्हता. चंदूचा धीर खचल्याचें प्रदर्शन टळावें, त्याला आश्वासन-उत्तेजन मिळावें, याकरितां एखादा शब्द मधून मधून, कोणाला ऐकूं न जाईल अशा रीतीनें, त्याच्या कानावर हलक्या आवाजानें जालंदर घालीत होता. सुदैवानें सर गंगाराम हे या वेळीं प्रांतसाहेबाला घेऊन बगिच्यांत गेले होते, व पुढें त्यांच्याच घरीं भोजनाला जायचें आहे असें सांगून घरच्या मेजवानीला ते गैरहजर होते. चंदूच्या खास समवयस्क मित्रांची मेजवानी, त्यांत आपण नसलेले बरें, असें वाटून त्यांनीं आपण होऊनच आज हा वेगळा मार्ग काढला होता. यामुळें अधिक चौकशी, अधिक धांदल व्हावयाची ती सर्व टळली आणि डॉक्टर जालंदरच्या समयसूचकतेमुळें सर्व कांहीं नीट निभावून मंडळी घरोघर गेली.

नंतर हे दोघे फिरून माडीवर गेले तेव्हां चंदु म्हणाला, "डॉक्टर, तुझ्या प्रसंगावधानाबद्दल मी फार आभारी आहें. पण तुझ्याशींहि आतां मला अधिक बोलवत नाहीं. पण तूं जशी माझ्याकरितां कांहीं भलती बतावणी

केलीस तशी मला सुचत नाहीं व करायचीहि नाहीं. म्हणून मी इतकेंच सांगतों कीं, माझ्या दुःखाचें कारण हें एक माझें गुप्त रहस्य आहे असं समज आणि तूं माझा प्रिय मित्र आहेस, तरी तें तुझ्याजवळहि प्रगट करण्याची माझी इच्छा नाहीं. इतकं स्पष्ट सांगितल्यावर तुला पुरें व्हावें. आपलीं रहस्यें गुप्त ठेवावीं हा अधिकार जसा तम्हा डॉक्टर लोकांना आपल्या रोग्यासंबंधानें आहे, तसाच व्यक्तिमात्रालाहि स्वतःसंबंधानें तो अधिकार नाहीं काय ? तुम्ही शरीरभावनेचे उपचार करणारे डॉक्टर; पण मनोभावनेचा रोग झालेल्या मनुष्याचा डॉक्टर स्वतः तोच होऊं शकतो. दुसरा कोणी होऊं शकत नाहीं. तर कृपा कर आणि आतां जा. मला सध्यां स्मेलिंग सॉल्टपेक्षा अधिक कांहींहि उपचार नको आहे. झोपहि येईल; पण जरा उशिरानें येईल इतकेंच. मासाहेबांनीं माजघरचें दार संध्याकाळपासूनच लावून घेतलं आहे. कोणत्याहि मेजवानीनंतर माझी चौकशी त्या रात्रीं करण्याच्या भानगडींत पडूं नये हें त्यांना ठाऊक असतं आणि बाबाहि रात्रीं उशीरा परत येतील. तात्पर्य, आतां माझा मी एकटा राहणार. मात्र तूं मला क्षमा कर. ''

चंद्रनें इतकें ठासन सांगितल्यावर डॉ. जालंदरला सहजच वाटलें कीं, आतां येथें अधिक थांबून बोलत बसण्यांत अर्थ नाहीं. वैद्यकदृष्ट्याहि एकांत हें आतां चंद्रला औषधच होईल. तेव्हां तो उठला, चंद्रच्या पाठीवर त्यानें स्नेहभावानें थापट मारली, आणि म्हणाला, “ संकटं सर्वांवर येतात आणि कोणाच्या संकटाची इतर कोणी फारशी चिकित्सा करूं नये हें खरंच आहे. पण ‘ धीर सो गंभीर ’ एवढंच तुला मित्राच्या नात्यानं सांगतों ” असें म्हणून तो बाहेर पडला व त्यानें खोलीचें दार लावून घेतलें.



## गुरु-संशोधन : : ९

त्या रात्रीं चंदूला दाराची कडी काढावी लागली नाहीं. त्याला कोणी उठवलें नाहीं. त्यानेंहि कोणाला हाक मारली नाहीं. तो अंथरुणावर एकसारखा तळमळत पडला होता. त्यानें आपल्या अश्रूंनीं एकामागून एक अशा दोन उशा भिजविल्या. या कुशीवरून त्या कुशीवर तो एकसारखीं लोळणें घेत होता. मधून मधून तोंड धुवून डोक्यावर पाणी शिंपडून परत अंथरुणावर येऊन पडे.

आतां कोणी आपणाकडे येणारें नाहीं असें पाहून संध्याकाळीं त्याच्या हातीं पडलेली विलायतची तार उघडून टेबलावर ठेवली, आणि त्यानजीकच विलायतेहून थोडा वेळ आधीं त्याला आलेलें मेरी वोडहाऊसचें पत्र ठेवलें.

मध्यरात्रीच्या सुमारास किंचित् डुलकी लागून जागा झाल्यावर दिवा लावून तो टेबलाशीं बसला व विचार करूं लागला. त्यानें ती तार स्वतःशीं पुनः पुनः मोठ्यानें वाचली. तार अशी होती—

"Sorry to inform you that Mary Wode house suddenly died of heart disease at 3-30 A. M. on Wednesday 28th August and was buried in the Union Church Thursday morning. Mary died with your name on her lips."

पण अवघ्या दोनच तासांपूर्वीं स्वतः मेरीच्या हातचें पत्र त्याच्या हातीं पडलें होतें कीं ! म्हणून त्यानें तें पुन्हा वाचून पाहिलें. पत्राची तारीख १२ ऑगस्ट ही होती. त्या दिवसापर्यंत आय्. सी. एस्. च्या परीक्षेचा निकाल लागला नव्हता, हें पत्रांतील तिच्या दोनतीन वाक्यांवरून उघड होत होतें. तसेंच त्या निकालाकडे ती दृष्टि लावून बसली होती आणि तो निकाल लागल्याबरोबर, चंदूकडून लिहून जाईल त्याप्रमाणें, हिंदुस्थानाला येण्याची तयारी ती करीत होती हेंहि पत्रांत उघड होतें. तो निकाल ता. २७ ऑगस्टला लागला. कारण तो लागल्याबरोबर त्याच तारखेला चंदूचा मित्र उदयशंकर यानें त्याला नवलपूरला तार केली होती. पण कदाचित् मेरी लंडन सोडून

परगांवीं गेली असल्यामुळें तो निकाल तिला कळला नसावा. किंवा तो कळण्याला आणि ती काळजाच्या व्यथेनें आजारी होण्याला एकच गांठ पडली असावी आणि न जाणों, त्या निकालाच्या आनंदाच्या बातमीचा धक्काहि तिचें दुखणें बरें करण्याऐवजीं वाढविण्याला कारणीभूत झाला असावा !

राहतां राहिली गोष्ट तारेंत लिहिलेल्या मेरीच्या मृत्यूच्या नक्की वेळेची. बुधवार ता. २८ रोजीं पहाटेच्या साडेतीन वाजण्याची विलायतेंतली वेळ म्हणजे नवलपूरची कोणती वेळ होते बरें ? नवलपूरच्या सूर्योदयानंतर सुमारें साडेपांच तासांनीं ऑक्स्फर्ड ( लंडन ) ला सूर्योदय होतो. अर्थात् बुधवार ता. २८ च्या पहाटेचे साडेतीन म्हणजे नवलपुरास बुधवार ता. २८ चे सकाळचे नऊ वाजतात !

हाय हाय ! हें गणित ध्यानांत आल्याबरोबर. चंदूला कांहीं अकल्पित स्मरण होऊन तो धाडकन मागें कोसळला !

वाचकांनाहि हें माहित आहे कीं, बुधवार ता. २८ रोजीं सकाळीं नऊ वाजण्याच्या सुमारासच चंदु बागेंत शिकारीला फिरत असतां लिंबाच्या झाडावर बसलेला कपोतांचा जोडा त्याला दिसला व त्यानें बंदुकींतल्या छऱ्यांनीं तो मारून खालीं पाडला. इतक्यात दुसरीकडून अवचित येणाऱ्या एका गोसाव्यानें त्याचा निषेध केला. या हिंसेबद्दल त्यानें चंदूला शाप दिला; इतकेंच नव्हे तर, शापाची पक्की आठवण राहण्याकरितां, ' मदांध मनुष्या, निर्दया, ईश्वर तुला पाहून घेईल, तुझा न्याय करील. आतांचा हा दिवस व ही घटका ध्यानांत ठेव, विसरू नको. ' असें तो रागानें बोलला आणि चंदूनें त्याचा तिरस्कार करून म्हटलें, ' होय, होय. ही घटका ठेवली मीं ध्यानांत. तूं खुशाल आपल्या वाटेनें जा. मी आणि ईश्वर पाहून घेतों. "

इकडे ता. २८ रोजीं बुधवारीं सकाळीं ज्या घटलेला चंदूनें तें कपोत-मिथुन मारून पाडलें, त्याच घटकेला तिकडे विलायतेंत, चंदूनें मनानें वरि-लेली कुमारिका अकस्मात् काळजाच्या रोगानें हृदयक्रिया बंद पडून मृत्यु-मुखीं पडावी ! काय हा चमत्कारिक, भयंकर, दारुण, दुःखकारक योगायोग !

त्याच्या ज्ञानानें चंदूच्या मनावर चिमट्यासारखी, गावीसारखी पकड घेतली !

तो हुंदके दे-देऊन रडूं लागला. ' बिचारी मेरी माझें नांव घेत घेत मृत्युवश झाली ना ! लग्नाआधींच तिनें पातिव्रत्य खरें केलें ! आणि मी हा असा तिच्या मृत्यूची वार्ता ऐकण्याला जगलों ना ! ! धिक्कार मला ! आणि मीच नाहीं का तिच्या मृत्यूला कारणीभूत झालों ? मी त्या पक्ष्यांच्या जोडप्याचा वध न करतों तर मेरीला खचित मृत्यु येता ना ! ती गोळी मीं त्या पक्ष्यांना मारण्याऐवजीं खरोखरच मेरीलाच मारली ! ईश्वरानें माझा न्याय केला खराच. त्या गोसाव्याची वाणी खरी झाली. त्यानें सूडाच्या दुष्टबुद्धीनें मला शाप दिला नाहीं, तर अंतर्ज्ञानानें दिसलें तेंच सांगितलें यांत शंका नाहीं. आतां मीं जीव दिला तरी मेरी कांहीं फिरून जिवंत होत नाहीं. तेव्हां उरलें आयुष्य त्या साधुबुवांच्या स्वाधीन करावें हाच मार्ग उत्तम. मला आय. सी. एस. ची भिकार नोकरी घेऊन काय करावयाची ? ' अशा व इतर करुण विलापांनीं त्यानें आपलें दुःख हलकें करण्याचा प्रयत्न केला आणि तो प्रयत्न किंचित् यशस्वी झाला असें वाटून त्यानें ती तार व पत्र हीं परत कुलुपांत घातलीं, फिरून जाऊन अंथरुणावर पडला आणि अति मानसिक श्रमांनीं झोप जाते तशी ती येतेहि. चंदूलाहि आतां ती तशीच आली.

या नव्या निश्चयानें दुसरे दिवशीं सकाळीं, प्रसन्न नव्हे पण निर्वाणीच्या मनःसमाधानानें, चंदु जागा होऊन उठला. त्यानें चटकन् तोंड धुतलें आणि आपले वडील-मातोश्री आपल्या घेरीच्या आजाराची बातमी कळून कदाचित् वर समाचाराला येतील, तर त्यांच्या आधींच आपण खालीं जाऊन त्यांच्याकडून होणारीं अडचणीचीं प्रश्नोत्तरें टाळावीं असें त्यानें ठरविलें.

त्यानें आपणाकडून प्रश्नोत्तरें टाळण्याची खटपट केली; परंतु थोडीं तरी प्रश्नोत्तरें झालींच. चंदुलाल चहाच्या टेबलाशीं सर्वांआधीं येऊन बसल्यानें, आदल्या दिवशींची घेरीची बातमी कळली असली तरी, सर गंगाराम व

मासाहेब यांना आतां भीतीला कारण उरलें नव्हतें. इकडून सर गंगाराम येऊन झोपाळ्यावर बसले. तिकडून मासाहेब येऊन खुर्चीवर बसल्या. त्या दिवसासारखी चंदूनें आज सिगारेट ओढण्याला न काढल्यामुळें मासाहेबांच्या निषेधाला कारण घडलें नाहीं; परंतु घेरीचें कारण सिगारेटचा धूर हें कळलें असल्यानें, सर गंगाराम यांनीं सिगारेटचाच विषय काढला. ते म्हणाले—" चंदू, तुला म्हणत नव्हतों मी परवां, कीं ही कागदाची सिगारेट ओढीत जाऊं नको म्हणून ? "

मासाहेबांना हा सदुपदेश त्यांच्या अर्थानें पटून त्या आनंदानें म्हणाल्या, " अस्सं ! वडिलांनीं मुलांना व्यसनापासून परावृत्त करण्याचा प्रयत्न केलाच पाहिजे. उलट परवांसारखी स्वतः काडी ओढून त्याची विडी पेटवूं नये ! "

पण सरसाहेबांना ही टीका अप्रस्तुत व हास्यास्पद वाटली आणि मासाहेबांच्या मनात संशयाला जागा राहूं नये म्हणून ते म्हणाले, " वाः मासाहेब ! त्या अर्थानं नाहीं मीं सांगितलं चंदूला सिगारेट ओढूं नको म्हणून ! मी इतकंच म्हणालों कीं सिगारेटची तंबाखू कागदांत गुंडाळलेली असते, आणि कागदाच्या धुरानें ठसका लागतो, घेरी येते. म्हणून सिगारेटच्या ऐवजीं चिरूटच ओढीत जा. माझ्या घशाला सिगारेटची सवय झाली आहे तरी मी पहा होईल तितकें करून चिरूटच ओढतों. चंदूनेंहि तसेंच करावें. कारण त्याचा घसा अजून कोवळा आहे. त्याला देशी चिरूट आवडत नसले तर विलायती परदेशी घ्यावे. चांगले हॅवाना चिरूट आठ रुपये डझन मिळतात ! म्हणजे कांहीं फार महाग नाहींत. "

हें अकल्पित भाष्य ऐकून मात्र मासाहेबांना खजील होऊन गप्प बसण्याशिवाय गत्यंतर नव्हतें. चंदूलालला समाधान हेंच वाटलें कीं, आपणाला घेरी येण्याचें खरें कारण जी तार तिचा सुदैवानें बाहेर बोभाटा झालेला दिसत नाहीं. सिगारेटवर आळ येऊन, व तोच खरा म्हणून स्वीकारला जाऊन परस्पर काम भागलें, असें पाहून झटकन चहा पिऊन टाकून तो उठला. सर गंगाराम यांनीं आदल्या रात्रीची मेजवानी कशी

काय झाली असा प्रश्न विचारला. पण त्याला " झाली कीं व्हायची तशी चांगली " असें मोघम उत्तर देऊन तो झटकला व बागेकडे निघाला.

बागेच्या तोंडीं आजहि कान्या माळी हजर होता. तो मुजरा करून धन्याच्या मागून निघाला. धन्याच्या हातांत आज बंदूक नाहीं हें पाहून मात्र त्याला फार बरें वाटलें.

येवढेंच काय, पण आज कान्याला सर्वच गाडें बदललेलें दिसलें. कारण चंदुलालनें आज झाडांचीं पानें उलटींसुलटीं करून पाहिलें नाहीं. किड्या मुंगळ्यांची चौकशी केली नाहीं. मग त्यांची हिंसा कुठची ?

चंदुलाल हळूहळू चालत जाऊन शेवटीं कपोत पक्ष्यांची शिकार केलेल्या झाडाशीं पोंचतांच थांबला. आजहि त्या झाडावर टांगलेल्या शिंक्यांतील परळांत दाणापाणी सिद्ध होतें आणि अनेक पक्ष्यांचीं जोडपीं त्या नजीकच्या फांद्यावर बसून त्या पाणपोयीचा व सदावर्ताचा परामर्ष घेत होतीं. यावरून पूर्वीच्या हिंसेनें, हत्येनें या स्थळाला पक्षिवर्गात दुष्कीर्ति जडली नाहीं हें सहजच सिद्ध झालें. फक्त त्या हत्येच्या नुसत्या आठवणीनें दुःखी झालेलीं दोन मनुष्यमनेंच तेथें होतीं. एक अर्थात् कान्याचें आणि आज मात्र त्याच्या जोडीला स्वतः चंदुलालचेंहि ! पण त्यांतल्या त्यांत चंदूचेंच दुःख अधिक प्रभावी ठरलें. कारण झाडाजवळ जातांच कान्याऐवजीं चंदू मटकन खालीं बसला आणि त्या दिवशीं कान्या मांडींत मान घालून स्फुंदून रडत होता त्याच्याऐवजीं आज स्वतः चंदूच तें करूं लागला. कान्या आश्चर्यानें थक्कच झाला. पण नोकर माणूस ! धन्याचें सांत्वन करण्याला झालें तरी मर्यादा सोडून कसा सरसावणार ?

थोडया वेळानें चंदू उठून उभा राहिला. त्यानें उठतांना त्या रक्तांकित जमिनीवरून उचललेली मातीची चिमूट कपाळाला लावून हातरुमालाच्या कोपऱ्यांत गाठून घेतली आणि म्हणाला, " कान्या, तुला आठवतें का रे, तो साधु गोसावीबुवा आपण कुठें चाललों, कुठें मुक्काम करणार, याविषयी कांहीं म्हणाला तें? मला स्मरतें, कीं तो भद्रेश्वराच्या कीं कशाच्या यात्रेला चाललों असें म्हणाला. "

" होय, धनीसाब. भद्रेश्वराचंच नांव बुवाजींनीं काढलं होतं. मला पक्कं आठवतं. "

" कुठें आहे रे भद्रेश्वराचं देवस्थान ? कितीसं लांब आहे इथून ? "

" आहे मला ठाऊक तें. इथून फार दूर नाहीं साहेब. फार तर अर्धा कोस भरेल. "

" इतकंच ? तर हो पुढं आणि वाट दाखीव पाहूं मला त्या ठिकाणची ! "

" अन् धनी, पायांनीं ? मोटारीबिगर, घोड्याबिगर ? मी धावत जाऊन आतां आणीन कीं डायवरला अन् मोतदाराला हाक मारून, पुढं घालून ! अन् अशा उन्हांत जाणार धनी ? छत्री, अबदागिरी बी कांहीं नाहीं ? "

" अरे, वेडा आहेस कान्या तूं. तो साधुबुवा भद्रेश्वराच्या मंदिरांत उतरला असेल आणि मला भेटेल तर मी पायानंच काय पण डोक्यानं चालतां आलं तर डोक्यानंहि जाईन आणि त्या महात्म्यासमोर ती हिंसा करून, त्याला दुरुत्तरं बोलून, त्याला जो ताप मीं दिला त्यापुढं या उन्हाचा ताप कितीसा कठीण ? शिवाय, कान्या, तूं माझ्याकरितां एक गोष्ट केली पाहिजेस !"

" ती काय धनीसाब ? "

" परवां आपल्या गळ्यांतली माळ दाखवूनच नाहीं का तूं मला म्हणालास, कीं कोणी माळकरी प्राण्याची हत्या कशी करील म्हणून ? त्या माळेनं जर तुझ्या अहिंसेचा जामीन दिला तर ती यापुढं माझ्याहि अहिंसेला जामीन कां न राहील ? म्हणून दे ती माळ मला. मी घालणार आजपासून ती माझ्या गळ्यांत ! तुला आतां तिचं कारण नाहीं. "

कान्या आश्चर्यानें नुसता थक्कच नव्हे तर शुद्ध वेडा झाला. त्याच्या डोळ्यांतून पाण्याच्या धारा वाहूं लागल्या. त्यानें आपल्या गळ्यांतली माळ काढली. पण ती चंदूलालच्या गळ्यांत न घालतां त्याच्या पायांवर वाहिली. चंदूनें ती उचलून गळ्यांत घातली आणि म्हणाला, " कान्या, मी आतां परत घरीं आलों म्हणजे या झाडाच्या छायेंत देवळाची एक लहानशी घुमटी बांधून देणार आहें आणि तूंहि आणखी चार शिंकीं टांग या

झाडावर. घरीं दिवाणजींना मी सांगून ठेवतों कीं त्यांतल्या परळांत घालायला वाटेल तितकं धान्य त्यांनीं तुला रोज द्यावं. मग झालं कीं नाहीं ? ”

कान्याला आनंदाचं भरतं येऊन तो निमूटपणें भद्रेश्वराची वाट चालूं लागला.

भद्रेश्वर हें एक जुनाट देवालयाचें स्थान आहे. तें बांधणारानें एकांत-वास पाहून बांधलें आणि सुदैवानें त्याचा तो एकांतवास टिकलाहि ! इतर देवस्थानांप्रमाणं त्याची बाजारपेठ बनली नाहीं. या देवस्थानाची जत्रा चार प्रहरांपूर्वीच ओसरली असून, त्याच्या प्रशस्त सभामंडपाच्या गर्दीत चंदूला भेटलेला बैरागी व त्याचा शिष्य यांनीं आतां आपलें बिऱ्हाड थाटून दिलें होतें.

चंदू देवळाशीं जाऊन पोंचल्यावर त्यानें कान्याला रजा दिली, आणि म्हणाला, “ घरीं बाबांना आणि मासाहेबांना निरोप सांग. म्हणावं, मी आज दोन प्रहरीं घरीं जेवण्याला आलों तर येईन, नाहीं तर नाहीं. माझी वाट पाहूं नका. पण संध्याकाळीं मात्र खास येईन मी बरोबर पिशवींत रोटी, बिस्किटं आणलीं आहेत आणि इकडंच दूध पिईन. म्हणावं, मला कोणी बोलावणं पाठवूं नका. ”

कान्या निघून गेल्यावर चंदूनें देवळाबाहेर आपला चढाव काढून ठेवून पाय न वाजवितां मंडपांत प्रवेश केला. पाहतो तों बुवाजी एका गृहस्थाशीं बोलत बसले आहेत आणि त्यांचा शिष्य बुवांचा एक एक पाय आपल्या हातीं घेऊन तो मालीश करीत आहे. चंदूनें हळूच पुढें होऊन जमिनीवर पालथें पडून दंडवत घातलें आणि हात जोडून मुडपल्या पायांवर नम्र-पणानें बसला.

बुवाजींनीं चंदूला पुरें ओळखलें; पण मुळींच ओळख दिली नाहीं. प्रथम भेटीला आलेल्या गृहस्थाशीं संभाषण करण्यांत आपण गाढ गुंतलों आहों असें त्यांनीं भासविलें. शिष्यानें मात्र चंदूला ओळखल्यामुळें मारकट म्हशीसारखें त्यानें एकवार वांकड्या नजरेनें चंदूकडे पाहिलें, आणि तो गुरूजींचे पाय अधिक जोरानें चोळूं लागला.

आलेला गृहस्थ गोसाव्याला म्हणाला, “ महाराज, आपण आल्यानें पंचक्रोशी पुनीत झाली. आपण रहा कीं इथं आणखी कांहीं दिवस.” समोरच एक मेलेला पक्षी आढ्याला टांगून ठेवलेला आणि दुसरा काट-क्यांनीं आयत्या वेळीं तयार केलेल्या पिंजऱ्यांत ठेवलेला पाहून, त्याकडे हात करून तो गृहस्थ म्हणाला, “ महाराजांच्या स्वारींत हे पक्षी कुठून आले ?” बुवांनीं उत्तर दिलें, “ स्वारी नाहीं अन् शिकारहि नाहीं. देवाच्या घरचा एक प्राणी दुसऱ्याला योगायोगानं भेटतच असतो आणि भेटल्यावर ऋणानुबंध वाढविणें हें प्रत्येकाचं कामच आहे. तुम्ही मजकरितां इतकेंच करा कीं हा मृत पक्षी घेऊन जा, आणि एखाद्या जाणत्या माणसा-कडून तो उकलून त्यांत गवताचा पेढा नीट भरून परत लवकर माझ्याकडे पाठवून द्या. हा जिवंत आणि तो मेलेला दोघे पक्षी जोडीदार होते. त्या दोघांना मी यापुढें आपल्याबरोबर संभाळणार आहें.”

आपणाला ओळखले असतां, आणि आपण शिकारींत मारलेल्या पक्ष्यांची गोष्ट निराळी असताहि बुवांनीं आपला निर्देश केला नाहीं, आपल्या अपराधावर पांघरूण घातलें, असें पाहून चंदूच्या मनावर फारच परिणाम झाला. तो गृहस्थ मृत पक्षी घेऊन निघून गेल्यावर चंदूनें बुवाजींचे पाय धरण्याकरितां हात पुढें केले, असें पाहून शिष्य रागानें म्हणाला, “ हात दूर करा. तुमच्या अपवित्र हिंसा करणाऱ्या हातांनीं महाराजांचे पाय विटाळतील !”

त्या दुसऱ्या गृहस्थाशीं बोलत असतां, चंदू येऊन बसलेला दिसल्यापासून गुरुमहाराज मनांत विचार करीत होते–‘ काल आपणाला शिव्या देऊन धिक्कार करून घालविलेला हा विलायती तब्येतीचा तरुण ! आज अकस्मात् पुढं उभा राहून नम्रभावानं वागतोसा दिसतो ! याचं कारण काय असावं ? ’ पण त्याचा त्यांना कांहींच उलगडा होईना; म्हणून संभाषणांतून मोकळे होतांच ते चंदूला शांतपणें म्हणाले, “ बेटा, तूं आज इथं कसा ! मला कांहींच कळत नाहीं.”

चंदू म्हणाला, “ हें आपण काय बोलतां ! आपणाला कळत नाहीं असं

कसं म्हणतां ? आपणाला कळत नाहीं असं जगांत कांहीं नाहीं अशी माझी पक्की खात्री होऊन चुकली आहे. मीं बागेंत आपला अपमान केला, दुरुत्तरं बोललों, त्याची लाज वाटून क्षमा मागण्याकरितां मी आलों आहें. आपण मला क्षमा करून पदरांत घेतलं पाहिजे. ''

महाराज किंचित् तटस्थ वृत्ति दाखवून शिष्याकडे पाहून नुसते हंसून गप्प बसले. त्यांना हें भासवावयाचें होतें कीं आपणाला कोणी वंदन केलें किंवा आपलें कोणी निन्दन केलें तरी सारखेंच. सिद्ध पुरुषाला स्तुति-निन्दा यांपैकीं कशाचाच स्पर्श होऊं शकत नाहीं ! पण महाराज उत्तर देत नाहींत असें पाहून चंदूनें आपल्या लांब शर्टचा पदर करून तींत क्षमा घेण्याकरितां तो पसरलाच. तेव्हां महाराज म्हणाले, " बाळ, क्षमा कसली मागतोस ? तूं अपराध केला असलास तर तो ईश्वराघरचा; माझा नव्हे. त्याच्या दृष्टीनं तूं व मी सारखेच आहों. "

चंदु म्हणाला, " असं कसं होईल ? आपण त्या दिवशीं प्रगट केलेली भविष्यवाणी आणि अन्तर्ज्ञानाचीं बोलणीं मला चांगलीं पटलीं. अतींद्रिय ज्ञान असलेला आपणासारखा महात्मा, आणि माझ्यासारखा मूढ अज्ञानी अपराधी, हे दोनहि सारखेच कसे होतील ? ईश्वराघरीं न्याय आहे याचाच अर्थ व्यक्तीव्यक्तींत भेद आहे. श्यामकर्ण आणि ढवळा नंदी हे दोन्ही तो ईश्वर एकाच दावणीला बांधूं देईल काय ? "

" बरं, तूं म्हणतोस तसंच का होईना ! मीं तुला मनानं पूर्वींच क्षमा केली होती ती आतां तुझा आग्रह म्हणून तोंडानंच त्रिवार उच्चारतों. तुला क्षमा केली, तुला क्षमा केली, तुला क्षमा केली. जा, आतां तरी तुझं समाधान झालं कीं नाहीं ! तुझीं घरचीं असंख्य कामं खोळंबून राहिलेलीं असतील. मी रिकामा बैरागी. माझ्या संगतींत बसून व्यर्थ काळ दवडूं नकोस; जा. "

" पण मी आज आलों तों महाराज, आपणापासून दूर जाण्याकरितां आलों नाहीं आणि इथून जायचंच तर आपणाला घेऊनच परत जाईन या निर्धारानं आलों आहें. "

महाराज म्हणाले, “ काय? मला बरोबर घेऊन जाण्याकरितां तूं आला आहेस ? ”

“ होय, आणि आपल्या संगतींत राहायचं हेंच आतां यापुढं माझं अखंड काम ! काल एका क्षणांत माझ्या इतर कामाचा शेवट लागला. ”

“ अरे, मी हा असा बैरागी विरक्त. तूं संसारी. तुझ्यावर प्रेम करणारे आईबाप, बहीण, पत्नी वगैरे कोणी असतील. त्यांच्या संगतींतच तुझं आयुष्य गेलं पाहिजे. तुझ्या जीवनाला आतां कुठं प्रारंभ झालेला दिसतो. इतक्यांत विरक्त होऊन तूं भरल्या संसाराचा उच्छेद कां करावा ? अशी बुद्धि तुला कुणी दिली व का झाली ? ”

“ फिरून आपण मला प्रश्न विचारतां कीं जसं कांहीं आपणाला माहीतच नाहीं ! जाणत्याला आणखी काय सांगायचं ? तर कृपा करा, उठा, मजबरोबर चला, आणि माझी झोपडी पावन करा. वाटेल तर मी माझ्या आईबापांना आपल्या स्वागताकरितां घेऊन येतों. पण आपण वचन दिल्याखेरीज मात्र मी येथून हलणार नाहीं. ”

“ काल दुरून जो प्रचंड प्रासाद मीं पाहिला तीच ना तुझी झोपडी ? त्या झोपडींत माझ्या या लहानशा संसाराचा समावेश कसा होईल ? मला तर राहायला फार मोठं घर लागतं. ” असें म्हणून महाराज आपण मोठा मार्मिक विनोदी प्रश्न केला अशा भावनेनें मोठ्यानें हंसले.

पण चंदु म्हणाला, “ जगांत मनुष्याच्या मनाहून मोठं काय आहे ? आणि ज्या अर्थी माझ्या लहानशा मनांत मला गुरुमहाराजांना सांठवितां आलं, त्या अर्थी माझ्या घरांतहि त्यांना मला सांठवितां येईल. मग वाड्याला झोपडी म्हटल्याबद्दल आपण माझी थट्टा करा किंवा दूषण द्या. भावनेनं झोपडीचा जसा राजवाडा होतो तशीच राजवाड्याचीहि झोपडी होते, नव्हे का ! ”

“ मला तूं आपल्या घरीं नेऊन काय करणार ? ”

“ आपली सेवा करणार, दुसरं काय ? ”

“ वा ! म्हणजे माझ्या फजितीचीच वेळ तूं आणलीस म्हणायची. कारण

तुझ्यासारखा क्षितिजावर आलेला तरुण सूर्य माझ्या नादीं लागून अस्तंगत झाला, तर तुला नांवं ठेवण्यापेक्षां जग मलाच अधिक नांवं ठेवणार नाहीं काय ? ”

चंदु हंसून म्हणाला, “ महाराज, जगाच्या निंदेची वांटणी आपण व मी आपापसामध्यें कशी करून घ्यावयाची हें मग पाहूं. प्रथम आपण मजबरोबर घरीं चलाल तर खरें ! ”

पण या आग्रहाला आपण भीक घालीत नाहीं असें महाराजांनीं आपली मान मोठ्यानें हालवून निश्चयानें दर्शविलें. ते इतकेंच म्हणाले, “ माझ्या-विषयीं तुला कांहीं आदर वाटूं लागला असला तर तो तुला दुरूनहि सांभाळतां येईल. म्हणून म्हणतों, जा, तुझ्या मार्गाला तूं लाग, माझ्या मी लागतों. ”

पण चंदूचा निश्चय ढळला नाहीं. तो इतकेंच म्हणाला, “ ठीक आहे. आपणांपुढें माझी इच्छाशक्ति पणाला लावणं हें धाडसच; पण—पण मी कशाला बोलूं ? ” इतकें म्हणून चंदु गुढगे दुमडून मांडी मोडून आसन घालून बसल्यासारखा घट्ट बसून राहिला. थोड्या वेळानें शिष्यवरांनीं चालविलेलें पाद-संवाहन, म्हणजे मालिश संपलें. चंदूशीं अधिक न बोलतां महाराज स्नानाच्या तयारीनें उठले व नदीकडे निघाले. उत्थापन देण्याकरितां म्हणून चंदु उभा राहील तर त्याला परत घालवावं असा विचार महाराजांच्या मनांत आला किंवा नाहीं सांगवत नाहीं. पण चंदूच मुळीं जाग्यावरून उठला नाहीं. आदराचें उत्थापन न द्यावें म्हणून नव्हे, तर आपला निश्चय यत्किंचितहि ढळला नाहीं असें दिसावें म्हणून.

महाराज व त्यांचा शिष्य स्नानाला गेल्यावर जागेवर चंदु व त्याच्यासमोर काटक्यांच्या पिंजऱ्यांत ठेवलेला तो कपोत पक्षी एवढे दोघेच दोघे राहिले. पक्ष्याच्या अंगावरची जखम अजून भरून आली नव्हती. तिच्यांतलें मांस बाहेर तोंड काढून पाहणाराला भिववीत होतें. तें पाहून इतरहि कोणी भ्याला असता, त्याला वाईट वाटलें असतें. मग चंदूला वाईट वाटलें असेल यांत काय आश्चर्य ! आपणांला हंसण्याला जवळ कोणी नाहीं असें

पाहून तो ढळढळां रडूं लागला आणि जणूं कांहीं आपलें बोलणें पक्ष्याला समजत आहे अशा भोळ्या भावनेनें तो म्हणाला, 'अरेरे! बिचाऱ्या तुझ्या संसाराचा मीं घात केला ना? मग माझ्या संसाराचा घात ईश्वरानें तावडतोब करून माझा न्याय केला व मला शिक्षा दिली हें, अज्ञानी पक्ष्या, तुला कोठून कळणार? तूं अजून आपल्याच विरहदुःखांत चूर दिसतोस. पण लक्षांत ठेव कीं, तूं जसा या विरहांत जीवन कंठणार, तसाच मीहि कंठणार आहें. इतकेंच नव्हे तर, ज्यानं तुला हा पिंजरा तयार करून प्रेमाच्या बंदिवासांत ठेवलं त्याच्या मनाच्या पिंजऱ्यात शिरण्याचा व स्वतःला बंदिवान करून घेण्याचा प्रयत्न मीहि करीत आहें. माझं रक्त आणि मांस देऊन तुझी जखम मला भरून काढतां आली तर तें मला किती आवडेल!"

पण बिचारा पक्षी चंद्रचें मनोगत कसें ओळखणार? त्यानें इतकेंच केलें कीं, चंद्र समोर आला तरी त्यावर विश्वास नसल्याचें किंवा त्याची भीति वाटल्याचें कांहीं चिन्ह दर्शविलें नाहीं. याच्याच हातानें उडविलेल्या बंदुकींतील छऱ्यांनीं आपण जखमी झालों इतकी ओळख त्याला कोठून असणार? म्हणून तो कपोत दुखणाईत स्थितींतच पिंजऱ्यांत हालचाल करतां येईल ती करीत होता, व तोंडानें मऊ आवाज काढीत होता.

कांहीं वेळानें चंद्र पिंजऱ्यापुढून निघून देवळाच्या गाभाऱ्यांत गेला. घंटा वाजवून त्यानें देवाला नमस्कार केला. आय्. सी. एस्. झाला तरी हिंदी मनुष्याचे उपजत संस्कार कसे लोपणार? मग बाहेर येऊन चंद्रनें प्रदक्षणा घातली, प्राकारांत हिंडून ओवऱ्यांच्या दगडी कमानींची शोभा पाहिली, प्राकाराबाहेर फेरी मारून वनश्री पाहिली आणि फिरून सभामंडपाच्या बोळांत पूर्वींच्याच जागेवर बसून ध्यान लावल्याप्रमाणें डोळे मिटून बसला. मात्र तो ध्यान कोणाचें करीत असेल याची कल्पना वाचक महाशय, माझ्याप्रमाणें तुम्हालाहि खचित आहे.

महाराज स्नानाहून परत आल्यावर पाहातात तों चंद्र आपल्या जाग्यावरच आहे.

त्याच्या या निश्चयप्रदर्शनानें त्यांना वाईट वाटलें नाहीं, राग आला

नाहीं; तथापि त्याच्याशीं त्यांनीं कांहीं भाषणहि केलें नाहीं. शिष्यानें काटक्या पेटवून तीन दगडावर हंडी शिजवून तयार केली असें पाहून महाराज म्हणाले, " तूं ठाण मांडून बसलासच तर माझ्या पंगतीला तुला थोडं तरी खाल्लंच पाहिजे. "

चंदु आनंदानें म्हणाला, " आणि मी तरी याहून अधिक काय मागतों?"

भोजनोत्तर महाराजांना निद्रा आली असें पाहून चंदु व शिष्य दोघेहि उठले आणि देवळाबाहेरच्या कट्ट्यावर जाऊन बोलत बसले. शिष्यवराच्या प्रथमदर्शनानें चंदूच्या मनांत फारसा चांगला ग्रह झाला नव्हता हें पूर्वीं सांगण्यांत आलेंच आहे. परंतु आतां गुरूची संगत करावयाची तर त्याच्याशीं चिकटलेल्या अप्रिय अशाहि शिष्याची संगत चिकटणारच ! ती टाळूं पाहण्यांत अर्थ नाहीं. असा समजूतदार विचार करून चंदु म्हणाला, " बुवाजी ! तुमच्या गुरुजीविषयीं माझी भावना काय झाली हें तुम्ही पाहिलंच आहे. तर आतां मला थोडीशी माहिती सांगाल काय ? महाराज कोण ? कुठले ?"

शिष्यवरानें एकदम उत्तर दिलें नाहीं. त्यानें कांहीं वेळ विचार केला व म्हणाला, " या देहाला जम्बू म्हणतात आणि महाराजांना गुरुमहाराज म्हणतात, याहून अधिक कांहीं मला सांगतां येत नाहीं. मी आज दोन वर्षें त्यांच्या सेवेंत आहें. त्यांच्या आज्ञेशिवाय त्यांच्याविषयीं मला कोणाला कांहींच सांगायचं नाहीं. "

झालें. चंदूच्या मुख्य चौकशीला बांधच पडला. पण वेळ जावा म्हणून मग त्यानें इतर इकडलें तिकडलें बोलणें काढलें. पण त्यांतलीं उत्तरें देतांना जम्बूनें चंदूविषयीं इतकी तुच्छताबुद्धि दाखविली कीं, सांगतां पुरवत नाहीं. तिसरे प्रहरीं गुरुजींनीं एक लहानसें मळकट पोथीपुस्तक काढलें व मनातल्या मनांत वाचूं लागले. चंदूनेंहि फिरून त्यांच्या समोर ठाणें मांडलें. अशा रीतीनें सूर्यास्ताची वेळ आली. इतक्यांत दुरून घोड्या-गाडीचीं चाकें वाजूं लागलीं व घोड्याच्या पावलांच्या टापाहि ऐकूं येऊं लागल्या.

एक दोन मिनिटांतच कान्या व त्याच्या मागून सर गंगाराम व मासाहेब पायउतारा होऊन देवळांत दाखल झाले. त्यांना पाहून चंदु ओशाळला.

कारण आपली मिजास नेहमींची कशी व आजची कशी याची जाणीव त्याला मोठी लाजिरवाणी वाटली. वैराग्यापुढें खालीं मान घालून बसलेला मुलगा पाहतांच या दोघांना आश्चर्य वाटलेंच. पण प्रथम कांहीं न बोलतां दोघांनींहि गोसाव्याला औपचारिक रीत्या नमस्कार केला. चंदु लाघवी-पणा आणून म्हणाला, " बाबा, आई, मी महाराजांना घरीं चलण्याविषयीं विनंति करतों आहें. तुम्ही आलां, बरंच झालं ! आपणा सर्वांच्या विनंतीचा ते अव्हेर करणार नाहींत. "

पण महाराजांनीं त्या दोघांना विनंति करण्यात अवसर दिला नाहीं. ते म्हणाले, " दैवयोगानेंच गांठी पडत असतात. आपल्या पुत्राचा निर्धार पाहून मी तुमच्याकडे येऊन कांहीं दिवस राहण्याचं योजलं आहे आणि तसं मी आश्वासन देतों. तुम्ही याला आतां आपल्याबरोबर घेऊन जा. उद्यां सकाळीं आम्ही दोघे पायउतारा येऊं. मी तर गाडींत कधींच बसत नाहीं. "

पण महाराजांची ही हुलकावणी तर नसेल, अशी शंका चंदूच्या चर्येवरून दिसल्यावरून महाराज त्याला म्हणाले, " माझ्या शब्दावर तुझा विश्वास नाहीं काय ? आणि ज्याच्या शब्दावर तुला विश्वास टाकवत नाहीं त्याच्या संगतीची इच्छा तरी तूं कां धरावी ? "

हा सवाल निरुत्तर ठरला. कांहीं तरी बोलावें म्हणून सर गंगाराम म्हणाले, " या आमच्या मुलाला जें प्रिय तें आम्हालाहि नव्हे काय ? आपले पाय आमच्या घराला लागले तर आम्हांला आनंदच होईल. आम्ही जातों आतां. "

मात्र मासाहेब कांहींएक बोलल्या नाहींत. त्या आपल्या सूक्ष्म दृष्टीनें गुरु-शिष्यांची टेहळणी करीत होत्या.



चंदुलालला अशा रीतीनें पुढें लावून दिल्यामुळें गुरुशिष्यांना मन मोकळें करून बोलायला आणि पुढचे बेत करायला मोकळीक सापडली. दोघेहि उठून लांब नदीकांठीं जाऊन बसले, आणि तेथें ऐकण्याला दुसरें कोणी नाहीं अशी खात्री करून घेतल्यावर त्यांचें खलबत सुरू झालें.

जंबूनें बोलण्याला आरंभ केला. चारचौघांत तो प्रौढ गोसाव्याला 'गुरुजी' म्हणत असे. तो शब्द आतां खासगीमध्यें टाकून देऊन नुसता 'गुरु' हा शब्द त्यानें खेळीमेळीचा म्हणून ठेवला. गुरु याचा एक अर्थ 'लुच्चा माणसा!' असाहि होतो. मात्र शिष्य ही पदवी ज्यानें स्वीकारली त्याच्या कपाळीं एकेरी हीन शब्दानें संबोधून घेणें आलेंच. म्हणून स्वतः जंबू तो जंबूच राहिला!

जंबू म्हणाला, "वा गुरु! कालच्या तुमच्या नाटकाचा शेवट असा होईल हें स्वप्नांतहि आलं नव्हतं."

गुरुजी म्हणाले, "अरे लेका जंब्या, हेंच तर बुवाबाजींतलं खरं कसब आहे. कुशल नाटककाराची हीच करामत कीं, नाटकाच्या अखेरीची कल्पना आधीं कोणालाच येऊं नये."

"पण गुरु, कित्येक वेळा असंहि घडत असेल नव्हे का, कीं लोकांना राहिलीच, पण स्वतः नाटककारालाहि आपण शेवट कसा करणार याची कल्पना प्रारंभीं नसते."

"तें मी काय सांगूं? मीं काय नाटकं लिहिलीं आहेत कधीं!"

"न लिहानात का; पण लिहिणारापेक्षां प्रत्यक्ष तीं करणाराची बहाद्दरी अधिक! कालचंच उदाहरण घ्या ना? आपण दोघांनीं त्या तरुण पठ्याला शिकार करतांना पकडलं. लगेच तुम्हीं तुमच्या सोंगाला शोभेसा हिंसेच्या निषेधाला आणि रडण्याला प्रारंभ केला. तरी तो उन्मत्त तरुण आपल्या वळणावर गेला. त्यानं तुम्हालाच उलट दम भरला. मग फक्त दयाबुद्धी दाखवून आपण ते पक्षी घेऊन निघून आलों. या गोष्टी सर्व अपेक्षिता-

सारख्याच घडल्या. कारण पक्ष्याची शिकार कुणी गोसावी बैरागी वाईट म्हणणारच ! पण ज्या तरुणानं काल तुम्हांला फक्त धक्के तेवढे मारायचे शिल्लक ठेवले तोच आज आपल्या पायानं चालत येतो, तुमचे पाय धरतो, तुम्हांला गुरु करतो, आणि आपल्या घरीं घेऊन चलतो, या चमत्काराची कल्पना कुणाला आली असती ? ”

“ मला स्वतःलाहि त्याचं फारच आश्चर्य वाटलं ना ! मीं तें दिसूं दिलं नाहीं इतकंच. उलट झाली गोष्ट व्हायचीच होती असा बहाणा मला करायचा होता, व तो साधलाहि. ”

“ मग यापुढं आपलं बुवाबाजीचं गाणं कोणत्या काळ्या पांढऱ्या पट्टीवर गात राहायचं ? ”

“ अर्थात् अहिंसेच्या पांढऱ्या पट्टीवर. मी अहिंसेचा भोक्ता म्हणून त्या तरुणाचा निषेध केला. त्याच्या हिंसेच्या अपराधावर माझा राग आणि ईश्वराचा न्याय हे मीं आणून बसविले आणि तीं दोन्ही त्याला आतां पुरीं पटलीं हें उघड दिसतं, नव्हे काय ? म्हणजे त्याच्या भावनेची नाडी किंवा नस मला सांपडली. तेव्हां आपण त्यांच्या घरीं राहावयास गेल्यावर आपला सर्व भर अहिंसा–प्रतिपादनावर मला द्यावा लागेल ! ”

“ पण आतां हा तरुण यापुढं प्रत्यक्ष शिकार करून हिंसेला तयार होणार नाहीं. त्यानं बंदुक यापुढं टाकलीच समजा. मग प्राणिवधाच्या अहिंसेचं तुणतुणं वाजवून काय उपयोग ? ”

“ वेड्या जम्व्या, तुला गायनशास्त्राचं ज्ञान नाहीं. संगीताच्या प्रत्येक सुरांतून पोटसूर निघतात, अनुरणन होतं, आणि त्यांतूनच स्वरविस्तार होतो. त्याप्रमाणं या प्रकरणीं मुख्य स्वर अहिंसेचा लावून त्यामधून निघणाऱ्या पोटसुरांतून अहिंसेच्या कल्पनेचा विस्तार सोईप्रमाणं करावयाचा.”

“ हें नाहीं येत अजून माझ्या लक्ष्यांत ! कारण अहिंसा या शब्दाचा एकच अर्थ मी समजतों. त्या शब्दाच्या उच्चारानं एकच कल्पना माझ्या तरी मनामध्यें येते. ती म्हणजे प्राण न घेण्याची. मग या कल्पनेचा विस्तार कसा करायचा ? आतां पंचप्राण म्हणण्याची चाल आहे खरी. पण पांचहि

प्राण घेतले म्हणजेच हिंसा झाली, एरवीं नाहीं, असं कसं कुणी म्हणूं शकेल ?"

" हिंसेच्या कल्पनेचा विस्तार किंवा संकोच करण्याची यांतच गुरु-किल्ली आहे. पण आधीं पंचप्राण म्हणजे तूं कोणते समजतोस तें सांग पाहूं !"

" प्राण, अपान, व्यान, उदान, समान इत्यादि काय म्हणतात ना ते."

" झालं तर मग.शिवाय प्राणांत भावनाहि येतात.आपल्या सोईला येईल तेव्हां त्याप्रमाणं करावं. म्हणजे उदाहरणार्थ, पंचप्राण एकदम गेले नाहींत म्हणून हिंसा झाली नाहीं असं म्हणतां येईल किंवा उलट सोय असली तर असं म्हणावं कीं एकच प्राण घेतला तरी ती हिंसाच झाली."

" पण एकच प्राण घेणं म्हणजे काय ?"

" पांचांपैकीं कोणत्याहि एका प्राणाचा अवरोध किंवा उद्गार, अस्वाभाविक रीतीनं करणं कुणी कुणाला भाग पाडलं म्हणजे तो प्राण घेणं किंवा ती हिंसा म्हणतां येईल. याला उदाहरण, मी तुझ्या तोंडावर हात ठेवला तर तुझा दम किंचित् कोंडेल कीं नाहीं ? आणि श्वासोच्छ्वास वाजवीपेक्षां अधिक सावकाश होऊं लागेल कीं नाहीं ? बस, झाली ती हिंसा. उलट तुला मीं माझ्याबरोबर चालतांना तुझ्या नेहमींच्या गतीहून अधिक जलद चालायला लावलं, तर तुझा श्वासोच्छ्वास नेहमींच्या गतीहून अधिक जलद चालूं लागेल कीं नाहीं ? बस, झाली ती हिंसा."

" मग कोणी कोणाला अधिक खायला प्यायला घातल्यानं वर खालीं ढेकर आली तरी झाली ती हिंसाच."

" अलबत ! ती अपान उदान वायूसंबंधानं हिंसा झाली."

" कोणी कोणाला रागावून बोलून दुःख दिलं तर ती हिंसा झाली."

" अलबत् ! ती व्यान वायूसंबंधीं हिंसा झाली."

" कोणी कोणावर प्रेम करून भावना प्रज्ज्वलित केली तर रक्ताभिसरण वाढेल, तेव्हां ती हिंसाच झाली !"

" अलबत ! स्वतः प्रेमाश्रु काढणं किंवा दुसऱ्याला ते काढायला

कारण होणं ही देखील आत्मस्थ व परस्थ हिंसाच ठरते असं म्हणतां येईल. म्हणजे असं ढोंग करतां येईल !"

"मग यापेक्षां एकदम असंच का सांगून टाका ना कीं, मी म्हणजे तुम्ही गुरुजी, ज्याला ज्याला नावें ठेवीन, ज्याचा ज्याचा निषेध करीन तें तें सर्व हिंसा या नांवाखालीं पडतं असं समजावं. म्हणजे शब्दार्थांचा छळ नको व त्याबरोबर माझ्या बुद्धीचाही !"

"बरोबर बोललास. प्रत्येक वेळा हिंसा शब्दाचा अर्थ मीं आपल्या लहरीप्रमाणं हवा तसा वेगवेगळा केला तरी त्या वेळीं तोच योग्य असं तुला शिष्याला भासवावं लागेल आणि त्याप्रमाणं वागणूक ठेवावी लागेल."

"पण आपल्या या संभाषणामुळं मला जसा तुमचा हिंसा–अहिंसा शब्दांचा अर्थ आतां कळला म्हणजे कळला नाहीं—तसा तो इतरांना कसा कळेल ? आणि तो अगाऊ न कळल्यानं त्यांचं—म्हणजे तुम्हांला गुरु मानून चालणाऱ्या त्या मोठ्या वाड्यांतील लोकांचं—आचरण पदोपदीं चूक ठरेल त्याची वाट काय ?"

"वाट काय असायची ? सांप्रदायिक शिष्यांना पदोपदीं नांवं ठेवण्याची चूक म्हणण्याची संधि मिळणं यांतच कोणत्याहि गुरूचा गुरुपणा राहतो. कारण खरोखर ते लोक चूक किंवा गुरु चूक याचा निर्णय कोण करणार ? कुणाला तो अधिकार असणार ? अरे ठोंब्या, हें तुला माहीत नाहीं काय कीं, कोणत्याहि नियमांचं अर्थज्ञान जितकं गूढ, आणि त्याचा निरनिराळ्या वेळीं निरनिराळा अर्थ लावण्याची शक्यता जितकी अधिक, तितका गुरूचा दाब अनुयायांवर राहण्याची शक्यता अधिक !"

"पण या मुक्या माराला, या निर्दय छळाला, अनुयायी व शिष्य तयार झाले पाहिजेत ना ?"

"झक मारीत तयार होतात. एकदां स्वतःच्या बुद्धीचा नाश झाल्यावर किंवा तो मुद्दाम पत्करून ती गुरुचरणीं वाहिल्यावर त्यांचं काम फार हलकं व सोपं होतं."

" तें कसं ? "

" तें असं कीं, गुरूनं कोणताहि अर्थ प्रकट केला म्हणजे तोच खरा, तोच योग्य, तोच ईश्वरप्रणीत, असं म्हणत कोलाहल करीत उठायचं व इतरांवर गहजब करायचा हें सोपं नाहीं काय ? समज तूं अजीर्ण होण्या-इतकं खाल्लंस तर ती मी म्हणेन आम्लरसाची हिंसा केलीस. उलट तूं उपोषण केलंस तर मी ती जठराची हिंसा म्हणेन. "

" हिंसा-अहिंसेचा अर्थ इतका लवचीक झाला तर मला, म्हणजे तुमच्या विश्वासाच्या पट्टशिष्यालाहि, पदोपदीं चुका करण्याशिवाय आणि ' एवढा पट्टशिष्य पण अज्ञानी ' अशा दुष्कीर्तीचं काजळ तोंडाला फासून घेतल्या-शिवाय दुसरी गति नाहीं. "

" हा वेड्या ! अशा दुष्कीर्तीचं काजळ पुसून निघण्याला एक सोपा मार्ग आहे. "

" तो कोणता गुरु ? "

" अरे ' चुकलों ', ' क्षमस्व ' असं म्हणून आपल्या तोंडात फडा-फड मारून गाल सुजविणं हा ! "

" असो. चला, इतर पुष्कळ वेळीं जर गुरुजींच्या पुढचा मेवा, पेढे, खारका खाऊन त्यांच्या बकाण्यानं आंतून गाल सुजविता आले, तर मधून मधून एखादे वेळीं खऱ्याखोट्या चुकीबद्दल तोंडांत मारून घेऊन बाहेरून गाल सुजवून घेण्याला कोणी शिष्यानं हरकत कां घ्यावी ? ठीक आहे. हिंसा-अहिंसा शब्दांच्या संकोचाचा, विस्ताराचा प्रकार मला कळला. पण गुरु, एका गोष्टीचा अजून मला नीटसा उलगडा झाला नाहीं. "

" ती गोष्ट कोणती ? "

" ती अशी कीं, परवां सकाळीं त्या तरुणाला बागेंत उन्मादावस्थेंत सोडून फक्त ते पक्षी त्याच्याच मेहेरबानीनं घेऊन आपण आलों, त्या वेळीं त्याच्या तोंडावर पश्चात्तापाचं कांहींच चिन्ह नव्हतं आणि आज पाहावं तर तो पश्चात्तापांत अगदीं होरपळून निघाल्यासारखा दिसतो, हें कसं काय ? "

" खरं म्हणशील तर मलाहि तें कारण उमगत नाहीं. पण तें कळेपर्यंत तें उमगलंच आहे, असा बहाणा मला ठेवला पाहिजे आणि तो मी ठेवणार. तूं एक लक्षात ठेव कीं, उन्मत्तपणाला दुःख हाच एक खरा उतारा असतो; उपदेश हा असूं शकत नाहीं. म्हणून या एका दिवसांत त्या प्राण्याला कांहीं तरी तीव्र दुःख होण्यासारखं कारण घडलं असावं. त्याचे आईबाप आज इथं आले. त्यांच्या बोलण्यावरून त्याला घरगुती दुःखाचा एखादा प्रसंग आल्याचं दिसत नाहीं आणि माझा तर्क खरा असेल तर त्याच्या पश्चात्तापाचं कारण स्वतः त्या आईबापानाहि अजून कळलेलं नाहीं, आणि तें विचारून समजून घ्यायला त्यांना पुरेसा वेळहि मिळालेला नाहीं. ते आले फक्त त्याच्या शोधाकरितां आणि त्याला परत नेण्याकरिता आणि तेथें मला घरीं बोलवताहेत ते या क्षणीं तरी केवळ त्याच्या इच्छेमुळं. मी शिकारीच्या जागेतून निघतांना त्याला एक मुद्याची गोष्ट उगीच खडा टाकावा त्याप्रमाणं बोललों. कदाचित त्याच्या अनुसंधानानं त्याला हा पश्चात्ताप झाला असावा. "

" ती गोष्ट कोणती ? "

" मीं नाहीं का निक्षून त्याला म्हटलं कीं, ' हा दिवस आणि ही घटका नीट ध्यानांत ठेव ! ' त्या वेळीं त्यानं माझ्या त्या मुद्देसूद दटावणीचा उपहासच केला हें तुला आठवत असेल. "

" हो हो, पक्कं आठवतं. "

" पण कर्मधर्मसंयोगानं त्याच दिवशीं आणि त्याच घटकेला त्याला दुःख देणारी गोष्ट कुठंतरी कांहींतरी घडून आली असेल आणि असं झालं म्हणजे मग साध्या योगायोगांतहि मनुष्याला ईश्वरी सूत्र किंवा संकल्प दिसूं लागतो. "

" असा योगायोग म्हणजे नुसता कावळा बसायला आणि ढापी मोडायला गांठ; पण ती ढापी त्या कावळ्यानं मोडली असं शहाणीं माणसं समजत नाहींत. "

" ठीक बोललास. बुद्धीवर निष्ठा ठेवणारीं माणसं ढापीवर बसणाऱ्या

कावळ्यासारखीं असतात. ढापी मोडली तर त्याकडे लक्ष न देतां कावळा उडून दुसऱ्या ढापीवर जाऊन बसतो. पण भावनावश व श्रद्धाळू माणसं ढापीला चिकटलेल्या फळासारखीं असतात. म्हणून ढापी मोडतांच तीं तिच्याबरोबर खालीं पडून नाश पावतात. कोणाहि गोसाव्या-बैराग्याची चाल-रीत तूं पाहिली असशीलच. देणारा भेटला तर त्याला वाटेल ते आशीर्वाद देत सुटावं. कोणी न देणारा भेटला तर त्याला वाटेल ते शाप देत सुटावं. त्यांतले कोणते आशीर्वाद किंवा शाप खरे कीं खोटे ठरले, हें कोण लेक विचारायला परत गेला आहे ! किंवा सांगायला मुद्दाम होऊन आला आहे ! आशीर्वाद किंवा शाप देतांना आविर्भाव, आवेश मात्र असा असावा कीं, ईश्वरानं गुप्त रूपानं येऊन, भावी घटनेचं अंतर्ज्ञान आपणाला देऊन, किंवा भवितव्याच्या किल्ल्या आपल्या कनवटीला लावून तो बिचारा गेला. ''

" असो. चला, आपणाला आतां कांहीं दिवस सुखाचा व बिनधोक असा अज्ञातवास लाभेल. आज दोन वर्षं आपण दाढ्या, मिशा, जटा वाढवून पोलिसांना गुंगारा देऊन फिरतों आहों. मला वाटतं, त्यांनीं आतां आमचा नाद सोडला असावा. म्हणून अलीकडे आमच्या चौकशीला कोणी येत नाहीं. "

" पण न जाणों, या मोठ्या लोकांच्या संगतीनं कीर्ति वाढेल. त्या कीर्ति-मुळं लोकांची रीघ वाढेल आणि त्या रांगेतलाच एखादा आम्हांला ओळखायचा ! "

" तूं म्हणतोस त्यांत थोडंसं तथ्य आहे. ईश्वराच्या न्यायाचे हवाले मी लोकांना देतों. पण स्वतः मला त्या न्यायाची भीति कधींच वाटली नाहीं. एरवीं माझ्या वाणीला त्यानं फुलाबोलाच्या गांठीइतकं तरी यश कां द्यावं !"

इतकें बोलणें झाल्यावर ते दोघे परत देवळांत आले. तत्पूर्वी सकाळच्या माणसानें मेलेल्या कपोत पक्ष्याचें मृत मांस काढून त्यांत गवताचा पेंढा भरून तो सजवून आणून ठेवून दिला होता. त्याकडे हात दाखवून गुरुजी म्हणाले, " हा आतां जुळला बेत ! ज्या हिंसेंतून हें प्रकरण निघालं तिची उठल्या बसल्या टिमकी वाजवून माझ्या अहिंसा-प्रतिपादनाला जोर आणण्याला

हें साधन उत्तम उपयोगी पडेल. हातांत चाबूक आहे तोंपर्यंत जसे घोडे किंवा वाघसिंहादि क्रूर प्राणीहि सर्कसवाल्याच्या कह्यांत राहतात, किंवा हातांत मंतर-लेली छडी राहते तोंपर्यंत भुतें व समंद मांत्रिकाच्या काबूंत राहतात, त्या-प्रमाणें हा मृत पक्षी जोंपर्यंत माझ्या बसण्याच्या जागीं टांगून ठेवलेला असेल तोंपर्यंत हा तरुण जमीनदार माझ्या मगरमिठींत राहणारच ! ”

“ किंवा त्याला इतर कारणांनीं आपल्या या मूर्खपणाचा पश्चात्ताप झाला नाहीं, ईश्वराच्या घरचा न्याय पटविणारें हिंसापराधाचें दुःख तो विस-रला नाहीं तोंपर्यंत—असेंहि म्हणतां येईल. ”

“ होय, तूं शहाणपणाचं बोललास. पण तसं घडण्याचा संभव थोडा, इतकीच पुस्ती मी त्याला जोडतों. ”

दुसरे दिवशीं उजाडण्याच्या सुमाराला चंदुलाल घोड्याची गाडी घेऊन देवळाशीं आला आणि महाराज व त्याचा शिष्य रात्रीं निघून गेले नाहींत हें पाहून त्याला समाधान वाटलें. दोघांनीं निघण्याची तयारी केली आणि गाडींत बसा असें चंदूनें म्हणतांच गुरुजी म्हणाले, “ नाहीं बाळ, मी वाह-नांत कधींच बसत नाहीं. मी सर्व यात्रा, प्रवास पायांनींच करतों. मला आपला नियम मोडतां येत नाहीं तुझ्या आग्रहाकरितांहि. ” गुरु बसत नाहींत, मग काय शिष्य बसतो ? त्याची हौस मनांत जिरली आणि सन्मान्य पाहुणे पायीं चालणार म्हणून यजमानहि चालणार हें ओघालाच आलें. तात्पर्य घोड्याचें नशीब असें कीं, परत जातेवेळीं नवीन कोणी तर गाडींत बसलेंच नाहीं, पण पाहिल्याच ( चंदु व कोचमन ) माणसांचें त्याचें ओझें वाचल्यानें तो ऐटींत चालूं लागला. पायीं चालणाऱ्या माणसाबरोबर रिकाम्या रथाची ही मिरवणूक लोक कौतुकानें पाहत होते. कारण सुखाचें साधन जवळ सिद्ध असतां उपभोगाची उपेक्षा झाली म्हणजे वैराग्याचें आणखी लक्षण तें कोणतें ? अशा रीतीनें बुवामहाराजांच्या नंदभुवनप्रवेशा-पासूनच त्यांच्या वैराग्याच्या कीर्तीला प्रारंभ झाला.

या विरागी पाहुण्यांची उतरण्याची व्यवस्था नंदभुवनाच्या अतिथि-गृहांत केली होती. बागेंतील मासाहेबांच्या एका खासगी देवघराची मागणी

याकरितां चंदूकडून करण्यांत आली होती; परंतु तें देण्याचें त्यांनीं साफ नाकारलें. अतिथिगृहांतील युरोपियन पद्धतीचें सामान काढून तेथें आदल्या रात्रीं देवळाला शोभेल असें सामान मांडण्यांत आलें होतें आणि त्याच्या तोंडावर व इतर बाजूंना, आयत्या वेळीं ओरबाडून आणून बांधलेल्या लतापल्लवांची गर्दी करण्यांत आली होती. थट्टेनें तरी म्हणतां यावें कीं, हा राजवाडा किंवा प्रासाद नसून ती पर्णकुटी, पर्णशाला आहे !



## कांहीं निरवानिरव : : ११

अतिथि-गृहांत महाराजांची प्राणप्रतिष्ठा झाली तेव्हां सर गंगाराम, मा-साहेब, बिम्बा इत्यादि मंडळी चंदूबरोबर उपस्थित होती. चंदूचे निमंत्रण म्हणूनच नव्हे, तर या अकल्पित घटनेचें कौतुक वाटून गांवांतील त्याचे कांहीं मित्र सोबतीहि आले होते.

सर्व मंडळी जमलेली पाहून, वैराग्याची अकस्मात ऊर्मी येऊन, सर्वा-समक्ष चंदूनें असें एकदम जाहीर केलें कीं, “ महाराजांना मीं आजपासून माझे गुरू केले आहेत. या अतिथि-गृहाचा मठ बनवून त्यांत मीं त्यांची स्थापना केली आहे. आजपासून मीं अहिंसेचें व्रत घेतलें असून त्याचें चिन्ह म्हणून मीं ही माझी शिकारी बंदूक त्यांच्या चरणावर वाहिली आहे. समोर टांगलेला पेंढा भरून ठेवलेला पक्षी मीं दोन दिवसापूर्वीं या बंदुकीनें मारला आणि त्या माझ्या हिंसा-अपराधाची आठवण मला हरघडीं व्हावी या-करितां तो समोरच दिसेल असा टांगून ठेवला आहे. पिंजऱ्यांतला हा दुसरा पक्षीहि माझ्या बंदुकीनें घायाळ होऊन पडला; पण महाराजांची स्वारी वेळे-वर येऊन पोंचल्यानें तो बिचारा वाचला आणि त्यांचा कृपाप्रसाद म्हणून त्याला मी रोज आपल्या हातानें दाणा-पाणी घालून सांभाळणार आहें. महाराज अन्तर्ज्ञानी आहेत अशी माझी खात्री पटली असून, त्यांनीं ईश्वरा-

कडून दिलेलें प्रायश्चित्त मला मिळालें आहे. त्यांनीं उपदेशिलेली अहिंसा मला पटून मी तिचा स्वीकार केलाच आहे; पण तुम्ही मंडळींनींहि अहिंसा व्रत घ्यावें अशी माझी तुम्हांला शिफारस आहे. माझ्या आय्. सी. एस्. च्या जागेचा राजिनामा मी विलायतेला पाठवणार आणि जन्मभर अविवाहित राहून ईश्वरउपासनेंत वेळ घालवावा असें मीं ठरविलें आहें. या सर्व कामांत आपणा सर्व मंडळींचें मी साहाय्य मागतो. ”

ही घोषणा होतांच त्यानें महाराजांच्या पायावर मस्तक ठेवलें. महाराजांनीं आपला वरदहस्त त्याच्या डोक्यावर ठेवला. जम्बूनें तर सपशेल साष्टांग नमस्कार घालून कांहीं वेळ जमीन सोडलीच नाही. पिंजऱ्यांतला कपोतहि नव्या अवसानानें वागडूं लागला असें कांहींना वाटलें. थोड्या वेळानें महाराज त्यांच्याकरितां नेमून दिलेल्या राखीव दालनांत गेले आणि त्यांनीं दार लावून घेतलें.

चंदूला गुरुमहाराजांचा दिनक्रम समजून घ्यावयाचा होता म्हणून तो पहिल्या दिवशीं ती जागा सोडून दुसरीकडे फारसा गेला नाहीं. त्यांना काय हवें नको याची मधून मधून चौकशी केली. गुरूने व शिष्यानेंहि मागितलेल्या वस्तु स्वतः हातानें आणून दिल्या. संध्याकाळीं गुरुमहाराज एकतारी घेऊन भजनाला बसले, तेव्हा चंदूहि मांडी घालून बसला. अतिथि गृहांतील भजनाची नवलाई वाटून सर गंगाराम व मासाहेब दोघेंहि येऊन बसलीं होतीं. नमन व प्रार्थना झाल्यावर महाराजांनीं एक पद म्हटलें. तोंपर्यंत चंदु स्वतःकरितां नवी विकत आणलेली एकतारी नुसती वाजवीत बसला होता, तोंडानें गात नव्हता. पण त्यानंतर महाराजांनीं सहज संत मीराबाईचें एक सुप्रसिद्ध पद म्हणण्याला आरंभ केला. त्याचा पहिला चरण, ‘ तुमबिन मेरी कौन खबर ले, गोवरधन गिरिधारी ’ असा होता. या चरणांतील पहिला विराम ‘ तुमबिन मेरी ’ येथें पडतो. त्या दोन शब्दांचाच पुनरुच्चार होतो. हें घडतांच आणखी एक चमत्कार झाला. तो असा कीं तो चरण घेऊन स्वतः चंदुलालहि गाऊं लागला. ‘ मेरी ’ हा शब्द तो अधिक स्पष्ट उच्चारी. तोच शब्द तोंडांत घोळवी. त्यांत त्याला कोणता

विशेष आनंद लाभत होता कुणाला ठाऊक ! पण तो चरण पुनः म्हणण्याची महाराजांना शिफारस करण्यापर्यंत त्याची मजल गेली. चंदु भजन करूं लागला हें पाहून आईबापांच्या आश्चर्याचा कडेलोटच झाला आणि तोंड फुटलेल्या या चमत्कारांच्या थैलींतून आणखी काय काय बाहेर पडतें कुणाला ठाऊक असें त्यांना होऊन गेलें !

झाला हा सर्व प्रकार बंदुकींत ठासून राहिलेली गोळी एकदम उडावी त्याप्रमाणें घडला. कांहींच्या दृष्टीनें तो अपघातच झाला, यामुळें आणि त्यांत इतर कोणाला कांहींच अवसर नसल्यामुळें, सर्व मंडळी कांहीं वेळ जमिनीला खिळून बसल्यासारखी निश्चल उभी राहिली आणि सावकाश हलक्या पावलांनीं निघून गेली. सरसाहेब व मासाहेब यांना इतकेंच माहित होतें कीं, चंदूला एका बैराग्याचें कौतुक वाटून त्याला आपल्या घरीं आणून ठेवण्याची इच्छा झाली आणि यांत विशेष वावगें कांहीं नाहीं असें समजून, एखाद्या मुलाचा लाडिकपणाचा चाळा पुरवावा अशा भावनेनें त्यांनीं त्याचें म्हणणें मान्य केलें; पण आतां पहावें तों हें भलतेंच झालें !!

साहेब लोकांकरितां राखून ठेवलेल्या अतिथिगृहांत चंदूनें या गोसाव्याची स्थापना केली, हें सर गंगाराम यांना कसेंसेंच वाटलें. परंतु सर्वांसमक्ष चंदूनें जी अकल्पित घोषणा केली तिचा ग्रंथ त्यांना कांहींच न लागल्यानें ते स्तंभित झाले. शिकारीच्या प्रसंगाचा वृत्तांत त्यांच्या कानावर आला होता. म्हणून त्यांना वाटलें कीं, फार तर बंदुकीनें पक्षी मरून पडलेले पाहून, बैराग्याच्या उपदेशानें चंदूची दयाबुद्धि जागृत झाली असेल. कारण अशा गोष्टी केव्हां केव्हां घडतात पण शिकार सोडली त्याबरोबर आय्. सी. एस्. चा राजिनामा देणार आणि वरती अविवाहित राहून जन्म घालविण्याचा निश्चय ! हें गूढ त्यांना कसें उकलणार ?

पण मुलाच्या या घोषणेवरून त्यांनीं तर्क केला कीं, त्याच्या बुद्धींतच कांहींतरी एवढा मोठा बिघाड झालेला आहे कीं, तूर्त त्याची नुसती चौकशीहि करणें बरें नव्हे आणि करायची तरी कोठून, कसा प्रारंभ करावा

हें त्यांना कळेना. कारण आपल्या चुकीनें भलत्या अंगानें प्रारंभ झाला तर आणखी कांहीं भलतेंच व्हावयाचें !

एकदम आग लागली असतांना कोणीकडून ती विझवायला लागावें हें न कळून मनुष्य भांबावून जातो, तसें सरसाहेब व मासाहेब यांना झालें. या जगांत त्यांचें सर्वस्व काय तें हा एकटा मुलगा. कितीतरी भावी सुखस्वप्नें त्याच्या पायावर रचलेलीं ! मुलगा आपला खरा; पण उलट त्याच्या जीवनाच्या नौकेंत आपण हातपाय बांधून बसल्यासारखे झालेले असून, नौकेचें सुकाणू त्याच्या हातीं आहे आणि तो तें भलत्या दिशेनें फिरवीत असल्याचें उघड दिसत असतांहि प्रेमामुळें बोलण्याची चोरी ! घरांत कोणी अवचित जिवंत बॉम्बगोळा किंवा सर्प आणून ठेवलेला दिसावा, पण त्याला कोणीकडून हात लावावा हें कळूं नये, अशी त्या बिचाऱ्या आईबापांची स्थिति झाली.

सर गंगाराम यांच्या मनावर पाहिल्या झटक्यासरशीं फारच परिणाम झाला. पण आपला मुलगा हेंच आपलें दैवत असें मानणारे ते होते. त्यामुळें स्वतः तो मुलगा ज्या गुरूच्या भजनीं लागला त्याच्या भजनीं त्यांनींहि लागावें हें क्रमप्राप्तच नव्हतें काय ? झालें ! तेहि आतां नम्र भावानें गुरुमहाराजांच्या पायांवर मस्तक ठेवूं लागले. त्यांच्या जवळच असलेल्या ठावक्यांतली अंगाऱ्याची चिमट कपाळाला लावूं लागले. धुवटापेक्षां मळलेलीं वस्त्रें त्यांना अधिक आवडूं लागलीं. पोकळ वेदान्ती अध्यात्मिक गप्पा त्यांना आवडूं लागल्या. साहेब लोकांकडचें त्यांचें जाणें येणें कमी झालें. त्यांचीं खास व्यसनें अगदीं सुटलीं असें नाहीं; पण थोडा त्यांना आळा बसला आणि चंदूइतका त्यांचा गळा गोड नव्हता तरी आपल्या भेसूर गाण्याची लाज न वाटून ते चंदूबरोबर मठांत भजन करूं लागले. पण 'तुम बिन मेरी कौन खबर ले' हा एकच चरण बापलेकांच्या तोंडून निघे, तेव्हां अन्तर्ज्ञानी लबाड मिस्कील देव तो देखावा पाहून आभाळांत हंसत असतील नव्हे काय ? दैव हें प्राणीमात्राचें विडम्बन असेंच करून क्रीडासुख भोगतें !

पण सर्वांपेक्षां चमत्कार हा कीं, मासाहेब स्त्रीजाति असूनहि या स्थित्यं-

राला वळी पडल्या नाहींत. चंदूविषयीं त्यांचें प्रेम त्यांच्या पतीपेक्षां कमी नव्हतें. कसें कमी असेल? शिवाय स्त्रिया या अधिक भावनाप्रधान म्हणून भावनावश असतात. श्रद्धाळूपणाची जगांतली सर्व अपकीर्ति जाणत्या लोकांनीं स्त्रीवर्गाच्या माथीं मारलेली. असें असतां त्या मात्र मनानें खंबीर राहिल्या. काय असेल तें असो, घरीं हा बुवा आणून स्वतःच्या संसाराचा सत्यानाश केल्याबद्दल त्यांचें मनच त्यांना सांगे कीं साधुबुवांचें हें नाणें कांहीं खरें नव्हे, खोटें आहे आणि चंदूला आलेलें वैराग्य हें जरी खोटें नसलें तरी केवळ कांहीं निमित्तानें आलेलें म्हणून तें टिकणारें नव्हे! त्यांनीं खोल मनानें या गोष्टीचा विचार सुरू केला. मात्र आपलें खरें मत उतू येऊं दिलें नाहीं व तसें त्या कोणाशीं बोलल्या नाहींत. त्यांनीं अकांडतांडव केलें नाहीं, रडल्या नाहींत. मुलाशीं भांडल्या नाहींत. त्याला टाकून बोलल्या नाहींत. परंतु आपला नवरा व मुलगा हे जें करतात तें त्यांचें त्यांनाच लखलाभ असो, आपला संबंध त्यांत नाहीं, अशी जाणीव मनाशीं ठेवून त्यांनी आचरणहि तसेंच ठेवलें होतें. चंदूला आणण्याकरिता भद्रेश्वराच्या देवळांत मासाहेब गेल्या, तेव्हां या वैराग्याचें दर्शन त्यांना घडलें व त्यांनीं त्याला ओझरता नमस्कार केला तेवढाच! पण घरच्या बागेंत अतिथिगृहांत त्याला आणून चंदूनें ठेवला, तरी त्या केव्हांहि त्याच्या दर्शनाला गेल्या नाहींत. आतां पाहुण्याला शिधा-सामग्री देवविणें त्यांना प्राप्तच होतें. पण घरच्या नोकरांना ' चंदू काय सांगेल तें देत जा, करीत जा ' इतकें एकदांच सांगून त्या मोकळ्या झाल्या होत्या.

या परिवर्तनानें चंदूच्या घरीं जसा गोंधळ उडाला, तसाच पण त्या-खालोखाल, दुसऱ्याहि एका घरीं तो उडाला. तें घर म्हणजे रायबहादूर शामलाल यांचें. कारण शरयू व चंदुलाल यांच्या लग्नाच्या तयारींत त्यांचा हात गुंतला होता तो एकदम लुळा पडला. दोहों कुटुंबांच्या ऋणानुबंधामुळें शरयूकरितां त्यांनीं दुसरें स्थळच पाहिलें नव्हतें आणि चंदूसंबंधानें झालेल्या वाङ्निश्चयावर आधारून चार वर्षेंपर्यंत, म्हणजे तो विलायतेहून परत येई-पर्यंत, त्यांनीं आशेनें दिवस काढले होते. तो परत येऊन आय्. सी. एस्.

परीक्षा उतरून भावी व्याही-विहिणीकडून तयारीची सूचना आल्यामुळें मुलीच्या आईबापांना किती आनंद झाला असेल ! पण आतां त्यांना चंदूची ही घोषणा ऐकून डोक्यावर वज्रपात झाला असें वाटलें आणि त्या घरावर एकदम उदासपणाची छाया आली.

गावच्या समाजावरहि या गोष्टीचा परिणाम झाला तो सुखदुःखाचा नसून कौतुकाचा किंवा चिकित्साजागृतीचा होता. गांवांतील मुख्य प्रतिष्ठित कुटुंबाचें भाग्य तें आपलें भाग्य, त्याची अब्रू-बेअब्रू ती आपली अब्रू-बेअब्रू असें कोणताहि समंजस गाव मानतोच. पण सर गंगारामांच्या घरीं घडून आलेल्या प्रकाराला सद्भाग्य म्हणावें का दुर्भाग्य म्हणावें, अब्रू म्हणावी कीं बेअब्रू म्हणावी, याचा निर्णय लोकाना कसा करिता येणार ? मात्र एकंदर धोरण स्तुतीकडे झुकलेलें दिसलें, निंदेकडे नव्हे ! ‘ प्रवृत्तिरेषा भूतानां निवृत्तिस्तु महाफला ’ हें वचन प्रसिद्धच आहे. चंदूलालची जी प्रवृत्ति पूर्वीं दिसून आली तीच वाढत गेलेली दिसती, तर त्यांना कांहीं अनपेक्षित असें घडलेसें वाटलें नसतें. पण त्याच्या प्रवृत्तीचें रूपान्तर अगदीं दुसऱ्या टोकाला जाऊन निवृत्तींत झालें आणि तेंहि जग ज्याला बहुमान देतें अशा धार्मिक आध्यात्मिक दिशेकडे झालें. तेव्हां स्तुतिच व्हावी हें प्राप्त; शिवाय चंदूच्या कारणानें एक नवीन साधु गांवाला लाभला याचेंहि महत्त्व होतेंच.

दोन दिवस असेच गेल्यावर आईबाणांच्या लक्षांत आले कीं, चंदूनें आपल्या कपाटांतील दारूच्या बाटल्या काढून त्या लोकांसमक्ष उकिरड्यावर ओतल्या आणि दिवसांतून बऱ्याच वेळां त्याच्या तोंडांत सिगारेट दिसावयाची, ती आतां एकदाहि दिसत नाहीं. या गोष्टींनीं सर गंगाराम व मासाहेब यांच्या मनांत मुलाविषयींच्या प्रेमाबरोबर एक प्रकारची आदरबुद्धीहि नव्यानें उत्पन्न झाली. दोन दिवस असेच जाऊं देऊन तिसऱ्या दिवशीं तीं तिघेंहि चहाला एकत्र बसलीं असतां सर गंगाराम यांनीं गोष्ट काढली. ते भीत भीत म्हणाले, “ चंदू, दोन दिवस आम्हीं कांहीं विचारलें नाहीं. पण आतां विचारूं का ? तुला राग तर नाहीं ना येणार ? ”

आपल्या वडिलांच्या मनाला या परिस्थितीचा गोंधळ कां पडला असेल हें चंदूला कळण्याला काय कठिण होतें ? त्याच्याहि मनांत आईबापाविषयीं प्रेमच होतें. उलट तीं न रागवतां आपल्याशीं लाघवीपणानें, आर्जवानेंच वागत आहेत हें पाहून त्याला एक प्रकारें कृतज्ञताच वाटली. तो म्हणाला, " पपा, मासाहेब ! तुमच्या मनाला मीं जबरदस्त धक्का दिला हें मला कळतं. पण त्याबद्दल तुम्ही मला क्षमा करा आणि मोकळ्या मनानं हवं तें विचारा ! "

सर गंगाराम म्हणाले, " हा जो सगळा परिणाम घडला तो तुला एकदम हिंसेचा विषाद वाटूनच ना ! "

" होय पपा. पण मला नुसती आहिंसाच पटली असं नव्हे, तर जगांत अंतर्ज्ञानहि म्हणून कांहीं असतं आणि ती ईश्वराची एक विशेष देणगी आहे हेंहि मला पटलं. "

" तें कसं पटलं ? त्या अंतर्ज्ञानाचा प्रत्यय तुला काय आला ? "

" ती गोष्ट मात्र मी सांगूं इच्छीत नाहीं. त्याकरितां तुम्ही मला क्षमा केली पाहिजे. तें रहस्य माझं माझ्यापुरतंच आहे. "

" पण ईश्वरी अंतर्ज्ञानाची शक्ति खरी आहे असं कळलं म्हणून आय्. सी. एस्. चा राजिनामा पाठवणं तूं कां करावंस ? तुझ्या जन्मापासून मी एकच ध्येय डोळ्यांपुढं ठेवून बसलों असेन तर तें तूं आय्. सी. एस्. आणि मोठा सरकारी अधिकारी झालेला पाहावा हें होतं. त्यांत तूं माझी निराशा केलीस आणि त्याहि पलीकडची गोष्ट म्हटली म्हणजे यापुढं अविवाहित राहून जन्म घालविण्याचा जो निश्चय तूं केलास त्याची संगती तर मला मुळींच लागत नाहीं. जगांत अंतर्ज्ञान म्हणून कोणा एकाला कांहीं विशेष असलं तरी त्यामुळं त्यानं किंवा निदान इतर संसारी माणसांनीं संन्याशी काय म्हणून बनावं ? तूं आमचा एकुलता एक मुलगा अविवाहित राहिल्यानं तुझं संसारसुख संपलं हें पाहून आम्हांला वाईट वाटणारच. त्यामुळं आमचा वंश समूळ नष्ट होईल त्याची वाट काय ? आमच्या या जमीनदारीला उद्यां कोण धनी होणार ? एक वेळ आय्. सी. एस्. चा राजि-

नामा दिलास तरी ती बाब मी लहान मानीन. तुला मोठा पगार मिळेल अशी माझी लोभाची दृष्टि यांत कधींच नव्हती. आपणाला पुरून उरेल एवढी जमीनदारी आहे. मान्यतेच्या दृष्टीनं तूं परीक्षा पास झाल्यानं ती मान्यता पदरांत पडलीच आणि तूं सरकारी नोकरी सोडलीस यामुळं तूं बडा अधिकारी झालेला पाहावा ही जी इच्छा नष्ट झाली तिचा मोबदला आम्हांला दुसऱ्या रीतीनं मिळणार आहे. कारण तूं अधिकारी नोकर नसल्यामुळं घरींच आमच्या जवळ नेहमीं राहशील. पण लग्न करण्याचा विचार सोडून दिल्यानं रायबहादूर शामलाल यांच्याशीं मीं जो वाङ्‌निश्चय केला त्याचं काय होणार ? त्यांची मुलगी शरयू इच्याकडं सुनेच्या नात्याच्या प्रेमळ दृष्टीनं आम्ही पाहात आलों ती दृष्टि नष्ट व्हावी काय ? आणि त्या गोड मुलीचा प्रेमभंग तूं करावा असा अपराध तिनं काय केला ? तुला राजीखुषी आनंदी ठेवण्याशिवाय आम्हां दोघांना या जगांत दुसरं सुख काय असणार ? पण तूं आमचा सारा उलथा संसार पालथा घातलास याला काय म्हणावं हेंच कळत नाहीं ! ”

मासाहेब म्हणाल्या, “ यांनीं तुला सांगितलं तेंच माझंहि म्हणणं. पण मला आणखी थोडं म्हणायचं आहे. तूं हे जे गुरुमहाराज घरीं आणून ठेवलेस त्यांचं तूं काय पाहिलंस ? मी जुन्या धार्मिक वळणाची असलें तरी तुझ्यासारख्या शिकलेल्या तरुणानं पेंगुळलेल्या बुद्धीनं गुरुभजनीं लागावं हें कांहीं मला बरं दिसत नाहीं.”

पण चंदूनें या दोघांच्या प्रश्नाला कांहींच उत्तर दिलें नाहीं. तो म्हणाला, “ आई, माझं वर्तन तुम्हांला चमत्कारिक दिसतं हें मलाहि समजतं. पण मी तें तसं कां करतों हें माझं मलाहि जर समजत नाहीं, तर मी तें तुम्हांला कसं समजावून सांगणार ? तुमच्या मनाला दुःख दिल्याबद्दल मला क्षमा करा. ”

यापुढं तीं दोघं काय बोलणार ? बरोबरीचा मुलगा, सुविद्य, बुद्धिमान, कर्ता. पण तो जर आपणाला काय वाटतं हें सांगूं शकत नाहीं तर आपण त्याला आणखी छेडून काय उपयोग ? आपल्या आवडत्या व्यसनांचा स्वार्थ-

त्याग करण्याला चंदु तयार झाला ! त्यानें आपलं परिवर्तन प्रामाणिकपणाचं आहे याचा आणखी खात्रीलायक पुरावा कोणता द्यावा ?

दुसरे दिवशीं सकाळीं सर गंगाराम आणि मासाहेब मोटारींत बसून रायबहादूर शामलाल यांच्या घरीं गेलीं. यथोचित सत्कार झाल्यावर मासाहेब आणि रायबहादूराच्या पत्नी पडद्यामागें जाऊन बसल्या. हे दोघे पुरुष जवळच्या दालनांत बसले. सर गंगाराम हे किंचित् मान खाली घालून म्हणाले, " रायबहादूर, आम्ही दोघं आज आपणा दोघांची क्षमा मागायला आलों आहों. "

रायबहादूर आश्चर्यानें काय म्हणाले, " हें काय आपण बोलतां, मला समजत नाहीं ! "

" क्षमा अशाकरिता कीं, काय कारण झालं असेल तें असो, चंदूला अकस्मात् कांहीं मानसिक बाधा झाली आहे. त्यानं एका वैराग्याला आणून त्याला गुरु म्हणून त्याची स्थापना आमच्या घरीं केली आहे. त्यानं अहिंसेची शपथ घेतली, गळ्यांत तुळशीची माळ घातली, आय्. सी. एस्. च्या जागेचा राजीनामा दिला आणि—आणि—सांगायला लाज वाटते, दुःख होतं, रायबहादूर—"

" सांगा, सांगा; वाईट वाटून घेऊं नका. आतां यापुढं तुमचं दुःख तें आमचं दुःख नव्हे का ? "

" होय. तसाच संबंध जडावा अशी इच्छा. पण म्हणतात ना, ' मन चिंती एक, त्यांत दैव मारी मेख ' तसं झालं. आपल्या मानसिक लहरीपणाचा कळस करावा म्हणूनच कीं काय चंदूनं आजन्म ब्रह्मचर्याची शपथहि घेतली. "

पडद्याबाहेर आणि पडद्याच्या आंत दुःखाचे सुस्कारे चार तोंडांतून एकदम बाहेर पडले.

रायबहादूर म्हणाले, " पण याचं कारण—म्हणजे नुसत्या ब्रह्मचर्याच्या प्रतिज्ञेचंच कारण मी नाहीं म्हणत—पण या एकंदर वैराग्याचं कारण काय असावं ?"

" काय सांगूं कारण ? कुणाला सांगितलं तर खरंहि वाटायचं नाहीं. "

" तरी पण —"

" चंदुनं शिकारीच्या बंदुकीनं झाडावरचीं दोन पाखरं मारलीं. तितक्यांत तिकडून एक बैरागी आला. त्यानं ती हिंसा म्हणून चंदूला शाप दिला, आणि तो शाप सफल झाला असा कांहीं अकल्पित रीतीनं चंदूला साक्षात्कार घडला. आतां तुम्हीच सांगा, रायबहादूर, चंदूसारख्या सुशिक्षित तरुणासंबंधानं हें घडावं कसं ? आणि घडलं म्हटलं तर तें खरं तरी कोण मानील ? पण तें कसंहि असो, आम्ही जीं दोघें आलों तें असं सांगण्याकरितां कीं चंदूनं म्हणजे एक प्रकारें आम्हीच तुम्हांला आज चार वर्षे नादीं लावून शेवटीं तुम्हांला फशीं पाडलं असं होतं.शरयूसारखी सून मिळायचं आमच्या नशिबीं नसो; पण तुम्ही आतां त्या लग्नाच्या वचनांतून मुक्त झालां असं समजा आणि मुलीला अनुरूप असं दुसरं एखादं स्थळ पाहा. आमचं दुःख गिळून आम्ही तिच्या डोक्यावर अक्षता टाकून आशीर्वाद द्यायला अवश्य येऊं. "

" हात्तेच्या रे! सरसाहेब, एवढंच ना ? मीं म्हटलं, आणखी काय आहे यापेक्षां अधिक क्षमा मागण्यासारखं ? यांत असलों तर तुम्ही आम्ही दोघें सारखेच दोषी ठरूं. कारण हा विवाह दोघांना सारखाच इष्ट वाटत होता, आणि दोघंहि एकमेकांना सारखीच आशा लावून बसलों नव्हतों का ? बरं, चंदूलालनं तोंडघशीं पाडून निराशा केली असेल, तर ती दोघांची सारखीच केली आहे. यांत क्षमा कुणी मागावी ? आणि कुणी द्यावी ? जाऊं दे कीं ! सरसाहेब, अशीं लग्नं जगांत किती तरी मोडतात. आम्ही आमचं जें कर्तव्य तें अवश्य करूं. अजून लग्नसराईला चांगले तीन चार महिने आहेत आणि तुम्हांला हेहि सांगतों सरसाहेब, भावनावश तरुणांनीं वाहिलेल्या शपथा आणि प्रतिज्ञा आपल्या अशा तशाच समजाव्या अनुभवी प्रौढांनीं वडिलांनीं. वाऱ्यानं आलं तें वावटळीनं गेलं, असं इतर थोडं का पाहातों आपण या जगांत ? त्यांतलंच हें समजावं झालं. "

आणि भाषणाला विनोदाची कलाटणी देण्याच्या हेतूनं रायबहादूर हंसून

म्हणाले, " काय पण भाग्यवान निघाला चंद्रु ! या इंग्लंडरिटर्न्ड एम्. ए., बॅरिस्टर, आय्. सी. एस्. चं वैराग्याचं सोंग कसं काय शोभतं आणि साधतं हें पहायला मला आलंच पाहिजे एकदां तुमच्या घरीं. "

इतक्यांत रायबहादुरांची पत्नी नवऱ्याला उद्देशून आंतून मोठ्यानें म्हणाली—" आतां भीड कशाला धरावी ? आपणाला माहीत झालं आहे या लग्नाच्या बाबतींत कांहीं विशेष तेंहि सांगून टाकाव आतांच. सहज बोलणं निघालंच आहे कीं परस्पर. "

आपल्या बायकोची ही सूचना पसंत पडून रायबहादूर म्हणाले, " बरं, आपलं सांगून झालं चंद्रुसंबंधानं काय सांगायचं होतं तें ? आतां आम्हीहि सांगतों चंद्रुसंबंधानं आमच्या विशेष माहितीचं अन् नवलाचं, तें ऐका. "

" तें काय ? "

" तें असं. चंद्रु विलायतेहून आल्यावर परवा आमची थोरली मुलगी आली होती आमच्या घरीं राहायला दोन दिवस. त्या अवधींत ती अन् शरयू बसल्या होत्या वहिणी वहिणी जिव्हाळ्यानं खासगी बोलत. तेव्हां शरयूनं चंद्रुकडनं आपणाला आलेलीं अलीकडचीं एक दोन पत्रं दाखविलीन् वहिणीला. त्यावरनं तिला अशी शंका आली म्हणे कीं, चंद्रुनं शरयूच्या लग्नाचा नाद सोडून दिला असावा, आणि त्याच्या मनांत तिकडची एकादी इंग्रज मुलगी बायको करून आणायची असावी. "

" छे, छे ! चंद्रु असं करील ? " सर गंगाराम आश्चर्यानें म्हणाले.

" अहो, अशा गोष्टी तुम्हां-आम्हाला का तो लिहिणार ? शरयूला त्याचीं पत्रं येत तीं पाहून त्यावरनं आमच्या आक्कानं कयास बांधला कीं शरयूकडचा त्याचा ओढा कमी झाला म्हणून ! तुम्ही हवं तर तें जमेला धरूं नका. पण चंद्रुचा मिश्रविवाहाचा तो अत्याचार काय, आणि अकाल ब्रह्मचर्याचा हा अनाचार काय दोनहि एकच. म्हणजे तरुण ते तरुण, अविचारी ! दुसरं काय म्हणायचं ? "

या माहितीनं सर गंगाराम आणि मासाहेब यांच्या मनावर कांहीं नवाच

प्रकाश पडला. पण त्यांच्यावर आलेल्या संकटाच्या अंधारांतून नीट बाहेर वाट दाखवील इतका तो प्रकाश स्वच्छ नव्हता. असो.

नंतर क्षणभर बसून तीं दोघं परत आलीं. मासाहेब म्हणाल्या, " तरी मी तेव्हांच म्हणत होतें कीं, चंद्रला लग्न करूनच पाठवावा विलायतेला. पण माझं कोण ऐकणार ? इकडून त्याला लाडावून डोक्यावर चढवून ठेवला. भोगा आतां त्याचीं फळं ! "

" खरं आहे मासाहेब ! आपण आतां बोलाल तितकं थोडं आहे ! "

रायबहादूर शामलाल यांना आपल्या हातचं एक मोठं जांवई पवाड गेलं असं वाटलं आणि चार वर्षं थांबून फिरून मुलीला नवरामुलगा शोधण्याला त्यांना प्रारंभ करावा लागणार ! त्यांना सर्व तऱ्हेची अनुकूलता आणि शरयू मुलगी हीहि देखणी. यामुळें एखादे चांगलें स्थळ मिळण्याची फारशी चिन्ता होती असें नाहीं. परन्तु कोणालाहि हातचें गमावलें यापुरतें तरी वाईटच वाटतें. पण मनुष्य असा शहाणाहि असतो कीं, प्राप्त आलेल्या संकटापेक्षा टळलेलें असें एखादें संकट अधिक दुःखद असूं शकतें अशी कल्पना करून, त्याच्या तुलनेनें आहे हीच स्थिति बरी म्हणतो. त्याप्रमाणें रायबहादूर शामलाल आणि त्यांची पत्नी यानीं जेव्हां या गोष्टीची एकान्तांत चर्चा केली, तेव्हां त्यांनीं एकमतानें असें ठरविलें कीं, ' झालें हेंच एका अर्थानें बरें ! लग्न चार वर्षं लांबणीवर पडले हा कुयोग नसून सुयोगच म्हणावा ! कारण नियोजित जावई इतर सर्व दृष्टींनीं चांगला खरा; पण इतका पाऱ्यासारखा चंचल स्वभावाचा निघेल हें कुणाला माहीत ? आज गुरुभजनीं लागून अविवाहित राहण्याची प्रतिज्ञा त्यानं केली. पण समजा, शरयूशीं त्याचं लग्न झालं असतं, आणि या विपरीत विरक्तीचा कळस म्हणून त्यानं एक दिवस बायकोलाच आई म्हणून हांक मारली असती, तर आपण काय केलं असतं ? त्या संकटांतून सुटका झाली हेंच सुदैव म्हणावें.'

चंदूच्या लग्नासंबंधाने, म्हणजे तें फिसकटल्यासंबंधानें, आपलें कर्तव्य वरीलप्रमाणें केल्यावर सर गंगारामांनीं आणखीहि एक गोष्ट अगदीं आठवण ठेवून केली. चंदूच्या कचेरीच्या खोलींत सहज गेल्यासारखं करून ते म्हणाले,

" चंदू, तुझ्या कोणत्याहि इच्छेच्या आड येण्याची आमची इच्छा नाहीं. तुझ्यापेक्षां का तुझी आय. सी. एस्. मला अधिक प्रिय आहे ? तूं स्टेट-सेक्रेटरीकडे नोकरीचा राजीनामा पाठविणार, तो लिहून झाला असला तर आण इकडे. तो पाकिटांत घालून वर पत्ता लिहून माझ्याकडे दे पाहूं. मीच बाहेर जाईन व तो आपल्या हातानं टपालांत टाकीन. उगीच कारकुनाच्या कीं आणखी कोणाच्या हातीं तो जायला नको. गवगवा नको त्याचा. "

" ठीक आहे " म्हणून चंदूनें राजीनामा लिहिला. तो दोन-दोनदां वाचला. आपल्या हातानं टाईप केला. पाकिटांत घालून बंद करून त्यावर योग्य तो पत्ता लिहिला आणि सर गंगाराम यांच्या हातीं दिला आणि इतकेंच म्हणाला—

" पपा, मी आय. सी. एस. होण्याकरितां तुम्हीं काय काय परिश्रम केले, किती खर्च केला, हें मला माहीत का नाहीं ? पण मला आतां त्या नोकरीचा वीट आला खरा. माझ्यावर तुम्ही रागावणार नाहीं ना ? "

सरसाहेब घाईने म्हणाले " अरे, वेडा आहेस चन्दू. तुझ्यावर रागवायला मला काय कळत का नाहीं ? आणि तुझ्यावर रागावून दुसऱ्याकडे पाहून समाधान लाभायला मला आणखी का एखादा मुलगा आहे ? अरे, आय्. सी. एस. म्हणजे काय गोष्ट आहे ? तूं आनंदांत असलास म्हणजे लाथ मारशील तिथं पाणी काढशील. नुसती बॅरिस्टरी केलीस तरी पैसाच पैसा मिळेल आणि कीर्तीहि होईल.तूं अगदीं वाईट वाटून घेऊं नको आमच्या कोणा-करितां. आत्मतुष्टीसारखं जगांत मनुष्याला दुसरं सुख नसतं. चल, झालं ना राजिनाम्याचं पाकीट नीट बंद ? दे मजजवळ.जा,स्वस्थ जाऊन झोप घे कशी."

चंदूनें दिलेलें पाकीट घेऊन सर गंगाराम पोष्टाकडे न जातां तडक आपल्या खोलींत गेले आणि आपली तिजोरी उघडून तें पाकीट तिच्या आंतल्या एका खणांत पक्कें ठेवून देऊन त्यांनीं दार बंद केलें आणि बाहेर आले.

ते आपल्याशीं मोठ्यानें म्हणाले, ' कावळ्यापेक्षां त्याचं पोर अधिक शहाणं अशी म्हण आहे जगांत. पण यापुरती तरी मीं ती खोटी केली खरी! "



चंद्रइतका सुशिक्षित मनुष्य असा साधु-भजनीं लागावा याचें कोणालाहि सहजच आश्चर्य वाटण्यासारखें होतें. पण वाचक, तुम्ही मानसशास्त्राचा अभ्यास केला आहे ? किंवा मनुष्यस्वभावाच्या चरित्राचें सूक्ष्म निरीक्षण केलें आहे ? मग तुम्हांला अशाहि गोष्टींचें फारसें आश्चर्य वाटणार नाहीं. कारण तुम्हाला हें माहीत असेल कीं, शिक्षणानें मूळचा स्वभाव सहसा बदलत नाहीं, तर तें शिक्षण अंगच्या स्वभावगुणदोषांत अधिक तीव्रता आणतें.

मूळचा स्वभाव श्रद्धाळू असेल, भावनावश असेल, तर शिक्षणानें तो अधिकच श्रद्धाळू आणि भावनावश होतो. आतां आपल्या विशिष्ट चित्त-वृत्तीकरितां, म्हणजे तिचें समर्थन करण्याकरितां कारणें हुडकून काढणें हें आशिक्षित मनहि करतें. पण अशा कामीं शिक्षणाचा उपयोग—किंवा प्रसंग-विशेषीं दुरुपयोग—हा होतो कीं, अशिक्षिताला जीं किंवा जितकीं कारणें सुचतील त्यापेक्षां सुशिक्षिताला तीं अधिक सुचतात. मात्र ती एक प्रकारची वावदुकी असते. मूळचें खरें समर्थन तीन शब्दानींच झालेलें असतें. ‘ आहे म्हणून आहे, नाहीं म्हणून नाहीं. ’

प्रतिभा तीच असतां सुशिक्षित कवि अशिक्षितापेक्षां अधिक उपमा देऊं शकेल, त्याचप्रमाणें सुशिक्षित समर्थनकार अशिक्षितापेक्षां अधिक दिखाऊ-पणानें आत्मसमर्थन करूं शकतो. पण मुळांतला स्वभाव बदलत नाहीं. पाण्यांत हातानें दाबून सोडलेल्या कॉर्कच्या बुचाप्रमाणें तो कोणत्याहि परि-स्थितींत उसळी मारून वर येणारच.

कांहीं मनांची ठेवण, पार्श्वभागावर टेकड्या व त्या टेकडयांवर शिखरें अशा प्रकारच्या डोंगरासारखी असते. यामुळें त्यावर पडलेलें पाणी कधींच स्थिर रहात नाहीं. तें पडल्याबरोबर डावें किंवा उजवें वळण घेऊन खालीं धावतें. कित्येक डोंगरावर अशीं स्थळें दाखवितां येतातच कीं, एका बोटाच्या फरकानें त्यावर पडलेलें पाणी डावीकडे झुकलें तर पश्चिम समुद्राला मिळेल आणि उजवीकडे झुकलें तर पूर्व समुद्राला मिळेल. वाढत्या गतीच्या इंजिना-

प्रमाणें अशा मनांची प्रवृत्ति अतिशयोक्तीकडे असते आणि ती केल्याशिवाय त्यांना आत्मप्रसाधन ( Self-realization ) झालें असें वाटतच नाहीं.

याच्या उलट दुसरीं कांहीं मनें-चहाच्या बशीच्या आकारासारखीं असतात. म्हणजे त्यांची उंची कमी वाटली तरी संग्राहकतेचा गुण त्यांच्यामध्यें विशेष असतो. त्यांच्या विस्तीर्ण परिघावर कोठेंहि पाणी पडलें तरी तें बाहेर न जाता खालीं ओघळून बशीच्या पोटांतच यावयाचें.

या दोहों प्रकारचीं मनें अशिक्षित व सुशिक्षित या दोहों वर्गांत हवी तितकीं सरमिसळ आढळतात. फरक इतकाच कीं, अशिक्षित मनुष्य श्रद्धाळू पाहिला तर त्याचें आश्चर्य वाटत नाहीं. सुशिक्षित मनुष्य श्रद्धाळू दिसला कीं, त्या चमत्काराचें नवल वाटतें. पण या विसाव्या शतकाच्या तिशी-चाळिशींत भौतिक शास्त्रानें विक्रम किंवा प्रलय केला असतांहि, साधुबुवा-भोंदुबुवा यांच्या कच्छपीं लागून त्यांचे दासानुदास झालेले तरणे बांड सुशिक्षित—महासुशिक्षित—दिसतात. यामुळेंच शेवटीं ' स्वभावो दुरतिक्रमः ' ही म्हण खरी ठरते.

आमच्या चंदूचें परिवर्तन अवघ्या दोन दिवसात घडलेलें पाहून सर्व लोकांना असेंच नवल का वाटलें नसेल ? पण भूकंपानें जळाठिकाणीं स्थळ, स्थळाठिकाणीं जळ निर्माण होतें. टेकड्यांच्या जागीं दऱ्या खोल जातात व दऱ्याच्या जागीं टेकडया उंच उभ्या राहतात.

चंदूच्या मनाला बसलेल्या धक्क्यानें तोच प्रकार झाला. रोज सकाळीं उठल्याबरोबर श्मश्रू करून आरशासारखें तुकतुकीत तोंड झाल्याशिवाय खोलींतून बाहेर न पडणारा चंदु ! पण आज दोन दिवसांत त्याला दाढी करण्याची आठवण राहिली नाहीं. खळ लावून कडकडीत केलेल्या उरोवेष्टनाचे शर्ट अंगावर दिसावे, ते टाकून तो चुरगळलेला मळखाऊ सद्रा घालूं लागला. त्याच्या घोडयाला ठाणबंदी मिळाली. सिगारेटच्या पेटींतील विडया पडून राहिल्या. बाटलीच्या बुचाचा आवाज ऐकूं आला नाहीं. त्याचा बहुतेक वेळ या नवीन बनलेल्या मठांत किंवा मठालगत जाऊं लागला.

आईबापाशींच काय, पण आल्यागेल्याशींहि वागण्याची त्याची रीत

बदलली. बोलण्याचा—हाका मारण्याचा—चढा स्वर दहा अंश खालीं उतरला. लष्करी थाटाचा सलाम जाऊन जोडहाताचा नमस्कार आला आणि भेट देतां घेतां, दुसऱ्याविषयींच्या तुच्छतेनें, मानेवर त्याचें डोकें पूर्वीं नुसतें किंचित् हालल्यासारखें दिसावयाचें, त्याऐवजीं आतां त्याचीं पावलें त्यालाच दिसतील इतकें तें लवूं लागलें. एक उतावळा वात्रट टीकाकार म्हणालाहि कीं ' हे आय्. सी. एस्. बॅरिस्टर नवमदवादी म्हणून, जुन्या जमान्यांतील वधूवरांनीं लग्नांत एकमेकांना घास देणें हें रानटी लक्षण ठरवावयाचे. पण ते आतां कदाचित् लवकरच गुरुप्रसाद म्हणून स्वतः त्याचें उष्टें खाल्लेलें दिसतील ! ' या बोलण्यांतील अतिशयोक्ति चंदूच्या परिस्थितीत झालेल्या बदलाच्या अतिशयोक्तीपेक्षां खचित अधिक नव्हती.

गुरुमहाराज मठांत येऊन राहिल्याला जे थोडे दिवस झाले त्या अवधींत चंदूकडून सगुण गुरुपूजेचे सर्व प्रकार करून संपले. शिष्याच्या हातानें गुरुचें म्हणून करण्याचें असें सर्व काम चंदूनें खास आपल्या हातीं घेऊन शिष्यवर जंबू याला बेकार करून सोडलें.

त्यानें गुरुमहाराजांचे कपडे धुण्यापासून प्रारंभ केला. ते कपडे तो विलायती सुगंधी साबू लावून धुवी. त्यांच्या स्नानगृहाच्या दाराशीं ते हातांत घेऊन तत्परतेनें उभा राही आणि दार उघडतांच ते पुढें करी. स्नानाला पाणी आपल्या हातानें काढून देई आणि केव्हां केव्हां आपल्या हातानें त्यांचें अंग चोळण्याचा हट्ट धरी. गुरुमहाराज पूजेला बसले म्हणजे तो हातांत फुलांची परडी घेऊन उभा राही आणि त्यांनीं हात पुढें करतांच एकेक फूल निवडून काढून तें त्यांच्या ओंजळींत टाकी. गुरुमहाराजांना पूजामंत्र फारसे येत नव्हते. तथापि ध्यानाकरितां म्हणून त्यानीं डोळे मिटले म्हणजे त्यांना बराच काळ निष्क्रियतेनें काढून पूजाविधि उगीच लांबवितां येई आणि महाराजांनीं डोळे मिटले म्हणजे चदु समोर उभा ठाकून त्यांच्या ध्यानस्थ मुखाकडे दृष्टि देऊन तटस्थ राही. त्यांचा ओठ, पापणी, भुवई कांहीं किंचित् हललें कीं त्या क्रियेला कांहीं आध्यात्मिक गूढ

अर्थ आहे असें त्याला वाटे. पण तो कळण्याला आपण अपात्र आहों याचें मात्र त्याला दु:ख होई.

भोजनाचेंहि असेंच. चंदु खाण्याचे जिन्नस गुरुमहाराजांच्या ताटांत आपल्या हातानें वाढी. महाराजांना आपल्या हातानें भरवितां आलें तर तें त्याला हवें होतें. परंतु महाराजांनाच त्याची लाज वाटून ते त्याला मना करीत आणि या भोजनमहोत्सवाच्या वेळीं हाताला काम नाहीं म्हणून तो हातांत पंखा घेऊन त्याना वारा घालीत आणि पर्यायानें पानावरील माशा वारीत उभा राही. महाराज हात धुवायला गेले म्हणजे तोहि त्यांच्याबरोबर हातावर पाणी घालायला जाई. पण ते पानावरून उठून बाहेर निघतांच, त्यांचा व इतरांचा डोळा चुकवून, त्यांच्या पानांतला एखादा उष्टा घास आपल्या तोंडांत टाकण्यांत त्याची जी तारांबळ उडे ती सागतां पुरवत नाहीं. उष्टें खाण्याची मनांतून इच्छा, पण बाहेरून लाज. पोट भरण्याकरितां खाण्याच्या पदार्थांची चंदूला वाण का होती ? आणि त्या एका उष्ट्या घासानें कितीसें पोट भरणार ? पण गुरूच्या उष्ट्या घासाचा गुण हाच कीं, त्यानें जठराची नव्हे, पण आत्म्याची क्षुधा शांत होते. तादात्म्य हेंच गुरुभक्तीचें ध्येय. गुरु हा शिष्याला ‘ आपणासारिखा तात्काळ ’ करतो असें तुकाराम म्हणे; पण तसें करणारा गुरु खरोखर क्वचितच भेटतो आणि स्त्रीविषयक जीवनांत प्रणयाराधनेला ( कोर्टशिपला ) जें महत्त्व तेंच गुरूपासनेंत सगुण पूजेला असल्यामुळें, ती जितकी लांबेल तितका अधिकच आनंद शिष्याला लुटायला सांपडतो. गुरूनें शिष्याला एकदम आपणांसारखें केलें तर गुरु-प्रणयाराधनेचा आनंद कुठचा ?

भोजन सुग्रास व यथेच्छ; यामुळें त्यानंतर लवकरच गुरुमहाराजांना निद्रासमाधि लागे. या वेळीं महाराज डोळे मिटून घोरूं लागेपर्यंत चंदु त्याचे पाय चुरीत बसे आणि झोपेंत त्यांच्या तोंडून काय उद्गार निघतात याकडेहि त्याचें लक्ष राही. आत्म्याचें खरें आविष्करण निद्रावधींतच होतें आणि तेव्हां मनुष्य जें बोलतो त्यांत जातिवंत सत्य असतें हें चंदूनें मानसशास्त्रावरील पुस्तकांत वाचलें होतें. त्याला हें कळण्याची इच्छा होती कीं मेरी

तर स्वर्गवासी झालीच; पण तेथें तिला सद्गति मिळाली आहे कीं नाहीं? पण याहीपेक्षां महत्त्वाची गोष्ट म्हणजे ती या दिव्य स्थितींत आपली आठवण काढते कीं नाहीं? 'ती मरतांना तिच्या ओठावर तुमचें नांव होतें' असें त्या तारेंत नव्हतें का? अंतर्ज्ञानी गुरुमहाराजांना याचा सुगावा लागणें शक्य आहे असें त्याला वाटे. पण या बाबतींत त्याची पूर्ण निराशा झाली. चुकूनसुद्धां कधीं मेरी बोडहाऊस हा शब्द महाराजांच्या तोंडून झोपेंत, स्वप्नांत निघाला नाहीं आणि जे शब्द निघत ते चंदूला समजत नसत. उदाहरणार्थ, फत्तरगड, सरकारी खजिना, रामप्रसाद मारवाड्याची पेढी, मथुरा नायकीण, संस्थानी पोलीस, तुरुंग, वॉरंट इत्यादि शब्द निघत. पण चंदू म्हणे, 'ठीकच आहे. महाराजांच्या अंतर्ज्ञानाचा मी हा एकच विषय कसा असेल? जागेपणीं देहाला दोनच डोळे! समाधींत आत्म्याला डोळे अनंत! उलट त्या डोळ्यांनीं घेतलेलें ज्ञान तोंडावाटे बाहेर पडायचें तर बिचारी जिव्हा मात्र एक! गुरुमहाराज झाले म्हणून काय झालें?'

मृत मेरीच्या आत्म्याची खुषखबर गुरुमहाराजांकडून मिळण्याची चंदूची निराशा झाली. पण निदान तिच्या अंतकाळचें सविस्तर वर्णन कळल्यानें थोडें तरी समाधान लाभेल या आशेनें त्यानें इतर प्रयत्न चालविले. त्याची फलश्रुति पुढें कळून येईलच.

गुरुमहाराजासमोर चंदू हात जोडून बसे तेव्हा त्याचे विचार काय असतील? आम्हांला सर्व जन्मांत असला अनुभव नसल्यानें फक्त याविषयीं कल्पनाच करितां येईल.

आमची पहिली कल्पना अशी. सनातनी हिंदु पद्धतीच्या लग्नात अंतरपाट ओढून घेतल्यावर, पुढचे विधी सुरू होण्यापूर्वीं, नवरानवरी एकमेकांसमोर पाटांवर रिकामीं बसनात. तेव्हां नवरीच्या मनांत नवऱ्याविषयीं ज्या प्रकारचे विचार येत असतील, त्या प्रकारचे विचार नव्या केलेल्या गुरुविषयीं भक्ताच्या किंवा शिष्याच्या मनांत येत असावे. गुरुमहाराज हे सर्वगुणसंपन्न, सर्वशक्तिमान; सर्व प्रकारच्या निग्रहानुग्रहाचा त्यांना अधिकार. उलट आपण गुणहीन, शक्तिहीन. फक्त अनुग्रहाकांक्षी. यापुढें तेच आपल्या

जीविताला वळण लावणार, मार्ग दाखविणार. या सर्वांचा निष्कर्ष हाच कीं, त्यांनीं सांगावें, आपण ऐकावें ! त्यांनीं वाट दाखवावी, आपण त्या वाटेनें जावें. कां, कसें हें विचारण्याचा आपला अधिकार नाहीं ! आपण प्रथमच तो गमावून बसलों. बुद्धि चालली तरी चालवूं नये. डोळे असले तरी पाहूं नये, कान असले तरी ऐकूं नये. लगामाच्या इशाऱ्यावर डोळ्यांना झापडी घातलेला घोडा चालतो किंवा धावतो, तसें आपण चालायचें आहे, धावायचें आहे !

पण लग्नाची बायको देखील पुढें चौकस होते ना ! आपली बुद्धी चालवूं लागते ना ! घोडाहि उधळतो ना !

केवळ आंधळी भावना किती दिवस टिकेल ? पाण्यांत दाबून बुडविलेलें लाकूड कांहीं वेळानें वर येणारच ! प्रेमाप्रमाणें गुरुभक्तीचाहि भर कालांतरानें अगदींच न ओसरला तरी कमी होत जातोच. लष्करी सेनापती किंवा राजकीय पुढारी यांच्यासारखेंच गुरूचेंहि असतें. त्यांनीं एकदां केलेले पराक्रम कांहीं काळ आपली पकड धरून ठेवूं शकतात. पण ती पकड टिकावयाची तर त्यांनीं मधून मधून नवे पराक्रमहि केले पाहिजेत. असा कोणताहि गुण जगांत नाहीं कीं, त्याचा विसर लोकांना कालांतरानें पडत नाहीं. लोखंडासारखीं हीन द्रव्यें नवीं भट्टींतून निघालीं म्हणजे सतेज दिसतात; पण त्यांना गंजण्याला वेळ लागत नाहीं. सोनें-रुपें हीं उंची द्रव्यें गंजत नाहींत; पण कालांतरानें मलीन तरी होतातच. संपत्तीचें भांडवल व्याजीं न लागलें, त्याजकडून नवीन उत्पादन होऊं न लागलें, तर तें हळूहळू खर्चून संपून जायचेंच. एक वेळ श्रद्धा उत्पन्न करणाऱ्या गुरूच्याहि प्रभावाचें असेंच होतें. पहिली श्रद्धा ज्या दैवी किंवा निदान लोकोत्तर गुणानें शिष्यावर बसली त्याचा प्रत्यय निरनिराळ्या प्रसंगांनीं पुनः पुनः शिष्याला यावा लागतो. नाहीं तर—! !

चंदूच्या गुरुमहाराजांच्या ठिकाणीं असे काय दैवी गुण होते कीं ज्यांचा प्रभाव त्याचा मनावर अखंड टिकावा ? मेंदूवर आघात झाल्यामुळें मनुष्य एकदम सुंद होतो. पण कांहीं वेळानें आपोआप किंवा निदान कांहीं उप-

चारांनीं तो शुद्धीवर येतोच. मेरीच्या मृत्यूच्या बातमीचा आघात चंदूच्या मेंदूवर झाला आणि गुरुमहाराजांना अंतर्ज्ञानानें त्या मृत्यूचें भविष्य कळलें असावें, म्हणून त्याच्याविषयीं त्याला अद्‌भुतपणा वाटला. पण ती भावना टिकावयाला त्या अत्‌भुत शक्तीचा प्रयोग-उपयोग वरचेवर व्हावयाला नको काय ? त्यानंतर त्या भविष्यासारखें आणखी एखादें भविष्य ( मात्र चंदूच्या जिव्हाळ्याचें ) गुरुमहाराजांनीं वर्तविलें असतें तर भविष्य सांगण्याची त्यांची शक्ति हुकमी आहे, जातिवंत आहे,असें चंदूला दिसून आलें असतें. आतां दोनच उदाहरणांनीं कोणताहि सिद्धांत सिद्ध होत नाहीं हें खरें. पण एकापेक्षां दोन उदाहरणांचा प्रत्यय अधिक विश्वास उत्पन्न करू शकतो. महाराजांनीं वर्तविलेलें नवें भविष्य दुःखात्मक नसून सुखात्मक असलें तरी चाललें असतें. पण नवें भविष्य हवें. असें न झालें तर, जें एक भविष्य म्हणून पूर्वीं सांगितलें तो योगायोग नसेल कशावरून ? कावळा बसायला आणि टापी मोडायला गांठ पडली नसेल कशावरून ? अशी शंका येण्याचा संभव !

पण गुरुमहाराज नंदभुवनांत येऊन राहिल्यापासून त्यांनीं आणखी एखादे भविष्य वर्तविण्याचा योग आला नाहीं. चंदूच्या श्रद्धेला खतपाणी पडावें तें पडलें नाहीं.

बरें. मेरीच्या मृत्यूचें भविष्य गुरुमहाराजांना अंतर्ज्ञानानें कळलें असेल. पण तो मृत्यु घडवून आणण्याची कर्तृत्वशक्ति ही कांहीं गुरुमहाराजांची नव्हे. त्यांच्या इच्छाशक्तीचा त्यात कांहीं संबंध येत नव्हता. तो मृत्यु ईश्वरानें घडवून आणला. तो ईश्वर हाच चंदूच्या हत्येच्या अपराधाचा न्याय करणारा व शिक्षा देणारा समर्थ न्यायाधीश होता. गुरु महाराजांनीं केलें तें इतकेंच कीं जें लौकिकांत पुष्कळ वेळां आढळतें, म्हणजे असें. एखाद्या न्यायसभेंत यथाविधि प्रकट होण्यापूर्वीं न्यायाधीशाचा लेखी निकाल अगाऊ पहावयास मिळणाऱ्या शिरस्तेदारानें, लांच खाऊन किंवा स्नेहाखातर, त्या निकालाची वर्दी कोणाला खाजगी रीतीनें कळवावी

त्याप्रमाणें मेरीच्या मृत्युची बातमी चंदूला फक्त ' न्यूज बिफोर धी मेल ' म्हणून गुरुमहाराजांनीं दिली.

बरें, अपराधाच्या शिक्षेच्या दृष्टीनें पाहतां चंदू असे अपराध वरचेवर थोडेच करणार होता ? त्यानें अहिंसेचें व्रतच घेतलें होतें.

मग त्याच्या हातून हिंसेचा अपराध पुनः घडणें शक्य नव्हतें आणि तें नाहीं म्हणून शिक्षा नाहीं आणि शिक्षा नाहीं म्हणून अगाऊ भविष्य करून कळविण्यासारखेंहि कांहीं नाहीं. मेरीचा मृत्यू ही एकदांच घडणारी गोष्ट. तशी पुनः तिच्या संबंधांत घडण्याचा संभव नाहीं. त्याच्या खालोखाल महत्त्वाची गोष्ट आय्. सी. एस्. परीक्षा पास होण्याची. ती तर पास झाली. ईश्वरानें त्याला नापास केलें नाहीं. चंदूनें मनानें त्या हानींतून हा लाभ वजा घालून हिशेब केला असतां तर तो चूक कोण म्हणता ? लाभहानीच्या इतर बाबी असल्या तरी चंदूच्या दृष्टीनें त्या इतक्या महत्त्वाच्या नव्हत्या. तात्पर्य, गुरुमहाराजांच्या अंगच्या अद्‌भुत शक्तीचा प्रत्यय पुनःपुनः येण्याचें थांबलें. यामुळें चंदूच्या मनावर पडलेले श्रद्धेचे पेच एकेक दोरीदोरीनें सुटत किंवा सैल होत चालले.

पण याला आणखी इतर कारणेंहि होतीं.

दिव्य ज्ञान एक राहिलें; पण लौकिक, ऐहिक, बौद्धिक ज्ञान तरी महाराजांकडून मिळेल अशी चंदूला आशा होती. पण तीहि निष्फळ झाली. चंदू हा ऑक्सफर्डचा एम्. ए., क्लासिक्स व फिलॉसफी हे विषय पढलेला. त्यांतला एखादा विषय काढून महाराज त्यावर कांहीं बोलतात काय याचा ठाव चंदूनें पाहिला. पण ' अंतर्ज्ञानी अध्यात्मज्ञानी मनुष्यानें असल्या पढीक ज्ञानाला स्पर्श करणें म्हणजे, माणसानं देव-घरांतून उठून गोठ्यांत जाऊन गुरांच्या संगतींत राहणें असें होतें. ' असें महाराजांनीं चंदूला एकदांच सांगून टाकलें. यामुळें विचारविनिमयाचा तो त्याचा मार्ग बंद झाला. महाराज अगदींच गप्पागोष्टी करीत नसत असें नाहीं. पण त्यांत सर्व संसारी विषय.

वैराग्याला स्वतःचा संसार नसतोच. पण तो प्रायः विश्वकुटुंबी असल्या-

मुळें अवातर जगाजी काळजी तो स्वतःच्या संसारासारखी करीत असतो आणि बहुतेक शिष्यांना तर, गुरुजीनें अध्यात्मज्ञान दिल्यापेक्षां आपल्या संसारांतील अडचणी दूर केल्या तर तेंच अधिक इष्ट वाटतें. आर्त व अर्थार्थी असे शिष्यच अधिक खरे. मुमुक्ष कमी. यामुळें पुष्कळशा गुरूंचा नित्य नैमित्तिक व्याप पाहिला तर त्यांत ते शिष्यांच्या खासगी भानगडी निस्तरण्यांत गुंतलेले आढळतील. कोणाचीं बायकामुलें रोगग्रस्त आहेत, कोणाच्या उपवर मुलींचीं लग्नें होत नाहींत, कोणाच्या बायका घरीं नीट नांदत नाहींत, कोणाच्या बायका वांझोट्या असतात, कोणाच्या मुलांच्या परीक्षा उतरावयाच्या असतात, कोणीं कर्जाच्या चिखलांत रुतलेले किंवा त्याच्या पाण्यांत गटंगळया खाणारे असतात, कोणाला शत्रूंचा निःपात करायचा असतो. तात्पर्य, हीं सर्व दुःखें सांगायला ईश्वर कुठें मिळणार ! म्हणून त्याचा दुय्यम प्रतिनिधि जो गुरु त्याच्यापुढें मांडून शिष्यमंडळी त्या दुःखाचा परिहार गुरुमाउलीनें करावा अशी अपेक्षा करीत असतात.

चंदूनें प्रथम मन मोकळें करून आपलें खरें खरें दुःख गुरुमहाराजांना निवेदन केलें नाहीं आणि त्यांनींहि त्याची चौकशी केली नाहीं. उभयपक्षीं देखावा असा होता कीं चंदूनें शिकारींत पक्ष्याची हिंसा केली, महाराजांनीं तिचा निषेध केला, चंदूला तो पटून उपरति झाली. म्हणून त्यानें अहिंसेची शपथ घेतली, आणि महाराज हे गुरु करण्याला योग्य आहेत असें वाटल्यावरून चंदूनें त्यांना आपल्या घरीं आणून ठेवलें. पण या सर्व घटनेंतला मुख्य सांधा वेगळाच होता. तो हा कीं पक्ष्याच्या हिंसेबद्दल ईश्वर तुला शासन करील असा शाप महाराजांच्या तोंडून निघाला, आणि ज्या वेळीं इकडे हिंसेचा अपराध घडला त्याच क्षणीं पांच हजार मैलावर चंदूची प्रियकरीण व भावी वधू मृत्युमुखीं पडली ! चंदूच्या उपरतीचें खरे कारण हें होतें. तें न घडतें तर त्यानें बैराग्याचा शाप खिशांत घातला असता आणि ईश्वर आपलें कांहीं करूं शकला नाहीं असा तोरा व विजय मिरवून तो फिरून शिकारीला प्रवृत्त झाला असता !

शिकारीनंतरच चंदु पास झाल्याची तार आली. चंदुला शिक्षा करण्या-

ऐवजीं त्याला हें ईश्वरानें बक्षिसच दिलें नव्हे काय ? पण परीक्षा पास होण्याचा हा आनंद खाऊन उरेल एवढें मोठें दु:ख आपली वाट चालत होतें आणि त्याची तार रविवारच्या मेजवानीच्या वेळीं आलीच. ईश्वर नक्की कोणती शिक्षा करणार हें महाराजांना माहीत नसेल व तें अजूनहि माहीत नव्हतें. पण कांहींतरी शिक्षा देण्याचा त्याचा आदेश होता, व तो अंतर्ज्ञानी नसता तर तसा आदेश त्याच्या तोंडून कसा निघता ?

तात्पर्य, या पुरुषाच्या अंगीं कांहीं असामान्य अध्यात्मिक शक्ती आहे अशी चंदूची खात्री झाली. पण या शक्तीचा उपयोग चंदूला काय होणार होता ? होय, ती शक्ती त्याला असली तरी मेलेली मेरी बोर्डहाऊस तो फिरून जिवंत कसा करील ? अंतर्ज्ञानी माणसाच्याहि दिव्य शक्तीला कांहीं मर्यादा असेलच कीं नाहीं ?

चंदु श्रद्धाळू झाला असला तरी कोणत्याहि शक्तीमुळें मृताचें पुनरुज्जीवन होऊं शकेल असें त्याला वाटत असेल काय ? इतका खोल तो श्रद्धेच्या गर्तेत कसा जाईल ? तो एम्. ए., बॅरिस्टर, आय्. सी. एस्. ना ? पण आम्हांला वाटतें, गुरुप्रसादानें मृत मेरीच्या पुनरुत्थानाच्या आशेपर्यंतहि चंदूची मजल गेली असावी. म्हणून चंदूनें ही गोष्ट एकदा गुरुमहाराजांजवळ काढली. महाराजांचा शाप प्रत्यक्ष सफल कसा झाला हें त्यानें महाराजाना खुलासेवार सांगितलें. तें ऐकून त्याना मनांतून परमावधीचें आश्चर्य वाटलें. कावळा बसायला आणि ढापी मोडायला एकच गांठ पडतांना त्यांनीं केव्हां पाहिलें असेल. पण आपण कांहीं तरी झोकांत बोलून गेलों, तें असें खरें झालेलें पाहून त्यांना मनांतून ईश्वरापासून स्वत:पर्यंत सर्वांचें हंसू आलें !

पण गुरुमहाराजांविषयीं चंदूच्या मनांत येवढी भक्ति असली तरी शिष्यवराविषयीं त्याला पहिल्या दिवसापासून तिटकारा, तिरस्कार वाटे. आपला गुरु या मोठ्या घरीं पचनीं पडलेला पाहून जंबूला आपलेंहि स्तोम माजवावेंसें वाटूं लागलें व तो चंदूला कस्पटासमान मानूं लागला. तो चंदूच्या गुरुसेवेंतील खऱ्या-खोट्या चुका दाखवून त्याचा निषेध करी आणि हा चंदू शिष्यत्वाला असा नालायक असतांहि केवळ मनाच्या उदारपणामुळें

गुरुजी त्याजकडून सेवा घेतात असें भासवी. चंद्रनें सेवेचें बरेंचसें काम आपणाकडे घेतलेलें पाहून जंबूनें हळुहळू इतर गोष्टींत लक्ष घालण्यास प्रारंभ केला. तो वाड्यांत वाटेल त्या भागांत जाऊं फिरूं लागला. गड्यामाणसांवर डाफरूं लागला. सर गंगाराम यांना मोजीनासा झाला. पण यापलीकडे जाऊन त्यानें मजल मारली ती बिंबाच्या बाबतींत.

शिष्यवर हा तिशींतला तरुण होता. त्याला नैसर्गिक सौंदर्याची देणगी भरपूर होतीच. पण त्यानें चेहऱ्यावर दाढी मिशा वाढूं दिल्या असल्या तरी त्या काळ्या कुळकुळीत, सतेज होत्या. केशकलापांची तो अशी कांहीं परिश्रमपूर्वक निगा घेई कीं त्यांनीं तें सौंदर्य झाकलें जाण्याऐवजीं त्यांत उलट भरच पडे. त्यानें आपल्या पिशवींत एक चंदनी कंगवा व आरसा दडवून ठेवलेला असून, दिवसांतून एक दोन वेळ बाजूला जाऊन कोणाला न दिसेल अशा रीतीनें तो आपल्या दाढी मिशा साफ विंचरी आणि दोहोंना मोठें झोकदार वळण देई. कोवळ्या वयांतल्या त्या दाढी मिशा म्हणजे ते राठ केस नव्हत, तर मऊ मऊ लवच असते आणि यामुळें त्यांना द्यावा तो आकार सहज येतो. त्याचा आवाज गोड होताच; पण मिठास बोलण्याचीही लकब त्याला साधलेली होती. या सर्वांत लाघवी स्वभावाची भर पडल्यानें त्याच्या परिचयांत येणाऱ्या प्रत्येक मनुष्यावर त्याची छाप पडे. तो न बोलला तर त्याला बोलवावें असें वाटे, आणि तो कितीहि बोलला तरी त्या बोलण्याचा कंटाळा येत नसे. गुरुजींची दिवसांतून ठराविक सेवाचाकरी केली म्हणजे बाकी सर्व वेळ त्याला मोकळीक असे. स्वत: गुरुजींच्या सामानांत एकहि पोथी-पुस्तक नाहीं, तर शिष्याच्या कोठून येणार ? खाणें, पिणें, भटकणें, उनाडणें याशिवाय त्याला दुसरा उद्योग नसे. गुरूच्या कृपेमुळें त्याचें प्रस्थ बरेंच वाढलें होतें. कारण कोणीहि भेटला कीं, गुरुजी त्याजवळ आपल्या शिष्याची स्तुति भरपूर केल्याशिवाय सोडीत नसत.



गुरुमहाराज आपण होऊन एखाद्या विषयाची चर्चा काढतील अशी वाट चंदू पहात असे. पण तिकडच्या बाजूनं त्याची निराशा झाली. एक लहानशा मळकट पोथीशिवाय त्यांच्याजवळ धार्मिक वाङ्मय असें कांहींच नसे. एक दिवस चंदूनें हिय्या करून ती उघडून पाहिली तों त्यांत प्रातः-स्मरणाच्या हरिपाठासारखे कांहीं श्लोक, कांहीं पदें, कांहीं दोहरे लिहून ठेवलेले दिसले. नंतर एक दिवस चंदु महाराजांना म्हणाला, " अतिप्रसंग होत नसेल तर मी विचारीन म्हणतों."

" विचार बेलाशक."

" आपणाला जसं अंतर्ज्ञान आहे तसं मला लाभावं अशी माझी इच्छा आहे. तेव्हां त्याला मला कांहीं साधन सांगाल काय ? मी कोणते धार्मिक ग्रंथ वाचूं ? कोणता कर्ममार्ग, योगमार्ग आचरूं ? कोणतें अनुष्ठान करूं ? म्हणजे मला अंतर्ज्ञानाची शक्ति येईल ? "

आतां तर शिष्यानें गुरूची परीक्षाच घेण्याची वेळ आणली ! आपलं अज्ञान झांकण्याकरितां शहाणे धूर्त गुरु मौनाचा आश्रय करितात. म्हटलेंच आहे ना ' मौनं सर्वार्थसाधकं ! ' त्या मौनाचा आश्रय करूनच गुरुमहाराज या मठात राहिले होते. आपला शिष्य मूर्खपणानें आपल्या नादीं लागला असला तरी तो बुद्धीनें तरतरीत आहे हें त्या शिष्याच्या चेहऱ्याडोळ्यां-वरूनच त्यांना सहज दिसण्यासारखें होतें. म्हणून ते त्याच्याशीं बोलण्यांत अवांतर गोष्टी फारशा काढीत नसत. पण गुरूनें मुखर व्हावें, त्याच्या प्रत्यक्ष तोंडचे शब्द जितके ऐकायला मिळतील तितके मिळावे, अशी दुर्निवार इच्छा शिष्याला झाली. तेव्हां प्रश्नाचें उत्तर लांबट न दिलें तरी निदान सूत्ररूपानें द्यायला हवें हें प्राप्त झालें. शिष्याचा वरील प्रश्न इतका व्यापक होता कीं, त्यानें गुरुमहाराज गांगरून गेले. पण त्यांना गुरुभजनाचें एक पद पाठ येत होतें. तें त्यांनीं जंबूलाहि शिकवून ठेवलें होतें. म्हणून चंदूला

उत्तर देण्याकरितां त्यांनीं जंबूला तें पद म्हणायची आज्ञा केली. जंबूनें पद म्हटलें तें असें होतें—

'गुरुविण कोण दाखवी वाट !' इत्यादि.

या उत्तरानें चंदुचें समाधान झालें नाहीं. त्या वेळीं तो गप्प राहिला. पण तो मधून मधून एखादा प्रश्न मुद्देसूद करून विचारी व त्याला जें उत्तर मिळे त्यानें गुरुमहाराज त्यापुरते तरी चंदुच्या मनांतून उतरत. एकदां चंदूनें दैव श्रेष्ठ कीं उद्योग श्रेष्ठ असा प्रश्न केला. त्याला 'शनि-माहात्म्य वाच' असें उत्तर मिळालें. 'ईश्वराची कृपा व अवकृपा कशी ओळखावी ?' असा प्रश्न केला. त्याला तें 'सत्यनारायणा'च्या पोथींत आहे असें उत्तर मिळालें. 'योग' म्हणजे काय ? या प्रश्नाला 'भोग' हें सयमक उत्तर मिळालें ! संस्कृताचें साधें वाक्य उच्चारलें तरी तें महाराजांना कळत नाहीं असें चंदूला दिसून आलें आणि स्वतः त्यानें तर एम्. ए. च्या परीक्षेला संस्कृत हा एक विषय घेतला होता ! गुरुमहाराज हे सांप्रदायिक गोसावी असें समजून त्यानें नाथपंथी सांप्रदायाची माहिती विचारली. पण आदिनाथ, गोरखनाथ, जालंदरनाथ, मछिंद्रनाथ इत्यादींचीं नांवें व त्यांचे संबंध हेहि गुरुमहाराजांना बरोबर माहीत नाहींत असें चंदूला आढळून आलें.

चंदूची गुरुशीं संभाषण करण्याची भूक न शमल्यानें त्यानें लौकिक प्रश्न काढले. तेव्हा त्यासंबंधीं मात्र थोडें थोडें ज्ञान त्यांनीं प्रकट केलें. गोष्टीवरून गोष्टी निघाल्या तेव्हां त्यांनीं अनेक संस्थानांची माहिती सांगितली. खजिने, हिशोबी व्यवहार हा मुद्दा निघाला. तेव्हां तर त्यांनीं अगदीं भरांत येऊन अर्धा तास माहिती सांगितली. मग एकदां मोटारीच्या गोष्टी निघाल्या तेव्हां जंबूला चांगली संधि मिळाली आणि त्यानें मोटारीवर व्याख्यानच दिलें. नंदभुवनांतल्या प्रत्येक मोटारीची छाननी त्यानें केलेली होती आणि कोणत्या गाडीचे ब्रेक ढिले आहेत, कोणती मोटार तेल विनाकारण अधिक खाते, 'सेकंड हँड मोटार बार्गेन'च्या खुब्या काय असतात, दस्तुरी चुकवावयाची झाली तर कोणत्या युक्त्या यशस्वी होतात, आणि मोटार हाक-

णाराशेजारीं पुरुष बसला किंवा स्त्री बसली, तर यामुळें गाडीच्या हाक-ण्यांत फायदे व तोटे काय होतात इत्यादि गोष्टी त्यानें परोपरीनें; चंदु-लालची इच्छा नसतांहि, त्याला बळेंच समजावून सांगितल्या. याविषयीं चंदु एकदां गुरुमहाराजांना म्हणाला, "महाराज, जंबूला मोटारीचें इतकें अंतर्बाह्य ज्ञान कसें आलें?" गुरुमहाराज म्हणाले, "बेट्याची बुद्धि तशी चलाखच आहे. तो जें पाहील तें उचलील!" उचलील या शब्दाचा अर्थ किती व्यापक करावा याची चंदूला पंचाईत पडली.

मठामध्यें सर्व प्रकारची शांतता राहण्याची व्यवस्था चंदूनें मोठ्या कसो-शीनें केली होती. गुरुमहाराज हलक्या आवाजानें बोलत त्या अर्थीं जंबूहि त्यांचेंच अनुकरण करी. चंदूहि हलक्या आवाजानें बोलावयास शिकला होता. मात्र मौज अशी दिसून येई कीं, मठाबाहेर हें हळू बोलण्याचें बंधन नसल्यानें, जंबु व चंदु दोघेहि आपला स्वाभाविक आवाज लावून बोलत तेव्हां ती जागा दणाणून जाई. पण मठांत पाऊल टाकल्याबरोबर हलक्या आवाजानें शब्द उच्चारण्याची जणु कांहीं स्पर्धा लागे. ती इतकी कीं एखाद्या तिऱ्हाइताला वाटलें असतें कीं जणु काय ही एक बहिऱ्यामुक्यांची शाळा आहे! मठांत मोठ्यानें शब्दोच्चार करण्याची मोकळीक फक्त पिंज-ऱ्यांत टांगून ठेवलेल्या त्या कपोताला असे. मोठ्या आवाजानें बोलल्यामुळें हवेवर आघात होतात, आणि या आघातांनीं हवेंत वावरणाऱ्या सूक्ष्म जीवांची हिंसा होते असें गुरुमहाराज एकदां म्हणाले. ती सूचना चंदूला योग्य वाटून त्यानें ती स्वतःच्या उदाहरणानें अंमलांत आणली. कपोत मात्र जेव्हां मोठा आवाज काढून घुमे तेव्हां चंदु म्हणे, 'आहे बाबा तुला मोकळीक मोठ्यानें बोलण्याची. माणसाचे नियम पक्ष्यांना लावतां येत नाहींत ना!' पण या कपोताची मादी (चंदूच्या शिकारींत मेली ती) जिवंत असती, आणि ते दोघे पक्षी पिंजऱ्याबाहेर मोकळे असते, तर या कपोतानें जेवढा मोठा आवाज काढला असता तेवढा तो विरही एकलकोंड्या स्थितींत काढू शकत नव्हता.

हळू आवाजानें बोलण्याचा खरा फायदा जंबु व बिंबा मठात एकत्र येत तेव्हां त्यांना मात्र मिळे. हळू आवाज काढण्याच्या नियमानें त्या दोघांचें

आयतेंच काम होई. कारण एरवीं जें हलक्या आवाजानें बोलणें संशयास्पद वाटलें असतें तें येथें रास्त व राजमान्य ठरून गेलें. हळू आवाजानें बोललेलें ऐकावयाला येण्याकरिता बोलणाराना सहजच एकमेकांच्या तोंडाजवळ तोंड किंवा निदान कानाजवळ तोंड न्यावें लागतें.

चंदू व गुरुमहाराज, किंवा जंबु व गुरुमहाराज, किंवा चंदु व जंबु यांचीं तोंडें जवळ आलीं तर ते कोणास चमत्कारिक वाटण्याचा संभवच नाहीं. संभव काय तो जंबू व बिंबा यांचीं तोंडें जवळजवळ आलीं तरच. पण हवेंतील सूक्ष्म प्राण्याची हिंसा होऊं देऊं नये हें मठांतलें एक ध्येय असल्यामुळें बिंबा व जंबु यांना तोंडाजवळ तोंड नेऊन बोलल्याशिवाय गत्यंतरच नव्हतें. बिंबा गुरुमहाराजाशीं फारसें बोलतच नसे. यामुळें त्यांच्या तोंडाशीं तोंड नेऊन बोलण्याचा प्रसंग तिला येत नसे. ती गुरुमहाराजांनाहि कांहीं सांगायचें सवरावयाचे असलें तरी तें जंबूला सांगूनच होतां होईतों करी.

कोणाहि साधुमहाराजांचा मठ म्हटला म्हणजे तेथें स्त्रियांची गर्दी हटकून व्हावयाची आणि नंदभुवनांतल्या या मठातहि ती झाली असती. पण ती न होण्याला मुख्य कारण एक घडलें तें हें कीं, नंदभुवनाची मालकीण हीच स्वतः या मठात कधींहि पाऊल घालीत नसे. अतिशिक्षित एम्. ए. बॅरिस्टर चंदू याने गुरुभजनीं लागावें, आणि अशिक्षित सनातनी मासाहेबांनीं गुरुभजनावर बहिष्कार घालावा, ही उलटापालट लोकांच्या लक्षांत आल्याशिवाय राहिली नाहीं. पण कांहीं झालें तरी या बहिष्काराचा स्वाभाविक परिणाम असा झाला कीं, शहरातील बायकांचें वळण या मठाकडे एरवीं हटकून पडायचें तें अजीबात बंद झाले. या बहिष्काराचें गुरुमहाराजांना मनांतून वाईट वाटे. कारण गुरुमहात्म्याच्या सोहळ्यातलें मुख्य भांडवल म्हणजे गुरुभोंवतीं होणारी भाविक भोळ्या बायकांचीं गर्दी. तें सर्व भांडवल या मासाहेबांच्या बहिष्कारानें बुडालें आणि पुरुष भजनीं लागले तरी त्यांच्या गुरुभक्तीच्या प्रेमळपणांत स्वारस्य बेताचेंच असतें.

' नंदभुवनांतील मठांत गावची पुरुषमंडळी दर्शनाला येत. कांहीं भजनालाहि राहत. पण याहि बाबतींत चदूनें एक गोष्ट आपल्या स्वभावानुसार

केली होती. ती ही कीं, गुरुमहाराजांचें गुरुत्व गाजावें याकरितां मतप्रचार केला नाहीं. या मतप्रचाराची नेहमींची रीत अशी असते कीं, कोणी परकीं माणसें आलीं म्हणजे त्याच वेळीं शिष्यांना गुरुस्तवनाचा पान्हा फुटतो व त्यांची गुरुसेवा पालवते, मुखर होते आणि हें पाहून पूर्वीं शिष्यवर्गांत सामील नसलेले लोक ती दीक्षा घेण्याला उत्सुक होतात. पण अशा मत-प्रचारपद्धतींत कोणाची तरी द्रव्याभिलाषबुद्धी अंतस्थ काम करीत असते. नंदभुवनांतील मठांत गुरुसंस्था निर्माण झाली तरी ती धनलोभानें झालेली नव्हती. यामुळें तिची प्रसिद्धी करण्याचेंहि कारण नव्हतें. किंबहुना ही गुरु-संस्था आपली स्वतःची खासगी राखीव रहावी अशीच चंदूची इच्छा होती. इतर बाबींप्रमाणें या बाबतींतहि तो 'ॲरिस्टोक्रॅटिक' होता, 'डेमोक्रॅटिक' नव्हता. त्यानें गुरुमहाराजापुरती तेवढी लीनता स्वीकारली होती. एरवीं बाकीच्या सर्व समाजाशीं वागतांना त्याची आढ्यता शिल्लकच राहिली होती.

मठांत नेहमीं वावरणारी स्त्री काय ती बिंबा. पण तिनें तेथें वावरावें ही गोष्ट चंदूला मनांतून नापसंत होती. त्याची आई जर गुरुभजनीं लागती तर चंदूला ती गोष्ट मात्र फार आवडली असती. कारण त्यानें अनुसरलेल्या या नूतन मार्गाला तो आशीर्वाद असें त्याला वाटलें असतें व आपली गुरुभक्ती त्याला मिरवितां आली असती आणि मग चंदू व मासाहेब दोघांना जे मानवलें तें सर गंगाराम यांना मानवणारच. पण अल्लड स्वभा-वाची चार वर्षांनीं धाकटी बहीण बिंबा ! तिच्या पसंतीनें, म्हणजे या एवढ्याशा पोरीनें त्याचें उदाहरण गिरविल्यानें, चंदूच्या या चमत्कारिक वर्तनाचें समर्थन कसें होणार ? मठांत तिचा व जंबूचा सहवास होतो, मठांतली शांतता न बिघडण्याच्या निमित्तानें तीं दोघें तोंडाजवळ तोंड नेऊन बोलतात, कुजबुजतात, हें त्याला आवडत नव्हतें. प्रसंगाप्रसंगानें तो ही नापसंती बिंबाला जाणवी देखील. पण ती तें लक्षांतच घेत नसे आणि एकदां त्यानें आपली नापसंती उघडपणें बोलून दाखवली तेव्हां तिचा व त्याचा खटकाच उडाला.

" बिंबा ! तुझं या मठांत काय ठेवलेलं असतं ग ? आई कधीं मठांत येत नाहीं हें तूं पाहतेसच. गांवच्या इतर बायकाहि येत नाहींत. "

" वा ! म्हणून काय झालं ? तूं जसा महाराजांना गुरु मानतोस तशी मी शिष्यवरांना जंबूना गुरु मानतें. "

" अग, मी व गुरुमहाराज दोघेहि पुरुष आहों. "

" मग स्त्रियांनीं पुरूष गुरु करूं नये वाटतं ? स्त्रिया भल्या ! त्या कधीं गुरुपद स्वीकारीत नाहींत. दीक्षा, गुरुमंत्र देत नाहींत. शिष्यिणी करीत नाहींत. स्त्रियांचं गुरुपीठ स्थापलेलं तूं कुठं पाहिलं आहेस काय, दादा ? नाहींच आढळायचं. तो आपलपोट्या पुरुषाचाच अधिकार, मक्ता ! बरं, असो. पण मग स्त्रियांना गुरुप्रसादाची इच्छा झाली तर त्यांनीं काय करावं ? स्त्रियांना मोक्ष नको वाटतं ? त्यांना आत्मा नसतो वाटतं ! आत्म्यावर तुझा विश्वास आहे हें आतां सिद्ध झालंच. पण ' ए काऊ हॅज नो सोल ' असं जें वाक्य मी इंग्रजी पाठबुकांत वाचलं, तसं ' ए वूमन हॅज नो सोल ' असं तुझं मत आहे कीं काय ? स्त्रियांना त्या स्त्रिया म्हणून दीक्षा देण्याचं कोणत्या पुरुष गुरुनं आजवर नाकारलं आहे ? आणि गुरु होण्याला पात्र अशी व्यक्ति पुरुष आहे म्हणून कोणत्या मुमुक्षू स्त्रीनं त्याला गुरु करायचं नाकारलं आहे ? आत्मा हा पुल्लिंगी; स्त्रीलिंगी नसतो. दादा, तीच गोष्ट गुरुशिष्यांना लागू. "

" अग, पण जंबू तरुण आहे अन् तूं तरुण आहेस. इतक्या तरुण स्त्री-पुरुषानीं गुरुशिष्यासारखा विश्वासाचा संबंध ठेऊं नये."

" मग काय, तरुण स्त्री-पुरुषांनीं प्रेमसंबंधच तेवढा ठेवावा वाटतं ? प्रेमसंबंधापेक्षां धार्मिक बुद्धीचा गुरुशिष्यसंबंध अधिक चांगला नाहीं काय?"

" पण तुला इतक्यांत ही गुरुदीक्षा घेण्याची उठाठेव कुणी सांगितली ?"

" दादा, तूं रागावणार नाहींस ना ? या प्रश्नाचं सरळ उत्तर तुलाच उलट एक प्रश्न विचारून मीं दिलं तर ? मी या नादांत पडायला तरुण म्हणून योग्य नाहीं आणि तूं मात्र योग्य, नव्हे का ? तुझ्या माझ्यामध्यें फार तर चारच वर्षांचं अंतर आहे. दादा, तूं तरी तरुणच नव्हे का ? माझं

लग्न व संसार व्हायचा आहे. कबूल; पण तुझा तरी तो कुठं झाला आहे ? तूं बाबांना, आईला आणि त्या बिचाऱ्या शरयूला किती दुःखसमुद्रांत लोटलं आहेस हें आहे का माहीत तुला ? आणि तूं जर या गोसाव्याच्या जोडीला घरींच आणून मठ बनविला नसतास तर मी कुठं जात होतें बाहेर गुरु हुडकायला ? आयता गुरु घरीं चालून आला. तूं जसा पुण्यमार्ग अनुसरतोस, तसा मीहि त्यांतच थोडा अनुसरला तर काय बिघडलं ? ”

चन्दु निरुत्तर झाला. चन्दु व बिंबा दोघेहि आपल्या खऱ्या मनांतलं बोलत नव्हती. चन्दूच्या मनांत जें खरें बोलायचं होतं बिम्बाला, तें त्याला बोलतां येईना आणि जें वरकरणीं बोलण्यासारखं म्हणून तो बोलायला गेला तें असें अंगाशीं आलें. जंबु व बिंबा तरुण म्हणून एकत्र आल्यानं त्यांचं पाऊल वाकडें पडेल आणि आपल्या कुटुंबाची बेअब्रू होईल, हें भय खरोखर चन्दूच्या मनांत होतें. पण असें बोलल्यानें बिंबाच्या चारित्र्यावर अविश्वास दाखविल्यासारखें झालें नसतें काय ? उलट बिम्बाहि हें जाणून होती कीं, चन्दूचा खरा कटाक्ष आपल्या गुरुकरणावर नसून आपल्या चारित्र्यावर होता. पण ती झालें तरी तो आक्षेप आपणावर ओढून घेऊन त्यावर उत्तर देण्याच्या भानगडींत कशाला पडेल ? म्हणून तिनेंहि त्याला फसवून उत्तर दिलें. गुरुकरणासारख्या सकृत्दर्शनीं निरपवाद दिसणाऱ्या निमित्ताचा आश्रय तिनें केला. तिला हें माहीत होतें कीं. गुरुशिष्यसंबंध हें एक असें प्रशस्त आवरण आहे कीं, त्याच्या आच्छादनाखालीं स्त्री–पुरुषांनीं कांहीं केलें तरी त्याची संपादणी सहज होऊन जाते. बरें, प्रसंग पडता तर बिंबा अगदीं सरळ जाब द्यायलाहि तयार होऊन म्हणती कीं, ‘ होय, मी या तरुण गोसाव्याला मनानें वरलें आहे व त्याच्याशीं मी लग्न करणार. ’ तर चंदू त्याला तरी काय म्हणूं शकता ? शरयूशीं झालेल्या खासगी विश्वासाच्या भेटींत, चंदूनें विलायतेंत एखादा प्रेमप्रसंबंध जोडला असावा असा संशय दोघींनींहि एकमेकीजवळ व्यक्त केला होता आणि आईबापांना अमान्य असलेल्या इंग्रज कुमारिकेशीं विवाह करण्याला जर चंदूचें मन त्याला ग्वाही देतें, तर बिंबानें या तरुण

गोसाव्याशीं लग्न केलें तर चंदूला त्या गोष्टीला कशीं नांवें ठेवतां येतील ? वर गोसावी आहे ही गोष्ट कांहीं लग्नाला विरोधी नाहीं. कारण अकालीं वैराग्य आलेला एक ब्रह्मचारी विवाहानें संसारांत पडणार आणि तो गोसावी तरुण आहे ही गोष्ट तर लग्नाला इष्टच. शिवाय हिंदू जंबूशीं लग्न करणें हें कांहीं विलायती मुलीशीं मिश्रविवाह करण्याइतकं दूषणास्पद खचित नाहीं. जंबू घरचा गरीब असेल. पण विलायतेंत हिंदी तरुणांच्या गळां पडून, त्यांना मोहून लग्नाला तयार करणाऱ्या मुली झाल्या तरी त्या अशा काय सरदारांच्या, अमीरउमरावांच्या, लखपतींच्या मुली असतात ? त्या झाल्या तरी कोणी खाणावळवाल्याच्या पोरी, दुकानांत मालाची विक्री करणाऱ्या पगारी नोकरिणी, थर्डक्लास सिनेमा नटी, अशाच भुक्कड बुभुक्षित असायच्या ! तरुणपणचें सौंदर्य हेंच त्यांचें मुख्य भांडवल असतें आणि भांडवलशाही विलायतेच्या स्वातंत्र्याच्या वातावरणांत तें सौंदर्याचें भांडवल आपला प्रभाव हिंदी तरुणावर गाजवितें इतकेंच. तात्पर्य, बिंबाला गुरुदीक्षा घ्यायची झाली, किंवा स्वेच्छेनें स्वयंवर करायचं झालं, तरी चंदूला हरकत घेण्याला नात्याचा, वयाचा अधिकार किंबा युक्तिवादाचा आधार नव्हता, ही गोष्ट पक्की माहीत असल्यामुळें बिंबा त्याला वाटेल तसें बेमुर्वतखोरपणें उत्तर द्यायला तयार झाली होती.

बिंबा मठांत फार खेपा घालते अशी तक्रार चंदूनें मासाहेबांकडे केली. तेव्हां त्या म्हणाल्या, " ही तक्रार माझ्याकडे आणून काय उपयोग ? तूं मठ स्थापलास, स्वतःला गुरु केलास, व त्याच्या भजनीं लागलास. मग तिला तिकडं फिरकू नको असं कुणी म्हणावं ? तुझे गुरु आणि गुरुबंधू यांना आम्ही कोणी वाईट कसं म्हणावं ? त्यांना तशीं नांवं ठेवलीं तर तूंच उलट आमच्यावर रागवायचास एखादा. म्हणून तुझा बंदोबस्त तूंच कर. आम्ही पडलों आईबाप. आम्हाला लज्जा नाहीं,शहाणपण नाहीं, असं समजून तुमच्याशीं वागलं पाहिजे आम्हांला. तुम्ही कसेहि वागलांत तरी तुम्हाला तें शोभतं. कारण तुम्ही मुलं ! तुमचं कांहीं चुकल्यासवरल्यानें तुम्हांला

दुःख झालं तरी तें आम्हांला. उलट स्वतः आम्हांला दुःख झालं तर त्याची पर्वा तुम्ही कां करावी ? "

बिंबा जंबूशीं वाजवीपेक्षां अधिक लगट करते ही गोष्ट चंदूच्या मनाला एकसारखी बोचत होती. म्हणून आपली मोटार जंबू आपल्या परवानगी-शिवाय बाहेर नेतो याचें निमित्त करून तो जंबूला म्हणाला—

" जंबू, तूं माझी मोटार गाडी मला विचारल्याशिवाय बाहेर नेणं हें बरं नव्हे. "

" तें मला कळतं. पण मी स्वतः कधींच मोटार बाहेर काढीत नाहीं व नेत नाहीं. बाहेर काढलेल्या गाडींत बिंबा आधीं स्वतः बसते आणि मग आंत बसायला मला बोलावते. आंत बसल्यावर ती गाडी चालविते किंवा मला चालविण्याची विनंति करते आणि मग मी ती चालवितों. यांत मीं तुझा काय अपराध केला ? "

चंदूनें जंबूला अरे-तुरे केलें, त्याला उलट जंबूनेंहि अरेतुरेचीच भाषा वापरली. आधींच तो तरुण, उन्मत्त! गोसाव्याच्या नुसत्या वेषानेंच मनुष्याला नसती गुरमी येते. तशी ती जंबूला आलेली होती. जुन्या नाटकांत रावणाचें किंवा नारसिंहाचें सोंग घेणाराला आरसा पहाण्याची मनाई असे; कारण तो भयंकर वेष पाहून त्याला खरी गुर्मी अंगांत येई. निस्पृहपणाचें एक प्रकारचें धाडसच असतें. पण तें करण्याला जो तयार होतो त्याचें दोनहि बाजूनें साधतें. ' न मागे तयाची रमा होय दासी ' या वचनांत म्हटल्या-प्रमाणें, न मागणाराला देणें, पण तुच्छ करणाराजवळ जाणें ही कायमची खोडच ' रमे'ला आहे. हा भिकारी भिक्षा मागणारा नाहीं अशी कीर्ति झाली म्हणजे लोक त्याला हुडकून काढून त्याच्यापर्यंत जाऊन त्याला भिक्षा घालतात. आमचे गुरु महाराज व शिष्य जंबु यांनीं गोसाव्याचा वेष घेतल्यापासून त्यांना हाच अनुभव आला होता. म्हणजे निरीच्छपणाचें सोंग राहूनच्या राहून सर्व इच्छाहि साधल्या. पोलिसांच्या हातीं न सांपडणें आणि उद्योग केल्याशिवाय चैन चालणें याच त्यांच्या मुख्य इच्छा आणि या मठांत येण्यापूर्वीं काय झालें असेल ठाऊक नाहीं; पण नंदभुवनांत आल्या-

पासन तरी त्या दोघांची चैन चालली होती, हें आपणाला आतां माहीत आहे. चंद्र हा नवा शिष्य; पण जंबु हा जुना शिष्य. त्यानें नव्या शिष्याला हार कां जावें ? चंद्र व जंबु समवयस्क. अर्थात् चद्रूनें जर अरेतुरे केलें तर जंबूनें चंदूला अरेतुरे केल्याशिवाय कां सोडावें ? चंद्र घरचा श्रीमान असेल; पण म्हणून काय झालें ?

असो. अरेतुरेच्या संभावनेचा अपमान गिळून चंदु म्हणाला, " तूं बिंबाबरोबर फिरायला जाणें हा अपराध नसेल. पण लोकांच्या दृष्टीनें तें योग्य दिसत नाहीं इतकंच माझं म्हणणं. "

" लोकांच्या दृष्टीनं पाहण्याचं मला काय कारण ? माझं अहिंसेचं व्रत आहे आणि अहिंसा प्रेमाशिवाय पूर्ण होत नाहीं. म्हणून बिंबावर प्रेम करून अहिंसेचं व्रत पूर्णावस्थेला नेत आहें. बिंबाच्या इच्छेविरुद्ध वागून तिला मीं त्रास दिला असता तर ती हिंसा झाली असती. पण मी तसं कांहींच करत नाहीं. "

या धट्टपणाला चंदु काय उत्तर देणार ? चंदूनें आपली तक्रार गुरुमहाराजापुढं मांडून पाहिली. पण त्यांनीं तींत लक्ष घातलें नाहीं. ते म्हणाले, " तुम्ही दोघे गुरुबंधु आहांत. म्हणून तुम्ही परस्पर प्रेमानेंच वागले पाहिजे. बिंबा ही कांहीं माझी शिष्यीण नाहीं. तिचे व जंबुचे संबंध प्रेमाचे असल्यास या मठांतील अहिंसेच्या वातावरणात भरच पडेल. जंबूसंबंधानें तूं मनांत राग धरून वागशील तर तुझें अहिंसेचें व्रत फुकट जाईल, याचा विचार कर ! "

तात्पर्य, बिंबेला बोलून पाहिलें तों तिनें तसें उत्तर दिले आणि इकडे जंबूला बोलायला तो गेला, त्याची अशी संभावना झाली. प्राण घेण्याची कोणत्याहि प्रकारची हिंसा अलीकडे त्याच्या हातून होत नव्हती; आणि एखादा कृमी कीटक कपड्यावर दिसला तर त्याला तो आपलें रक्त शोषूं देत असे आणि फारच वेदना झाल्या तर तो त्याला चिमटींत उचलून एखाद्या झाडाच्या सावलींत सोडून देत असे. पण अहिंसा म्हणजे प्रेम आणि प्रेम म्हणजे अहिंसा हें समीकरण कांहीं केल्या त्याच्या मनांत बसेना.

गुरुशिष्यांच्या वर्तनामुळें बाहेर बोभाटा रोज अधिकाधिक होत होता. अलीकडे चिन्तातुर मनानें या गोष्टीचा विचार करण्यांत चंदूची घटका-घटकाहि जाऊं लागली. तो आपल्या कचेरींत टेबलाशीं रिकामा बसे. त्यानें बाहेरच्या सर्वांचे संबंध तोडून टाकल्यासारखे केल्यामुळें, भेटीगाठीला येणाऱ्या मित्रामध्यें खंड पडूं लागला. भावनेंत एकदम बदल पडला तो फक्त चंदूच्या. त्याच्या मित्रांच्या भावनेंत फरक पडण्यासारखें कांहींच घडून आलें नव्हतें. गुरुमहाराजाकडे पूज्यतेच्या भावनेनें एकहि मित्र पाहात नव्हता. त्या व्यक्तींत महात्मापणाचें लक्षण त्यांना कांहींच दिसून आलें नव्हतें.

मित्रत्वाच्या नात्यानें चंदूशीं चर्चा करून त्याचा भोळेपणा मोडून काढावा असेंहि या मित्रांच्या मनांत येई; पण एक तर त्यांना वाटे कीं, या नाजूक मुद्याला एकदम हात घालणें बरें नव्हे. क्रमानें सगळ्या गोष्टी होतील. घाईचा परिणाम कदाचित विपरीत व्हावयाचा. दुसरे कांहीं मनांत म्हणत कीं, चंदूसारखा सुशिक्षित नवमतवादी गुरुभजनीं लागला, त्या अर्थीं त्याला काहींतरी तसेंच कारण असेल. ज्याचा अनुभव त्याला, आपण काय बोला ? बुवाबाजीला बळी पडलेले सगळे एका मापानें कसे मोजावे ? डाव्या तोंडाच्या शंखाप्रमाणे उजव्या तोंडाच्या शंखालाहि शंखच म्हणतात ! पण त्या उजव्या तोंडवाल्याला किती तरी मान ! सुशिक्षित मनुष्य देव-भोळा ठरला तर, अशिक्षित देवभोळ्याप्रमाणें त्याला तुच्छतेनें एकदम निकालांत काढून टाकतां येत नाहीं. तात्पर्य, कोणत्या ना कोणत्या तरी विचारानें चंदूचे मित्र त्याच्यापासन दुरावले होते.

तो आय्. सी. एस्. च्या नोकरीवर जावयाचा असता तर त्यांचा पत्रव्यवहार कांहीं चालू राहाता; पण त्यानें मनानें तरी तीहि बाजू सोडून दिल्यानें तोहि उद्योग थांबला. आपण सही करून पोष्टांत टाकायला दिलेला राजिनामा विलायतेस जाऊन पोचला अशी त्याची समजूत असल्यामुळें त्या राजिनाम्याच्या पत्राचें उत्तर—निदान औपचारिक पावती—तरी येईल म्हणून चंदू वाट पहात बसे. सिगारेट ओढण्याचेंहि त्यानें सोडून दिलें होतें. यामुळें तोहि करमणुकीचा उद्योग थांबलाच होता. म्हणून टेबला-

वर कोपरें टेकावीं आणि दोन्ही तळव्यांची टोपली करून त्यांत तोंड घालून शून्य दृष्टीनें पाहात बसावें असा प्रसंग त्याच्यावर येई.

दिवसभर उडया घेत धावणाऱ्या चेंडूप्रमाणें चपळतेनें घरभर आणि घराबाहेरहि हिंडणारा फिरणारा पूर्वींचा चंदु कोणीकडे? आणि त्याच्या कचेरीची खोली, गुरुमहाराजांचा मठ, आणि वाडयांतलें भोजनगृह या बंदिस्त त्रिकोनांत गोगलगाईच्या पावलांनीं सरपटणारा चंदू कोणीकडे? एखाद्या अफिणबाज माणसाप्रमाणें गुरुभक्तीनें चंदूचें मन व त्यामुळें शरीर पेंगुळल्यासारखें झालें होतें. आईबापाशीं बोलण्या-चालण्याचा त्याचा खरा आनंद बहुतेक लोपला होता आणि थट्टा, मस्करी, विनोद यापैकीं जाग्यावर कांहींच उरलें नव्हतें.



## प्रकाशाचा पहिला किरण : : १४

कांहीं थोडे दिवस असे गेल्यावर एक गोष्ट अकाल्पित घडली.

मासाहेबांचा एक भाचा सागर प्रांतांतील गुप्त पोलिस खात्यांत अिन्स्पेक्टरच्या नोकरीवर होता. तो सहज त्यांना भेटण्याला आला. भाचा प्रेमळ आणि विश्वासू. मासाहेबांनींच त्याला आधार देऊन लहानाचा मोठा केल्यामुळें मुलासारखा आज्ञाधारक व कृतज्ञ होता. चंदूच्या परिवर्तनानंतर हा भाचा प्रथमच आल्यामुळें झाल्या प्रकाराविषयीं त्या उभयतांत सहजच गोष्टी निघाल्या. पण आपलें बोलणें कोणाला ऐकूं जाऊं नये म्हणून मासाहेब भाच्याला आपल्या खास बसावयाच्या जागेंत घेऊन गेल्या आणि दाराला कडी लावून घेतल्यावर दोघे विश्वासानें बोलूं लागलीं.

मासाहेब म्हणाल्या, "वन्सीधर, तूं बरा वेळेवरच आलास म्हणायचा! मन उघडं मोकळं करून कुणाशीं बोलायला सापडलं नसतं तर मनांत

कुढून कुढून मी कदाचित् दुखणाईत झालें असतें. आमच्या घरीं घडलेल्या प्रकाराबद्दल तुला काय वाटतं ? ''

बन्सीधर म्हणाला, ''मासाहेब, काय वाटायचं ? माझ्या गुप्त पोलिसाच्या धंद्यांत मनुष्यस्वभावाचा अनुभव मला नित्य जितका येतो तितका घर-बसल्या तुम्हांला कसा येणार ? पण मी एकदम सांगतों कीं, झाला प्रकार हा कांहीं सरळ नाहीं. यांत कांहीं तरी मला भानगड दिसते आणि आज जो मी या ठिकाणीं आलों तों तुमच्या समाचाराला तर आलोंच, पण त्यांतल्या त्यांत माझीहि एक सरकारी कामगिरी काखेंत घेऊन आलों आहें. त्याबद्दल तुम्हाला मी मग सांगेन. आधीं मला इतकेंच थोडक्यांत पण क्रमवार सांगा कीं हें सगळं कसं घडून आलं ? ''

मासाहेब म्हणाल्या, '' मला प्रत्यक्ष माहिती म्हणशील, बन्सीधर, तर फारच थोडी आहे. आहे ती इतकीच. चंदु विलायतेहून आला. तो आय्. सी. एस्. परीक्षा पास होणार या खात्रीनें आला. आम्ही आनंदांत होतों. अगाऊ अभिनंदनाचे समारंभहि सुरू होते. ते सुरू असतां एक दिवस सकाळीं चंदु घोड्यावरून रपेट करून आला. यांच्या मांडीला मांडी लावून बसून त्यानें सिगारेट पेटाविली. तेव्हां मी त्याला थोडं रागान बोललें. नंतर तो कांहीं वेळानं आपली छोटी शिकारी बंदूक घेऊन बागेंत गेला. सकाळचे नऊ वाजण्याची वेळ. त्यानें झाडावरचे दोन पक्षी मारले. इतक्यांत तिकडून बैराग्यांची एक जोडी आली. त्यांतल्या एकानें त्याचा निषेध केला. ईश्वर या हिंसेबद्दल तुझा न्याय करील, तुला शिक्षा करील; म्हणून आजचा हा दिवस आणि ही घटका लक्षांत ठेव ' असं म्हणून ते दोनहि बैरागी पक्षी उचलून घेऊन भद्रेश्वराला गेले. चंदूनं त्याच्या निषेधाला तेव्हां भीक घातली नाहीं. उलट त्यानं त्यांचीच खरडपट्टी काढली आणि अहिंसेच्या उपदेशाची टर उडविली ' हो हो ! ईश्वर माझें काय करतो तें पाहीन ' असेंहि म्हणाला आणि योगहि असा कीं त्याच दोन प्रहरीं त्याची आय्. सी. एस्. परीक्षा पास झाल्याची तार आली. पुढें एका दिवशीं संध्याकाळीं त्याची निवडक मित्रमंडळी मेजवानीला जमली. टेबलाशीं येऊन बसलीहि. इत-

क्यांत म्हणे दुसऱ्या एका खोलींत चंदूच्या सिगारेटचा धूर त्याच्या काळजाला भिनून त्याला घेरी आली. त्याचा बाळमित्र डॉ. जालंदर यानं त्याला कांहीं उपचार करून टेबलाशीं आणून बसविलें. पण तो जेवला नाहीं, खाल्लें नाहीं, फारसें बोलला नाहीं. मंडळीहि हें पाहून उगीच इकडलं-तिकडलं कांहीं बोलून घरोघर निघून गेली. सर्व रात्रभर चंदु खोलींत निजून राहिला, सकाळीं उठला, थोडें बरें वाटतें म्हणाला, चहा घेतलान्, आणि कान्या माळ्याला बरोबर घेऊन तडक पायानें भद्रेश्वराला गेला. तिथपासून त्याचं वर्तन चमत्कारिक होऊं लागलं. 'माझ्या हातून हिंसा झाली' असें म्हणून तो रडला आणि अहिंसेचें व्रत घेतल्यादाखल त्यानं कान्याच्या गळ्यांतली तुळशीची माळ काढून आपल्या गळ्यांत घातली.

"दोन प्रहरीं जेवणाला घरीं येणार नाहीं असा निरोप त्यानं कान्याबरोबर पाठवला. आम्ही मनांत भ्यालों. संध्याकाळपर्यंत वाट पाहून दोघेजण गाडींत बसून भद्रेश्वराला गेलों आणि गुरु केलेल्या या बैराग्यानं 'उद्यां तुमच्या घरीं राहायला येतों' असं वचन चंदूला दिलं तेव्हांच तो आमच्याबरोबर परत आला. रातोरात त्यानं अतिथिगृहाचा मठ बनवला. तिला 'पर्णशाला' हें नांवहि त्यानं ठेवलं आणि तेथपासून एकाद्या विरक्तासारखा तो वागूं लागला! आय्. सी. एस्. च्या नोकरीचा राजिनामा पाठविला आणि जन्मभर अविवाहित राहीन अशी शपथ घेतली. आतां बन्सी, तूंच सांग या कर्मभोगाला काय करावं तें? वेड्याला उलट बोलूं नये म्हणतात म्हणूनच मी त्याला रागावून बोललें नाहीं आतांपर्यंत. बरं, हे घरचे पुरुष मनुष्य. यांनीं कांहीं उपाय योजावा; पण ते मुलाच्या नादीं कसे लागतात, त्याच्या आहारीं कसे जातात, त्याचे लाड कसे पुरवितात हें लहानपणापासून तुला माहितच आहे आणि तसेंच आतां या बैराग्याच्या भजनीं ते स्वतःच लागले आहेत. मग दुखानं म्हण, निराशेन म्हण! माझं कांहीं प्रेम कमी नाहीं; पण मीं मनाशीं पक्कं ठरविलं आहे कीं या भोळसटपणाच्या खेळांत सामील व्हायचं नाहीं. ईश्वर पावला आणि तूं आलास! म्हणून म्हणतें कीं यात थोडं लक्ष घाल. कांहीं छडा लागला तर

लाव ! मी घरीं डांबून बसलेली. जवळजवळ पडद्यांतली स्त्री. माझी बुद्धि किती चालणार ? ”

बन्सीधर म्हणाला, “ मी तर म्हणतों कीं मासाहेब, तुम्ही स्त्री होऊन गंगारामसाहेबाहून अधिक खंबिरी दाखविली, हें काय थोडं झालं ? बरं, असो. मी हें निश्चित समजून चालूं ना कीं सिगारेटचा धूर छातींत जाई-पर्यंत विपरीत असं कांहींच घडलं नव्हतं ? ”

“ असं मी तर समजतें, ऐकलं आहे त्यावरनं ! त्या दिवशीं जेवणाच्या वेळीं दुपारीं चंदू खूप आनंदांत होता एवढं मी अगदीं खात्रीन सांगतें. ”

इन्स्पेक्टर बन्सीधर म्हणाला, “ ठीक आहे. चौकशीला प्रारंभापासून प्रारंभ करावा हा तर आमच्या पोलिशी संशोधनांतला पहिलाच नियम आहे.”

मासाहेबाशीं दोन आश्वासनपर शब्द बोलून बन्सीधर फिरायला जाण्याच्या मिषानें बाहेर पडला. त्यानें स्वतः चंदूला या वेळीं मठांत भेटण्याचें टाळलें. कारण बैरागी महाराजांना निरखून पाहायचें तें प्रथम तरी दुरून रात्रीच्या अधुक प्रकाशांत पाहावें असें त्यानें मनाशीं ठरविलें होतें.

तो आपला साधा घरगुती पोषाख करून डॉक्टर जालंदर यांच्या दवाखान्याच्या रोखानें काठी हलवीत हलवीत निघाला. संध्याकाळची वेळ असली तरी नव्या धंदेवाईक डॉक्टर लोकांना दवाखान्यांत येऊन बसावेंच लागतें. डॉ. जालंदर मानसशास्त्रावरचें पुस्तक वाचीत बसला होता. बन्सीधराला पाहतांच उठून हस्तांदोलन करून तो म्हणाला, “अरे वाः बन्सीधरसाहेब ! तुम्ही कधीं आला नवलपूरला ? ”

“ आलों आजच तुम्हांला जाब विचारायला ” बन्सीधर धाक दाखविण्याच्या विनोदी स्वरानें हंसून म्हणाला.

“ मला जाब विचारायला ? आश्चर्यच आहे म्हणायचें. पण जाबजबाब घेण्याचा तुम्हांला अधिकारच दिला आहे म्हणा सरकारनं. खुशाल घ्या बाबा. ”

“ डॉक्टरसाहेब, गुन्हा घडल्याशिवाय आम्ही पोलीस झालों तरी जाब-जबाबाच्या भानगडींत कशाला पडूं ? ”

" काय गुन्हा झाला बाबा मजकडून ? आणि तो कधीं ? अन् दुसऱ्या कुणी केला तर त्याचा जाब मी देणार ? "

" फॅमिली डॉक्टर म्हणून ताब्यांत घेतलेल्या माणसापैकीं एखादं आजारी पडूं देणें हा फॅमिली डॉक्टरचा गुन्हाच नव्हे काय ? " असें म्हणून बन्सी-धर मोठ्यानें हंसून पुढें बोलूं लागला– " आपला चंदुलाल आजारी झाला असं ऐकलं. म्हणून कामांत काम काढून वांकडी वाट करून आलों झालं आणि रोग्याच्या प्रकृतीबद्दल विचारायचं तर ते डॉक्टराला विचारणं योग्य म्हणून तुमच्याकडं आलों. बाकी नवलपुराला आल्यावर एरवी देखील तुमची भेट घेतल्याशिवाय मी परत जात नाहीं, हें तुम्हांला माहीतच आहे म्हणा ! "

" ठीक ठीक ! भेटलांत तें मलाहि सर्वच दृष्टीनीं चागलं झालं. बरं, तुम्हांला जाब द्यायचा तो खरा देऊं कीं खोटा ? "

" पोलिसापुढं दिलेला जबाब नंतर परत घेतां येतो हें खरं. पण द्याय-चाच तर खरा द्यावा हें सर्व दृष्टीनं बर असतं. मार्कट्वेनचा फिलॉसफर काय म्हणतो माहीत आहे ना ? "

" तें काय ? "

" 'When in doubt, tell the truth.' बरं,आता सांगा हां मी मुद्याचं विचारतों तें. चंदुलाल तंबाखूच्या धुराच्या ठसक्यानं आजारी होऊन पंग-तींत न जेवतांखातां तसाच जाऊन निजला हें लक्षांत येतं. पण सकाळीं उठून आपल्या पायानं हिंडण्याफिरण्यासारखा झाल्यावर तो भद्रेश्वराला जाऊन या बैराग्यांना घेऊन घरीं आला, आणि सर्वसंगपरित्याग करून तो त्या गुरूचा शिष्य झाला, हाहि तंबाखूच्या धुराचाच परिणाम कीं काय ? "

" पण या प्रश्नाचं उत्तर माझ्या डाक्तरीच्या कक्षेंत पडत नाहीं बन्सी-धर ! मी धुराच्या ठसक्याला औषध देऊन चंदूला बरा केला. झालं माझं काम. त्याच्या विपरीत वैराग्याच्या रोगाला काय कारण झालं हें मी सांगूं शकत नाहीं. त्याला तुम्हांला एखादा ज्योतिषी देवर्षीच पाहिला पाहिजे. "

"वाः वाः! मानस रोगाचीहि चिकित्सा तुमच्या वैद्यकीय ग्रंथांत असते म्हणतात. पण जाऊं दे. आपण आतां हें औपचारिक अटीतटीचं बोलणं टाकून देऊं. तेव्हां खरंच सांगा कीं, चंदूच्या या विकृतीला काय कारण झालं असं तुम्हांला वाटतं? मासाहेबाना या गोष्टीचा छडा लावायचा आहे. त्यांना तो लावायला मी मदत करीन म्हणतों आणि त्याकरितां तुम्ही मला मदत केली पाहिजे. मात्र हें प्रकरण तूर्त तरी सर गंगारामाकडं न्यायचं नाहीं किंवा त्याची बाहेर वाच्यता करायची नाहीं. दोषी ज्वराला तो ओसरायला कांहीं ठराविक मुदत द्यावी लागते हें तुम्हांला माहीतच आहे."

"मलाहि हें सर्व इष्टच आहे. म्हणून तुम्हांला प्रथमच सांगून टाकतों कीं, चंदु सिगारेटच्या धुरानं आजारी झाला हा बहाणा होता व तो मींच केला. कारण एरवीं मोठ्या फजितीची वेळ होती. फजिती हीच कीं, चंदूच्या मनाला जबरदस्त धक्का बसण्याचं कारण कांहीं केल्या तो गुप्तच ठेवता, आणि त्यामुळं त्या क्षणीं मोठा बोभाटा होणार होता तो माझ्या युक्तीनं टळला."

"बोभाटा तेव्हापुरता तो टळला असेल. पण तो कायमचा कसा टळणार? सिगारेटच्या धुराचं नाटक तुम्हीं उभं करून चांगलं प्रसंगावधान दाखविलंत यांत शंकाच नाहीं. पण त्या क्षणीं तुम्हीं इतर काय पाहिलं सवरलं असं तुम्हांला स्मरतं?"

"मला इतकंच पण ते मात्र चागलं स्मरतं कीं, चंदू एकदम खालीं कोसळून पडतोसा पाहून मीं त्याला सावरून धरलं; तेव्हां त्यानं हातांतला एक कागद चटादिशीं चुरगळून आंतल्या खिशांत घातलान. मग तो मला कसा पहायला मिळणार? कदाचित् त्या कागदांतच कांहीं रहस्य असावं असं खास वाटतं."

"तो कागद साधारण काय स्वरूपाचा असावा असं वाटतं तुम्हांला?"

"रंगावरून, आकारावरून तो कागद तारेचा असावा असं वाटतं. त्या वेळीं तारेचा एक शिपाई नंदभुवनांत आला होता असं चौकशींत कळतं

आणि तीच तार त्याच्या हातांत त्या क्षणीं पडली असावी असा तर्क आहे माझा."

"फार महत्त्वाची माहिती दिलीत डॉक्टर. या तुमच्या माहितीची फलश्रुती मी उद्यां तुम्हांला सांगूं शकेन. तुम्ही नंदभुवनाकडं सहज मासाहेबांची प्रकृति पाहायला म्हणून उद्यां सकाळीं असे दहा वाजतां याल का?"

"वा! हें काय विचारतां बन्सीधर! अगदीं जरूर येईन. चंदूच्या शरीरप्रकृतीपेक्षां त्याच्या मनःप्रकृतीची काळजी आतां मला अधिक वाटूं लागली आहे. पण या तारेचा सुगावा लागावा कसा?"

"तें सर्व मी तुम्हांला उद्यां सांगेन."

इतकें बोलणें झाल्यावर बन्सीधर परत निघाला. रात्र पडूं लागली होती. नंदभुवनांतील दिवे लागले होते. बन्सीधर घरांत गेला. त्यानं आपला साधाहि पोषाक उतरला. एक मळकट धोतर नेसला. एक मळकट सदरा त्यानें अंगांत घातला. खांद्यावर एक खादीचं फडकं टाकलं. कपाळाला भस्माचा मोठा पट्टा ओढला आणि हळूच मठांत शिरून बैठकीच्या एका टोकाला जाऊन खालीं मान घालून पण वर डोळे करून पाहत बसला.

संध्याकाळच्या भजनाला नुकती सुरुवात झाली होती. गुरुमहाराजांनीं इतर एकदोन भजनं म्हटल्यावर चंदूनं त्यांना 'तुमबिन मेरी कवन खबर ले' हें पद म्हणण्याची विनंति केली. तें पद गुरुजींच्या आवडीचें नव्हतें. पण त्या पदापेक्षां त्या शिष्याची आवड त्यांना अधिक होती. म्हणून ते तें पद म्हणूं लागले. पण चंदु त्यांना त्या पहिल्या चरणापलीकडे जाऊंच देईना आणि मेरी या शब्दावर मजल आली म्हणजे तितक्यापुरता चंदूचा स्वर कंपित होई. चंदूचें हें सर्व विपरीत दृश्य पाहून बन्सीधराला मनांतून खूपच हंसू आलें; पण त्यानें मान आणखी खालीं घालून तें दाबलें.

गुरुजी व शिष्य या दोघां वैराग्यांच्या तोंडाकडे बन्सीधर बारीक नजरेनें पाहत होता. पैकीं गुरुजींच्या तरी चेहऱ्याची थोडशी ओळख त्याला कदाचित् पटली असावी असें वाटलें. शिष्याविषयीं त्याला अंदाज लागेना!

भजन संपल्यावर चदू महाराजांच्या पाया पडला. त्याच्या मागोमाग

बन्सीधरानेंहि तेंच केलें. मग ते दोघे आतेमामेभाऊ बोलत बोलत बाहेर पडले.

चंदु म्हणाला, " अरे, तूं केव्हां आलास बन्सी ? आणि मी तुला या पोषाकांत प्रथम ओळखलेंहि नाहीं. "

बन्सीधर म्हणाला, " तसं म्हटलं तर न ओळखण्याइतकं रूपांतर माझं झालेलं नाहीं या पोषाखानं. तसं रूपांतर फक्त दाढी-मिशा जटा याच करूं शकतात. तूं आज चार दोन दिवस दाढी केली नसावीस असं वाटतं आणि हा क्रम असाच चालवून तूं दाढी आणि मिशा वाढूं दिल्यास तर तूं मात्र ओळखूं येईनासा होशील. मग तसा कांहीं विचार आहे कीं काय ? "

" छेः छेः " चंदु हसून म्हणाला, " तसा कांहीं विचार नाहीं माझा. पण हल्लीं पूर्वीसारखी रोज दाढी करीत नाहीं एवढं मात्र खरं. "

" वाः तेवढंच काय ? पण इतरहि कित्येक बाबतींत बदल पडलेला दिसतो तुझ्यामध्यें. बाकी हें मला आवडलं हां, मी सांगतों. सुशिक्षित लोक नास्तिक असतात असा त्यांच्यावर सरसकट आरोप अलिकडं लोक करतात. तो तूं धुवून टाकणार यांत शंका नाहीं. पण आतां तुझी प्रकृति तरी बरी आहे ना, चंदू ? "

हें आणि अशा तऱ्हेचें आणखी थोडें बोलून बन्सीधर घरांत गेला. निरनिराळ्या पंक्तीला जेऊन दोघेहि निजायला गेले.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं तार ऑफिस उघडल्यावर बन्सीधर आपला पोलिसी पोषाक घालून तार ऑफिसांत गेला आणि मुख्य तारमास्तरला एकीकडं बोलावून ' एका गन्ह्याचा तपास करायचा आहे ' असें सांगून, रविवारच्या तारखेला चंदूच्या नांवानें आलेल्या व त्याला पोचत्या झालेल्या तारांच्या स्थळप्रति त्यानें पाहावयास घेतल्या. बाकीच्या तारा औपचारिक अभिनंदनाच्या होत्या त्या टाकून देऊन सायंकाळीं ७॥ वाजतां आलेल्या तारेची प्रत करून ती त्याने खिशांत घातली आणि तारमास्तरांचे आभार मानून तो निघून गेला.

दहा वाजतां पूर्वी कबूल केल्याप्रमाणें डाक्तर जालंदर आधींच येऊन नंदभुवनांत मासाहेबांशीं बोलत बसला होता. त्या दोघांना पाहून बन्सीधर

हसून म्हणाला, " लागला पत्तामुद्दा चंदुच्या वैराग्याचा. इतकें सोपें संशोधन केव्हांच माझ्या वांट्याला आलें नव्हतें. चंदूला म्हणावें ठेव आपलं रहस्य आपल्या पेटींत घालून. "

असें म्हणून तो तारेचा कागद खिशांतून काढून त्यानें डाक्तरला अिंग्रजींत वाचून दाखविला आणि त्या मजकुराचें भाषांतर करून त्यानें मासाहेबाला सांगितलें.

" आला सर्व मजकूर ध्यानांत. हा सर्व तरुणपणच्या भावनेचा खेळ ! " मासाहेब एकदम उद्गारल्या.

बन्सीधर म्हणाला, " पण यापलीकडे जाऊन आणखी शोध लागायला मला विलायतच्या पोलीस-खात्याला सरकारी रीत्या लिहावं लागेल, आणि तिकडून सर्व माहिती मिळायला अर्थातच वेळ लागेल. "

" पण जाऊं दे कीं " डाक्तर म्हणाले, " आपल्यापुरतं कळायचं तें कळलं. यापलीकडचं कळून तरी काय करायचं आपणाला ? असेल कोणी तरी एक गोरी पोरगी मेरी कीं फेरी; पण ती मेली ! आणि ती मेली हेंहि एकपरी बरंच झालं. कारण ती जिवंत असती तर जन्मभर चंदूच्या मागं उपाधीसारखी लागून राहती. अशा पोरी आमचे चांगलेसे हिंदी तरुण पाहून त्यांच्या गळीं पडतात. मग कुणी लग्नाचं वचन मोडलं म्हणून फिर्यादी करतात व पैसे उकळतात ! कुणी लग्न झालं असूनहि हिंदुस्थानची हवा मानवत नाहीं असं निमित्त करून इकडं न येतां तिकडेच पैसे मागवितात. कुणी घटस्फोट मागतात. एक ना दोन ! चंदू चरकांत सांपडला; पण दैवानं परस्पर सुटला. बरं झालं. आतां हें गुरुभजनाचं वेडहि कालांतरानं सुटेल. त्याची नको काळजी. "

" तीहि काळजी दुसऱ्या एका रीतीनं मी लवकरच दूर करीन अशी मला आशा वाटते, डाक्तर. "

" ती कशी ? "

' वा ! तें माझंहि एक पोलिसी रहस्य आहे या घटकेला. पण कळेल, लौकरच कळेल. पाण्यांतली घाण वर आल्याशिवाय राहत नाहीं फार वेळ."

डॉ. जालंदर म्हणाला, " अरे वा ! मीं तारेबद्दल कालच सांगितलं आणि तुम्ही आजच ती मिळवून रहस्यावर भरपूर प्रकाश पाडला, हें कसं झालं ? "

" यांत काय कठीण ? तुम्हां डॉक्टरांना हें काय माहीत कीं, तार ऑफिसांत आलेल्या तारांची मूळ प्रत कांहीं महिनेपर्यंत तार ऑफिसांत राहतेच मुळीं ! मग ती मुंबई-कलकत्त्यास पाठविण्यांत येते. आतां इतर कोणाला ती मिळाली नसती. परंतु पोलिसतपासाकरितां अशा तारा पाहा-वयास मागण्याचा पोलिसांना हक्क असतोच आणि त्याप्रमाणें ती मागतांच मला मिळाली. पण तुम्हांला हेंहि सांगतों कीं, कालान्तरानें तार ऑफि-सांतली ही बातमी अनधिकृत रीतीनें हळूहळू बाहेर पडल्याशिवाय राहिली नसती. ज्यांना आपण सरकारी गुप्त बातम्या म्हणतों त्यांनाहि बाहेर पडण्याला पाय असतात. "

" पण मठामध्यें पक्षी ठेवून त्यांना दाणापाणी घालण्याचं जें सोंग चाललं आहे त्याचा अर्थ काय ? "

" तें नाटक दाखविण्यापुरतं आहे. तें पाहून लोकांना वाटावं कीं, हातून झालेल्या हत्येचाच विषाद वाटला आणि त्यामुळंच वैराग्य प्राप्त झालं ! " बन्सीधर हसून म्हणाला. " ठीकच आहे ! चंद्रूला हत्या झाल्यानंतर तिचा विषाद वाटला आणि गीतेंतल्या अर्जुनाला पुढं होणाऱ्या हत्येचा आधीं विषाद वाटला इतकाच फरक. पण मला इतकीच भीति वाटते कीं–नव्हे चुकलों आशा वाटते कीं–जें भांडं लवकर तापतं तें निवतंहि लवकर. "

" म्हणजे तुझं म्हणणं काय तें, बन्सीधर, माझ्या लक्षांत नाहीं आलं ?" मासाहेबांनीं विचारलं.

बन्सीधर म्हणाला, " वाऱ्यानं आलेलं वैराग्य वावटळीनं निघून जाईल. दोन्हीहि अभावितच. श्रीकृष्णाचा गीतेंतला उपदेश समर्पक आणि बुद्धीला पटणारा होता असं कोणी वाटेल तर म्हणो. पण मला वाटतं कीं, शेवटीं उपदेश पटण्याऐवजीं कृष्णाचा कल पाहून, भीड पडली असं दाखवून अर्जुन युद्धाला तयार झाला. त्यालाहि मनांतून लढायचंच होतं. पण हातून घड-

णाऱ्या हत्येला ती हत्या नव्हे असं सांगणाऱ्या कुणा लब्धप्रतिष्ठिताचं निमित्त हवं होतं तें मिळालं. तसें चंदूचंहि होईल कदाचित् पुढंमागं. अशीं निमित्त माणसं पुरवितात, तशी परिस्थितीची घटनाहि एखादे वेळ पुरवूं शकते."

डॉ. जालंदर म्हणाला, "मग इथं तें निमित्त चंदूला कोण पुरवील असं वाटतं? गुरुमहाराज तर उठल्याबसल्या अहिंसाच घेऊन बसले आहेत आणि चंदूला आज तर उलटा उपदेश करायला गुरुमहाराजांहून अधिक श्रेष्ठ अधिकारी कोणी दिसत नाहीं. मग बन्सीधर, तुम्ही म्हणतां त्याप्रमाणं चंदूसंबंधानं परिस्थितीच काय घडवील तें खरं!"

"पण चंदूच्या विषादाचं कारण शिकारींत घडलेली हत्या नसून त्याच्या आवडत्या एखाद्या मेरीच्या मृत्यूची बातमी हेंच जर असेल तर ती परिस्थिति कशी बदलणार?" असा मासाहेबांनीं अवघड पण सयुक्तिक प्रश्न टाकला. त्याला जालंदरच काय पण बन्सीधरालाहि समाधानकारक उत्तर सुचलं नाहीं. मेरीच्या मृत्यूच्या परिस्थितींत फरक पडायचा म्हणजे ती काय फिरून जिवंत होऊन यायची?

"छे, छे, ती गोष्टहि काढूं नका" जालंदर म्हणाला. "कारण ती मेली असली तर जिवंत होऊं शकत नाहीं. पण ती मेलेलीच बरी असं मी मघाशीं म्हणालों, तसंच मला अजून वाटतं."

मासाहेब म्हणाल्या, "होय बाबा जालंदर, तू म्हणतोस तसं मलाहि वाटतं. चंदू आज अविवाहित असला तर कदाचित् कालान्तरानं त्याचं वैराग्य ओसरून तो लग्न करण्याला तयार व्हायचा संभव तरी शिल्लक उरतो; पण ती विलायती बया फिरून जिवंत होऊन किंवा मेलेली नसून चंदूच्या गळ्यांत येऊन पडली तर कोण गोंधळ अन् कोण बेअब्रू होईल!"

"वा!" बन्सीधर म्हणाला, "त्यांत हो काय गोंधळ आणि बेअब्रू मासाहेब? आयती शिकली सवरलेली गोरीगोमटी सून मिळेल कीं तुम्हांला! गोरींगोमटीं नातवंडं होतील. विलायती कुटुंब व्याहीविहिणीचं मिळेल. म्हणजे केवढी मोठ्या अब्रूची गोष्ट झाली! निम्मं स्वराज्य हुंड्यादाखल चंदूनं घरीं आणलं, नाहीं का? लोकमान्य टिळक तरी काळ्यागोऱ्यांचेंच स्वराज्य मागत

होते. तें नाहीं का चंदुनें मिळविलं हिंदी माणसानें इंग्रज बायको करून ?" आज धनी म्हणून इंग्रज इकडे मिरवितात आणि हिन्दी लोकांना गुलामासारखे वागवितात. मग गुलामानें धन्यामालकाची मुलगीच बायको करणें हा केवढा पराक्रम ! ”

“ फारच तुझं शहाणपण वाहवलं बन्सी ” मासाहेब म्हणाल्या. “ तुम्हां तरुण लोकांना स्वराज्य मिळविण्याचा, गुलामानं धन्यावर सूड उगविण्याचा हाच मोठा आवडीचा मार्ग वाटत असेल, नाहीं ? पण तुला सांगून ठेवतें कीं चंदूनें ही मडम बायको करून घरीं आणली असती तर मी त्याला माझ्या घरांत पाऊल घालूं दिल नसतं, सांगून ठेवतें. आपली विलायती बायको घेऊन चंदूनं खुशाल दूर राहावं म्हणजे मला सर्व मिळालं असं मीं म्हटलं असतं. ”

“ जाऊं दे कीं मासाहेब ” जालंदर म्हणाला. “ मेलीं माणसं जिवन्त होण्याची विद्या जोंवर हस्तगत झाली नाहीं तोंवर हा निष्कारण वाद कशाला ? आतां डॉक्टर म्हणून मी एवढंच सांगतों कीं चंदूच्या वैराग्याचं खरं रहस्य तुम्हां आम्हाला कळलं आहे याचा सुगावा तूर्त त्याला आपण कोणी लागूं देऊं नये. आम्ही डॉक्टर लोक दोषिक तापाला मुदत देतों, आणि रोग्याजवळ बसून अधिक बिघाड न होईल इतक्यावर लक्ष ठेवतों, तसंच इथं करूं. या गोष्टी जितक्या परस्पर होतील तितक्या बऱ्या ! ”

चंदूच्या वैराग्याचं खरं कारण कळलं, त्यानं मासाहेबांना चांगलं वाटणं शक्यच नव्हतं. मुलानं विलायतेंत केलेला हा चाळा त्यांना आवडला नाहीं. शरयूच्या बाबतींत आपणाला तोंडघशीं पाडलं हेंहि त्यांना आवडलं नाहीं. पण चंदूच्या वर्तनाचा ठाव लागला एवढी गोष्ट त्यांना आवडली. अज्ञान किंवा संशय यापेक्षां अप्रिय असलें तरी ज्ञान हें मनुष्य पत्करतें. ज्ञानानें निश्चित उपाय सुचूं शकतो. अज्ञान किंवा संशय या स्थितींत उपाय शोधूं जाणें म्हणजे तो आंधळ्या कोशिंबिरीचा खेळ खेळणें नव्हे काय ? न जाणो आपल्याविषयीं सहानुभूति वाटून गुरुमहाराजच चंदूला ब्रह्मचर्याचं व्रत मोडण्याला कदाचित् सांगतील, नाहीं कशावरून ? अशीहि एक आशा त्यांना

वाटली असावी. पण एक गोष्ट मात्र त्यांनीं मनाशीं ठरविली, ती ही कीं फिरून होणाऱ्या या परिवर्तनावर विसंबून शरयूचं लग्न करण्याचं तुम्ही यापुढें थांबू नका असं रावबहादुर शामलाल आणि त्याची बायको यांना सांगायचं; ती जबाबदारी तरी आपल्यावर नको. एकतर्फीं आपलंच काय व्हायचं तें होवो. लग्नापूर्वी अनेक स्थळें उभयपक्षीं पाहातातच ! त्यातल्या एकाखेरीज बाकी सगळीं सोडून द्यावीं लागतातच कीं नाहीं ? इथंहि तसंच घडेल.

सर्वांना हा विचार पसंत पडला. बन्सीधर इतकेंच म्हणाला कीं, " तुम्ही आतां स्वस्थ राहा. फुकटचं नाटक पाहायला काय घ्याल ? मला कांहीं अधिक करतां आलं तर करीन, नाहीं तर सोडून देईन. "

मासाहेबांनीं यांतलं एक अक्षरहि आपल्या पतीला कळूं दिलं नाहीं. पण त्या दिवसापासून चंदुकडे त्या निराशेनं पाहात नाहींशा झाल्या. उलट तो जेव्हा त्यांच्या समोरून जातांना हिंडतांना ' तुम बिन मेरी कौन खबर ले ' हा त्याच्या आवडत्या भजनाचा चरण गुणगुणे तेव्हां त्या मौज वाटून आपल्याशीं खूप हसत आणि त्याला म्हणत, " म्हण म्हण रे तें पद पुन्हा पाहूं. बरं चांगलं म्हणतां येतं कीं तुला. पण तुम बिन मेरी कोन खबर ले या पदाचा अर्थ काय तो तरी मला समजून सांग. या पदांतलं तुम म्हणजे कोण ? मेरी म्हणजे कोण ? " चंदू हसला; पण बोलला नाहीं.



## बन्सीची दुसरी खेप : : : १५

यानंतर फिरून कांहीं दिवसांनीं बन्सीधर नवलपूरला आला. पूर्वीप्रमाणें याहि खेपेला तो प्रथम सर गंगाराम किंवा चंदु यांना भेटला नाहीं. पाहुणा म्हणून उतरण्याची त्याची खोली स्वतंत्र होती. तिच्यांत सामान ठेऊन त्यानें मासाहेबांची गाठ घेतली. त्या म्हणाल्या, " या खेपेला बराच लौकर परत आलास बन्सी ! "

" हो मासाहेब, आणि यापुढेंहि वरचेवर दोन तीन खेपा तुमच्या अपेक्षे-पेक्षां लवकर होतील. बरं, मी गेल्यापासून कांहीं कमजास्त ?"

मासाहेब म्हणाल्या, " एका बाजूनं थोडं कमी, पण एका बाजूनं थोडं जास्त आहे. "

" तें कसं काय ? "

" तें असं कीं चंदूची गुरुभक्तीची उठाठेव किंचित् मागं पाय घेत आहे असं दिसतं. पूर्वींहून त्याचा तासभर वेळ मठांत कमी जातो. गुरुजवळ बुवापणाशिवाय दुसरं कांहींच भांडवल दिसत नाहीं. तेव्हां तेवढ्यावर व्यापार किंवा उलाढाल किती होणार ? गुरुमहाराज कांहीं इथल्या मुक्कामाला कंटाळलेले दिसत नाहींत; पण शिष्य चंदूची भक्ति अंगवळणीं पडून रोज रोज अंगांत घातलेल्या अंगरख्यासारखी किंचित् शिथिल होत असावीशी वाटते. "

बन्सीधर हसून म्हणाला, " चांगला दाखला दिलात मासाहेब. तोच घेऊन मी सांगतों कीं हा गुरुभक्तीचा अंगरखा शिथिलच काय, पण लवकरच फाटून जाईल इतके चंदूच्या अंगचे धक्के त्याला बसणार आहेत. "

" तें कसं काय ? "

' तें सांगण्याची वेळ अजून आली नाहीं. किंचित् अवकाश आहे त्याला; पण कळून येईल लवकरच ! बरं, एक कमी झाल्याचं सांगितलंत; पण एक जास्त झालं तें काय ? "

मासाहेब किंचित् वाईट तोंड करून म्हणाल्या, " काय सांगू बन्सी ! वाईट ग्रहाचा फेराच आलेला दिसतो थोडासा. कारण इकडं चंदू गुरु-महाराजांच्या भजनीं असा लागला, तर तिकडं बिम्बा त्या शिष्याशीं करूं नये इतकी सलगी करूं लागली आहे. अजून ती गोष्ट काळजी काट्यानं, बारीक नजरेनं, पाहाणाऱ्याशिवाय दुसऱ्या कोणाला फारशी दिसून आलेली नाहीं. पण माझ्या नजरेंतून ती कशी सुटेल ? मी बिंबाला अजून तशी फारशी ओळख दिली नाहीं; पण माझ्या मनाला ती आतून एक काळजीच लागून राहिली आहे. "

बन्सी म्हणाला, " मासाहेब, सांगितलंत बरं झालं. पण सगळे वाईट ग्रह एकाच कुंडलींत असतात. यामुळें ज्योतिष्याला या ग्रहाचं वेगळं नि त्या ग्रहाचं वेगळं निदान करावं लागत नाहीं. वक्री होऊन तुमच्या घरीं आलेल्या या दोन्ही पापग्रहांची कुंडली माझ्या खिशांत आहे असंच समजा. त्यांच्या परिहाराचें अनुष्ठानहि बसायचं तिथं बसलंय्. फलश्रुति लवकरच पदरांत पडेल. "

या दोघांचं हें बोलणें होत आहे इतक्यांत चंदू सहज तिकडे आला, त्या दोघांना पाहून बसला आणि मामेभाऊच तो, त्याच्याशीं चार शब्द बोलावे म्हणून म्हणाला, " कोणत्या खटपटींत आहेत पोलिस इन्स्पेक्टरसाहेब ? कसल्या गुन्ह्याची गुप्त चौकशी हातीं घेतली आहे ? "

बन्सीधर हसून म्हणाला, " चंदूलाल, आमच्या पोलिसखात्याच्या परीक्षेला ज्योतिष हा विषय ठेवतील तर बरं होईल असं वाटतं ! कारण गुन्हेगारी आणि फलज्योतिष यांचा मेळ व्यवहारांत बराच पडलेला अलिकडं माझ्या अनुभवाला येऊं लागला आहे. एखाद्या कुटुंबावर कोणी गुन्हेगारांनीं कांहीं घाला घातला म्हणून त्या अपराधाच्या चौकशीकरितां त्यांच्याकडे जावं. तों तेच आधीं सांगू लागतात कीं, आम्हांला तूर्त वाईट ग्रह आलेले दिसतात. तेव्हां वाईट माणूस आणि वाईट ग्रह या दोघांचा उपसर्ग एकाच वेळीं चांगल्या माणसांना केव्हां केव्हां होत असावा असं नाहीं का सिद्ध होत यावरनं ? "

आपणा दोघांमध्यें नुकत्याच झालेल्या भाषणाचा उपयोग बन्सीधरानं असा केलेला पाहून मासाहेबांना सहजच हसूं आलं ! पण चंदूला अर्थातच त्या हसण्याचा अर्थ कळला नाहीं. म्हणून तो पूर्वीच्याच धोरणानं बन्सीधराला म्हणाला, " फलज्योतिष हा विषय हिशेबांतनं अगदींच काढून टाकावा असं मला पूर्वीं वाटत होतं. तें माझं मत मात्र आतां किंचित् बदललं आहे. पण हल्लीं कोणत्या कुटुंबाला तुझ्या पोलिसी चातुर्याची मदत होते आहे ती सांग ना ! लोक पोलिसांना नांवें ठेवोत; पण शेवटीं वेळ आली कीं, नांवं ठेवणारांनाहि पोलिसाकडंच धांव घ्यावी लागते. "

बन्सीधर म्हणाला, " त्या कुटुंबाचं नांव मी कांहीं आजच्च सांगूं शकत नाहीं. पण त्यांना उपद्रव ज्यांचा झाला आहे किंवा होत आहे त्या गुन्हेगारांची मात्र थोडी माहिती सांगतों. उत्तर हिंदुस्थानांत फत्तरगढ म्हणून एक देशी संस्थान आहे. दोन वर्षांपूर्वी त्या संस्थानच्या खजिनदारीच्या कामावर गंगाप्रसाद नांवाचा एक अधिकारी होता. तो बरेच दिवस मथुरा नांवाच्या नायकिणीच्या नादीं लागला होता. तो आपल्या कह्यांत पुरा आलेला आणि त्याच्या हातांत संस्थानचा खजिना, असं पाहून नायकिणीचा लोभ बळावला आणि तिनं त्याच्या मनांत त्या खजिन्यावर डल्ला मारण्याची कल्पना भरविली. त्या गोष्टीला त्या नायकिणीच्या मोहामुळें तो खजिनदार कबूल झाला. संस्थानिकाच्या पदरीं अनेक मोटारी होत्या; त्यांतल्या एका मोटारीच्या ड्रायव्हरला खजिनदारानं वश करून घेतलं आणि सुमारं दोन वर्षांपूर्वी एका रात्रीं संधि साधून त्यानं, पाहरेवाल्याला कांहीं निमित्तानं दूर पाठवून, सुमारें पाऊण लाख रुपयांचं सोनं, नाणं, नोटा थैल्यांत घालून लांबविल्या. त्या मोटारींत भरल्या. तो ड्रायव्हर व गंगाप्रसाद मोटार घेऊन वेशीबाहेर गेले. तिथं मथुरा नायकीण अगाऊच्च जाऊन बसली होती. मग त्यांनीं तिलाहि मोटारींत घेतली आणि रातोरात दीडशे मैलांचा प्रवास करून ते चांदपूर संस्थानांत एका खेडेगांवीं गेले. या गांवींच्च तिघांचींहि घरं होतीं आणि म्हणूनच्च तिघांचीहि ओळख! फत्तरगढास प्रथम गंगाप्रसाद नोकरीला लागला. तो तिथं स्थिरपद झाल्यावर त्यानं मथुरा नायकिणीला त्या गांवीं आणलं. कारण हें राजधानीचं गांव असून तिथं तिच्या गाण्याबजावण्याचा धंदा बरा चालण्याचा संभव होता. ड्रायव्हरचं नांव फत्तेसिंग. त्यानंहि मोटार चालविण्याचं शिक्षण घेतल्यावर गंगाप्रसादकडून संस्थानच्या दरबारीं वशिला लावला आणि मोटार-ड्रायव्हरची नोकरी मिळविली.

" तिघेहि अशा रीतीनें परत आपल्या गांवीं आल्यावर त्यांनीं ही लूट यथाप्रमाण वाटून घेतली. मग मथुरा आपल्या गांवीं कायमचीच राहिली. कारण तिचा संशय या कामीं फत्तरगढच्या पोलिसांना येण्याचा संभव

नव्हता. पण संस्थानच्या खजिन्यांतला पाऊण लाखाचा ऐवज चोरीला गेलेला, संस्थानचा नोकर खजिनदार व संस्थानचा मोटार ड्रायव्हर हे फरारी, आणि संस्थानचीच मोटार, हीं सर्व एका रात्रींत नाहींशीं झाल्यामुळें खजिन्यांत चोरी कशी झाली याचं अनुमान उघडच होत होतं. पण या आपल्या देशची विशेष मौज ही कीं, संस्थानी अंमल आणि खालसा अंमल यांची सरमिसळ असल्यानं गुन्ह्याच्या तपासाला आणि खटले भरून गुन्हेगारांना न्यायकोर्टांत खेचून शिक्षा करणं हें काम जिकिरीचं होऊन बसतं. कारण खालसांतला पोलीस अधिकारी स्वतंत्र अधिकारानं संस्थानांत आपलं काम करूं शकत नाहीं. तसंच उलट संस्थानच्या अधिकाऱ्याचे हातपाय खालसा मुलखांत लुले पडतात आणि एक वेळ संस्थान व खालसा मुलुख या दोघाचीच गांठ असेल तरी पुरवलं. पण एका संस्थानांत गुन्हा आणि दुसऱ्या संस्थानांत गुन्हेगार अशी जोडी जुळली, म्हणजे मग आम्हां पोलिसांच्या त्रासाला सीमा उरत नाहीं. हाच गुन्हा घेईनास. याचा तपास म्हणून लावण्याचं कांहीं उरलेलं नाहीं. पण आज दोन वर्षे आम्ही वॉरंट बजावतां बजावतां थकून गेलों. ”

चंदु म्हणाला, “ मग ते गुन्हेगार शेवटीं आहेत तरी कुठ ? ”

बन्सीधर म्हणाला, “ काय सांगू रे ! अगदीं डोळ्यापुढं आहेत. त्यानीं गोसाव्याचा गुप्त वेष घेतलेला आहे. एकाची चेहरेपट्टी व एकाचा एक जुना फोटोहि आमच्याजवळ आहे. पण अजून वॉरंटावर त्या संस्थानच्या पोलिसांचा शेरा मिळत नाहीं आणि तो शेरा नाहीं म्हणून स्थानिक पोलिसाची मदत नाहीं. ”

चंदु म्हणाला. “ पण गोसावी आपल्याजवळ पैसा कसा ठेवणार आणि कशाला ? ”

“ मीं कधीं म्हटलं तसं कीं, ते मुद्देमाल बरोबर घेऊन हिंडताहेत म्हणून ? त्यांनीं लुटीचं रूपान्तर केलं, आपलीं घरं भरलीं, आणि इतर रीतीनं कांहीं ऐवज वाटून ठेवला आहे आणि ते दोघे सडे गोसावी होऊन हिंडायला निघाले. गोसाव्याला परस्पर पोट भरायला काय कमी ? आहेतच कीं

नाहीं तुमच्या-आमच्यासारखे अनेक धनिक भोळे-भाबडे लोक त्यांना मलिदा चारायला, शिधे द्यायला, एवढेंच काय पण गुरु करायला ! पण चंदु, मी हें शेवटचं बोलणं आपलं परत घेतों रे. कारण तुला लावून बोलल्यासारखं वाटेल ! तुझी गोष्ट वेगळी, इतरांची गोष्ट वेगळी ! ! मीं आपली जगाची सामान्य रीत सांगितली. "

चंदु म्हणाला, " तु माझ्यांत आणि इतरांत थोडा फरक करतोस तें योग्यच आहे. कारण मला जसं आमच्या या गुरूंचं अंतर्ज्ञान, अध्यात्मज्ञान प्रत्यक्ष अनुभवाला आलं तसं फार थोड्यांच्या अनुभवाला येत असेल. नुसता वैराग्याचा वेष पाहूनच त्यांच्या भजनीं लागणारे पुष्कळ ! पण त्यांना भाविक म्हणण्यापेक्षांहि मी मूर्ख म्हणेन. खरा भाविकपणा अनुभवावरच आधारलेला असतो. "

" हो, हो, हो ! " बन्सीधर हसून म्हणाला, " तुझी गोष्ट कोणीकडं, इतरांची कोणीकडं ! तूं एवढा सुशिक्षित, चार वर्षं विलायतेंत राहून शिकलेला. एम्. ए., बॅरिस्टर, आय्. सी. एस्. तूं का पुऱ्या चौकशीशिवाय कोणाला जवळ करशिल तो गोसावी झाला म्हणून ? असो, चला. मलाहि आज तुझ्या गुरुमहाराजांचं दर्शन घ्यावंसं वाटतं. होईल कीं नाहीं ? "

चंदू म्हणाला, " त्यांत काय अवघड ? आतां संध्याकाळची वेळ आहे, महाराज भजनाला बाहेर येऊन बसतीलच. " इतकें बोलणें झाल्यावर चंदू उठून गेला. बन्सीधर म्हणाला, " मासाहेब, तुमची किंवा सरसाहेबांची किंवा चंदूची जन्मपत्रिका तुमच्याजवळ असली तर द्या. त्यावरूनहि कांहीं अनुमान निघतं का बघतों. कोणीकडून तरी आपल्या ग्रहाची बाधा दूर झाल्याशीं कारण ! तुम्हांला कोणत्या ग्रहाची आज कोणत्या रीतीनं पीडा होती आहे तें तुमच्यापेक्षां आज मलाच थोडं अधिक माहीत आहे म्हणा ना ! तेव्हां सुचेल तो इलाज करावा हें आपलें काम. बरं, चंदुची गांठ झाली आणि बिम्बा कोठें दिसत नाहीं ती ? "

" ती हुकुमी अशी थोडीच कुठं सांपडायची ! ही मुलगी म्हणजे फुलपांखराची जात आहे. सदा पंख हलत असायचे आणि पाय एका ठिका-

णाला कधींच चिकटून राहायचे नाहींत. त्यांतून ती मोटार चालवायला शिकली आहे. त्यामळं हवी तेव्हां आपली आपण मोटार तबेल्यांतून बाहेर काढते आणि जाते बाहेर हिंडायला ! तशीच गेली असेल आजहि ! पण रात्रीं जेवायच्या वेळीं पडेलच तुझी गांठ. "

एका घटकेनं आपला साधा पोषाख करून बन्सीधर मठांत गेला. गुरुमहाराज बाहेरच्या दालनांत येऊन बसले होते. चंदु त्यांच्या पायाशीं बसला होता. इतक्यांत कांहीं काम लागलं म्हणून महाराजांनीं जम्बूला हांक मारली. पण तो ओ देईना. तेव्हां सहजच त्याची चौकशी कोणी नोकर इकडं तिकडं करूं लागला. काम म्हणजे मोठंसं अडलं होतं असं नव्हे; पण एकदां चौकशी सुरू झाली म्हणजे सहजच ती तडीला लागते. मग या नोकरानं त्या नोकराजवळ, त्यानं त्याच्याजवळ अशी चौकशी होऊन परत गुरुमहाराजांकडे निरोप आला, कीं तासाभरापूर्वीं जंबु तळ्याकांठच्या बागेंतून फुलें आणण्याकरितां म्हणून मोटारींतून गेला आहे आणि ही खबर घरच्या खुद्द मोटार-ड्रायव्हरनंच आणली. तेव्हां सरळच प्रश्न निघाला कीं मोटार-ड्रायव्हर तर घरीं; मग मोटार बाहेर काढली व नेली कुणी ? मोटार-ड्रायव्हरला आपल्याला होणारा त्रास केव्हां तरी बाहेर धन्याजवळ सांगायचाच होता. तेव्हां त्यानं किंचित् पाल्हाळानं असं सांगितलं कीं छोटे बैरागीबुवा मधून मधून अशीच कुणाला न सागतां मोटार काढून बाहेर नेतात.

तेव्हां चंदू सहजच म्हणाला, " अरे वा ! जम्बूला मोटार-ड्रायाव्हिंग येतं तर, तो तें कधीं कोठें शिकला बुवा ? "

तेव्हां मोटार-ड्रायव्हर म्हणाला, " ते तर चांगली मोटार चालवितात आणि कमी पडलं तर बिंबाताई आहेतच बरोबर ! त्यांनीं तर मोटार चालवायचा लायसेन्स काढलाच आहे. दोघंहि बागेंतच गेलीं आहेत जणुं फुलं आणायलाच ! "

, हा संवाद चालला असतां बन्सीधर आपल्या तोंडावर यत्किंचितहि चलबिचल दिसूं न देतां आळीपाळीनं गुरुमहाराज आणि चंदु यांच्या तोंडाकडे

न्याहाळून पाहत होता. चंद्र थोडा खजिल झाल्यासारखा दिसला, आणि गुरुमहाराजांच्या तोंडावर तर दाढी-मिशांतूनहि उमटेल इतकी भीतीची छाया दिसली. चंदूला वाईट वाटण्याचं कारण उघड होतं. जम्बूविषयीं त्याची तिरस्कारबुद्धि आधींचीच होती. पण त्याला राग हा आला कीं घरची मोटार त्यानं कुणाची परवानगी घेतल्याशिवाय वरचेवर कां न्यावी ! गुरुचा शिष्य झाला म्हणून त्याला हा अधिकार कसा पोचतो ? व त्यांतहि आणखी राग येण्याला भर ही कीं बिम्बा त्याच्या बरोबर एकटीच मोटारींतून जाते !



## जंबु व बिंबा : : : १६

जंबु आणि बिंबा मोटारींत बसून सागर तलावाकडे गेलीं ही बातमी खरीच होती.

अलीकडं बिंबा मठाकडं फार खेपा घालूं लागली होती. कोणाला वाटलं असतं कीं चंदूसारखी तिनेंहि गुरुमहाराजांकडून दीक्षा घेतली असावी. पण तसं कांहीं नसून भाऊ व बहीण या दोघांनीं गुरु व शिष्य हे वाटून घेतल्यासारखे झाले होते. चंदुचें पाऊल मठांतून बाहेर पडलें कीं बिंबा चटकन् प्रकट होई, आणि तिचें पाऊल मठांत पडे, तें बराच वेळ बाहेर निघत नसे. जंबु व बिंबा हीं एकत्र बसून बोलतात, हंसतात, खिदळतात हें गुरुमहाराजांना दिसे. पण त्यांनीं तें केव्हां मना तर केलेंच नाहीं; उलट ते आपणाकडून या खेळीमेळीला उत्तेजनच देत असत.

एखादें काम योजून गुरुमहाराज तें काम मुद्दाम दोघांना मिळून करायला सांगत. या कामांत फुलांच्या माळा करणें, पिंजऱ्यांतील कपोत पक्ष्याला दाणापाणी घालून बोलविणें इत्यादि असत. घरच्या दोन्ही-तिन्ही बागांतून फुलांचे हारे भरभरून घरीं येऊन पडत आणि गुरुमहाराजांच्या आज्ञेच्या

पडल्या फळाचें निमित्त करून बिंबा व जम्बु केव्हां महाराजांसमोर तर केव्हां त्यांच्या दृष्टीआड जाऊन माळा गुंफीत बसत. माळा गुंफतांना तीं दोघें समोरासमोर इतकीं जवळ बसत कीं त्यांचीं खालीं घातलेलीं डोकीं एकमेकांना भिडत आणि तोंडानें गुलगुलु चाललेल्या गोष्टी इतर कुणाला ऐकूं जात नसत.

असो. आज सागर तलावावरील सर गंगाराम यांच्या खास बागेंत हीं दोघे गेल्यावर त्यांनीं मोटार एका झाडाखालीं ठेवून दिली आणि बागेंतील माळ्याला हाक मारून त्या मोटारीचें रक्षण करण्याला म्हणून तेथेंच जवळ बसून राहण्याची आज्ञा केली. कारण एरवीं धन्याची मुलगी बागेंत आली म्हणून फुलें, पानें, फळें इत्यादि ज्या कांहींची इच्छा तिला होईल तीं काढून देण्याला तो तिच्यामागून चालत जायचा हें स्वाभाविक होतें. पण माळ्याचें शुक्लकाष्ठ आपल्या पाठीशीं नको म्हणून त्यांनीं मोटारीच्या राखणदारीचें काम त्याला सांगून ती पीडा टाळली.

सागर तलावावरील ही बाग बरीच विस्तीर्ण असून तिच्यामध्यें कृत्रिम शोभेपेक्षां निसर्गशोभाच अधिक होती. जुने वृक्ष शेंकडों वर्षांचे उच गगनभेदी असून त्यांच्या विस्ताराच्या जाळ्यांत अनेक पक्षिकुळांची पिढीजात वसाहत होती. उत्पन्नाची बाब म्हणून फळाफुलांच्या झाडांची लागवड अलीकडे पांच-पंचवीस वर्षांत झाली होती. त्याकरितां मोटेच्या पाण्याचे पाट खेळविले होते. पण सर्वांत रम्य व सौंदर्योपभोग घेण्याच्या जागा म्हणजे तळ्याच्या काठाकाठानें पाण्यांत शिरलेले वृक्षाच्छादित निरुंद भूभाग. यांतील दगडामातीचे बांधीव ओटे इतके सखल असत कीं त्यावर बसणाराला वाटल्यास पाय लांबवून तळ्याच्या पाण्यांत खेळवितां येत.

बिंबा व जंबु कांहीं वेळ वळणें घेऊन फिरत फिरत अशाच एका ओट्यावर येऊन बसलीं. वेळ तिसऱ्या प्रहरचीच असल्यामुळें सहल करणारे कोणी लोक तिकडे फिरकण्याचा संभव नव्हता. पाण्यावर तिरपें ऊन अशा बेतानें पडत होतें कीं ओट्यावर बसलेल्या माणसांचीं प्रतिबिंबें पाण्यांत स्वच्छ दिसावीं.

तीं दोघें ओटयावर बसल्यावर बिंबा म्हणाली, " जंबू, आपण घराहून मोटारींतून बरेच लवकर आलों, नाहीं का? तुम्हांला मोटार इतकी चांगली हाकतां येते हें मला माहीत नव्हतें. "

जंबु म्हणाला, " बिंबाताई, तुम्ही स्त्री असून जर इतकी चांगली मोटार हाकतां, तर मला पुरुषाला ती तुमच्याहून चांगली हाकतां आलीच पाहिजे. ती न आली तर मला लाज नाहीं का ? "

" तें काय म्हणून ? मी स्त्री असलें तरी मुद्दाम शिकलें आहे मोटार चालवायला म्हणून येते. उलट, जातीचा प्रत्येक पुरुष झाला म्हणून त्याला मोटार हाकतां आली पाहिजे असं थोडंच आहे ? त्यांतून तुम्ही बैरागी. तुमचा आणि मोटारीचा संबंध तरी कुठून येणार म्हणून आश्चर्य वाटलं ! "

हें ऐकून जंबु स्तब्ध बसला. या युक्तिवादावर काय उत्तर द्यावें हें त्याला एकदम सुचेना. तो पाण्याकडे टक लावून बसला. बिंबाहि पाण्याकडेच पाहत होती. पण स्त्रीस्वभाव तिला निश्चल बसूं देईना, म्हणून ती उजव्या हातानें जवळचा एकेक लहानसा खडा घेऊन पाण्यांत टाकी, आणि त्याचा टपकन आवाज होऊन पाण्यावर बारीक तरंग उठले म्हणजे आपल्या लीलाकर्तृत्वाचा जणु कांहीं अभिमान वाटून ती बालस्वभावानें गोड हास्य करी.

जंबूने बिंबाच्या प्रश्नाचें उत्तर देण्याचें टाळण्याला हेंच निमित्त घेतलें. तो म्हणाला, " हें काय बिंबाताई ! तुम्ही लहानपणीं खटयाळ होतां असं दिसतं. कारण हे पाणआरसे एकामागून एक फोडण्याचं काम लहान मुलासारखं तुम्ही काय चालविलें आहे ! लहानपणासारखं गालगुच्चा घेऊन शिक्षा करायला जवळ कुणी नाहीं म्हणून वाटतं ? '

" आरसे ? आणि इथ कुठून येणार आरसे ! "

" तुम्ही तळ्यांत खडे फेकायचा खेळ थांबवला तर क्षणभरानें दाखवितों आरसे इथंच बसल्या बसल्या. "

तरी बिंबाच्या लक्षांत येईना. मात्र शंभर अंक मोजीपर्यंत तिनें पाण्यांत

पुनः खडा टाकला नाहीं.तरंग खलास होऊन पाणी निश्चल झालं असं पाहून जम्बु बिंबाच्या अंगाला स्वतःच्या अंगाचा ओझरता स्पर्श होईल इतकें जवळ सरकून पाण्याकडे बोट दाखवून म्हणाला, " तो पाहा आरसा ईश्वरानं घडविलेला आणि आतां सांगा त्यांत काय दिसतें तें. "

पाण्याच्या आरशांत काय दिसत होतं हें कुणी सांगायला कशाला हवें होतें ? सुंदर काळ्या केशकलापांनीं भूषित झालेलीं दोन गोंडस मस्तकें एकाशेजारीं एक रंगवावीं, मांडावीं त्याप्रमाणें त्या स्वच्छ पाण्यांत प्रतिबिंबित झालीं होतीं. हें दृश्य पाहून बिंबा हळूच हसली. पण तिनें आपलें डोकें दूर केलें नाहीं. तें प्रतिबिंबरूप चित्र पाहात बसणें तिला प्रिय वाटलें असावें. ती म्हणाली, "असले आरसे फोडले तर ते भरून द्यावे लागत नाहींत कांहीं जम्बु. एका जागीं दुसरा आरसा आधींच तयार असतो. शिवाय हा आरसा फुटला तर त्याच्या कांचा पायांत शिरून रक्त काढीत नाहींत."

" वा ! असं कसं होईल ? हा आरसा फोडला तर भरून द्यावा लागत नाहीं हें खरें. पण त्याच्या कांचा पायांत न शिरल्या तरी मनांत शिरून रक्त काढतात ना ! तुम्हीं मगाशीं खडा मारून जो आरसा फोडला त्याचे तुकडे माझ्या तर हृदयांत शिरले. फक्त तिथं त्यांनीं काढलेलं रक्त तुम्हाला दाखवायला मजजवळ साधन नाहीं इतकंच. "

इतकें संभाषण होईपर्यंत तळ्याचें पाणी आणखी स्थिर झालें. फिरून तीं दोघें आपलें प्रतिबिंब पाण्यांत पाहूं लागलीं. मात्र या खेपेला जम्बुचें मस्तक बिंबाच्या मस्तकाजवळ पूर्वींहून आणखी थोडें झुकलें होतें. तें पाहून बिंबा म्हणाली, " मगाचच्या तसबिरींत आणि आतांच्या तसबिरींत थोडा फरक पडला आहे, नाहीं जंबु ? "

" हां, शरीरांच्या ठेवणींत फरक पडला आहे खरा. मनांत चलबिचल झाली म्हणजे शरीरांच्या ठेवणींत असा फरक पडणारच. पण शरिरांची चलबिचल दिसून पडते तशी मनांची दिसून पडत नाहीं इतकेंच. "

फिरून बिंबा हसत हसत आणखी एक खडा पाण्यांत टाकून म्हणाली, " हा पाहा मीं पुनः आरसा फोडला. "

जंबूनें हें निमित्त घेऊन रागाचें नाटक केलें. त्यानें आपल्या उजव्या हातानें बिंबाच्या अंगापलीकडील तिचा उजवा हात मनगटाशीं धरला आणि म्हणाला, " बिंबाताई, तुमच्या या घातक पोरखेळांना थांबवायला तुमचे गालगुच्चे घेईल असा अधिकारी मनुष्य कुणी या ठिकाणीं नाहीं असं मीं मगाशीं म्हटलं. पण निदान तुमचा हात धरून तुमचा खेळ अडविण्याचा अधिकार असलेला हा पाहा मी इथं आहें. "

" इश्श ! हा अधिकार तुम्हांला कसा येतो जंबू ? "

" कां बरं ? खडा मारून जो आरसा तुम्हीं फोडला त्यावर उमटलेलें चित्र कांहीं तुमच्या एकट्याचं नव्हतं. तुमचं माझं मिळून सजोड होतं. त्यावर तुमची माझी सामाईक मालकी होती. म्हणून तें चित्र नासणारा हात धरण्याचा अधिकार मला आहेच. मगाशीं तुम्ही मोटार चालवीत होता त्यानं चाक भलतीकडं फिरे. तेव्हां तें सरळ करण्याकरितां मी तुमचा हात धरून वळवीत होतों, तेव्हां नाहीं विचारलात तो माझा अधिकार तुमचा हात धरण्याचा ? अपघात थांबविण्याकरितां एका माणसाला दुसऱ्याचा हात धरायचा अधिकार कायदाहि देतो आणि तो अपघात जस मोटारीच्या प्रवाससुखाला तसाच खडे फेकून होणारा अपघात तुमच्यामाझ्या चित्रदर्शनसुखाला. "

बिंबा मोठ्यानं हंसून म्हणाली, " एकूण एखाद्या गोसाव्याला मोटार चालवितां येते, तसं त्याला कायद्याचंहि ज्ञान असतं म्हणायचं ? "

अशा रीतीनें मोटार चालविण्याची गोष्ट पुन: निघाली तेव्हां ' तुम्ही मोटार चालवायला कुठें शिकला ? ' हा पूर्वीचा प्रश्न बिंबानें जंबूला फिरून टाकला. जंबूला ती आयत्या वेळची तोंडी परीक्षाच वाटली.

जंबु म्हणाला, " बिंबाताई, मी दिसतों तसा खरा गोसावी नसेन हें अनुमान तुम्हीं बरेंच लवकर केलं म्हणायचं. "

" हो तर ! जिन्याच्या पायऱ्या एकामागून एक क्रमानं न चढतां-उतरतां दोन टाकून चढण्याची उतरण्याची विद्या मी लहानपणापासून शिकले

आहें. अनुमान करायचं झालं तरी तो एक जिनाच नव्हे का चढा-उतरायचा ? ”

“ अरे हो ! पण बालपणच्या विद्येंत नुसत्या एक-दोन पायऱ्या टाकून चढाय-उतरायचं शिकलां तसं जिन्याच्या कठड्यावरून एकदम खालीं घसरण्यालाहि शिकला असालच. ”

बिंबा हंसून म्हणाली, “ होय, जंबु ! घाई गडबड असली म्हणजे मी तसाहि जिना उतरतेंच कीं अजून. ”

“ ठीक आहे. मनुष्याच्या जीवनांतदेखील एखाद वेळीं अशी घाई होतेच कीं ! तेव्हां त्याला पायऱ्या क्रमानं उतरण्यापेक्षा कठड्यावरून घसरणंच सोयीचं व सुखाचं असतं, नव्हे का ? ”

“ पण त्यांत थोडा धोका असतो हां जंबू एखाद वेळीं जोरांत खालीं येऊन आपटी बसण्याचा. ”

“ बरोबर बोलला बिंबाताई ! पण असे धोके जीवनाच्या हूडपणांत न पत्करायचे तर मग काय म्हातारपणीं ? ”

“ बरं, पण तुम्हीं गोसावी नसाल असं अनुमान मीं केलं तें जर खरं ठरलं, तर मग तुम्ही कोण हें सांगायचं प्राप्तच झालं तुम्हांला. ”

“ मग त्याला काय हरकत ? सांगतों ऐका. मी कमलगड नांवाच्या संस्थानचा एक जहागिरदार व इनामदार आहें. ”

“ मग हें गोसावीपण कुठून जडलं तुम्हाला ? ”

“ तेंहि सांगतों. माझ्या आईबापांच्या पोटीं आलेलीं माझ्या आधींचीं ओळीनं पांच भावंड मृत्यु पावलीं. मूल तीन वर्षांचं व्हावं आणि तें अकस्मात् एकदम दगावावं असा क्रम सुरू झाला. तेव्हां एका देवऋषीनं आईला सांगितलं कीं, यापुढं मूल होईल त्याला गोसावी करीन असा नवस करा म्हणजे मूल वाचेल. तिनं असं पाहिलं कीं, गोसावी का असेना, मुलगा डोळ्यापुढं जिवंत दिसेल. झाला गोसावी तर गोसावी, पण मुलगाच ! ”

“ बरं मग ? ”

“ मग आईला मी झालों ! तेव्हां आईला संकट पडलं. मुलाला

कोणत्या वयांत गोसावी कसा करावा ? तो गोसावी करायचा म्हणजें त्याला शिष्याची दीक्षा देणारा गुरु पाहिजे आणि मग तो शिष्याला बरोबर वागविणार, हिंडवणार, यात्रा–प्रवासाला नेणार ! तेव्हां आईनं परत त्या देवऋषीला जाऊन विचारलं. तेव्हां त्यानं नवस फेडण्यांत सवलती असतात त्या सांगितल्या. तो देवऋषी म्हणाला, ' हा नवस फेडायला ठरीव मुदत नाहीं. शिवाय अज्ञान मुलाला गोसावी करण्याचा अधिकार आईबापांनाहि नसतो. म्हणून मुलगा सज्ञान एकवीस वर्षांचा झाल्यावर त्याला नवस समजावून सांगावा. म्हणजे तो आपल्या इच्छेनें तुमचा नवस फेडण्याकरितां, आणि देवाचा राग स्वत:वर होऊं नये म्हणून केवळ आत्महिताकरितांहि कांहीं दिवस गोसाव्याची दीक्षा घेईल. ' त्याप्रमाणं माझ्या आईनं फिरून संकल्प सोडला आणि मी एकवीस वर्षांचा झाल्यावर आपल्या इच्छेनं या गुरुमहाराजांकडून गोसाव्याची दीक्षा घेतली व मेलेल्या आईला नवसमुक्त केलं. "

" अगबाई, मग तुम्ही जन्मभर असे गोसावीच राहणार कीं काय ? " बिंबाच्या प्रश्नांत थोडा विनोद पण त्याबरोबर थोडा जिव्हाळाहि दिसून आला.

जंबु म्हणाला, " छे: छे:, मीं आज दोन वर्षं गोसाव्याचं व्रत पाळल्यावर नवसाचं बंधन यापुढं उरत नाहीं. आतां माझं मलाच हें गोसाव्याचं जीवन आवडूं लागून मी जन्मभर ब्रह्मचारी उदासी राहिलों तर मला नको कोण म्हणणार ? "

" कां बरं ? आणि तुमचे आईबाप ? "

" दुर्दैवानं माझे वडिल माझ्या आठव्या वर्षीं वारले आणि आई माझ्या बाविसाव्या वर्षीं म्हणजे मीं ही दीक्षा घेतल्यावर एक वर्षानं वारली. "

" आणि तुमची जहागीर जमीनदारी यांचं काय होतं ? "

" आहेत आमचे वंशपरंपरागत दिवाणजी. ते पुष्कळ वसूल व थोडा खर्च करून चांगली शिल्लक साठवून ठेवीत असतात. माझ्या नांवची बँकेंत

आज सुमारें साठ हजार इतकी रक्कम असावी. गोसाव्याच्या दीक्षेचं विसर्जन करीपर्यंत मी संसारांत नाहीं असं मनानं समजण्याचा माझा निश्चय आहे. एरवीं दीक्षेचा प्रामाणिकपणा तो कसला ? आतां गोसाव्या-बैराग्यांतहि कांहीं प्रकार आहेत. ”

“ ते कसले ? ”

“ कांहीं बैरागी असतात; पण प्रवृत्ति-मार्गी. ते सगळा संसार करतात, फक्त लग्न करीत नाहींत. शिष्य दत्तक घेतात आणि अशी परंपरा चालवितात. ”

“ हें काय बाई ? लग्न न करतां संसार ? ”

“ हो, त्यांत काय झालं ? शिष्य हा जहागिरीचा धनी राहतो. औरस मुलाला खाजगी इस्टेट मिळते. आमचा हिंदु धर्म मोठा सोईचा आहे. त्यांत सगळं कांहीं साच्यांतल्याप्रमाणं ठीक बसतं. असो. एकवीस वर्षांपर्यंत मीं गोसाव्याची दीक्षा घेण्याचा प्रश्नच नव्हता. तेव्हां ती मरेपर्यंत माझ्या आईनं मला सर्व प्रकारचं संसारसुख देववून आपली व माझी हौस पुरवून घेतली ! आणि आतां ओघालाच आलं म्हणून सांगतों बिंबाताई, कीं मोटार चालवायला शिकलों मी ती लोकांच्या नव्हे तर स्वतःच्या मोटारीवर, माझ्या पदरच्या पगारी हुषार मोटार ड्रायव्हरच्या शिकवणीनं. अलीकडं दोन वर्षांत माझी मोटार गंजून गेली असेल याचं मात्र वाईट वाटतं. ”

“ बरं, तुमच्या आईनं तुम्हांला सगळीं संसारसुखें देवाविलीं; मग तुमचं लग्न तेवढं कां करून दिलं नाहीं ? आणि आपली हौस फेडून घेतली नाहीं ?”

“ कसा वेडयासारखा प्रश्न विचारलात बिंबाताई ! माझं लग्न करून दिल्यावर माझी बायको बरी मला गोसावी होऊं देईल ? बरं,एकवीस बावीस वर्षांचं वय म्हणजे कांहीं लग्नाला फार झालं होतं असं नाहीं. बायकोच्या प्रेमामुळं मी गोसावी होण्याचं नाकारलं असतं किंवा लांबणीवर टाकलं असतं तर देवाच्या शापाची भीति वाटून माझ्या आईला जन्म काढावा लागता. म्हणून मींच लग्नाच्या विचाराला आपण होऊन मोडता घातला.”

“ आणि आतां आई वारली तुमची. मग बैराग्याची दीक्षा विसर्जन

करून फिरून संसारांत पडा असें तुम्हांला म्हणायला कोणं आहे या जगांत ? ”

“ कोण केव्हां भेटेल तेव्हां पाहतां येईल ! आई तर निर्भय राहून व कृतकृत्य होऊन मेली. आतां माझा मी धनी आहें. दीक्षेचा नवस फिटण्याची मुदत निश्चित नाहीं. मी जी मुदत माझ्या मनानं ठरवीन ती खरी. त्यांत देवाचा अपराध घडला तर काय होईल त्याला मी आहें अन् देव आहे. पाहून घेऊं. मींहि मनानं ठरविलं आहे कीं, संसारांत पडावं अशी इच्छा होण्यासारखं माणूस भेटलं तरच त्या फंदांत पडायचं; नाहीं तर आहे हें जीवनहि बरंच आहे. पहा ना, आजच गुरुजींच्या सान्निध्यांत तुमच्या घरीं मला काय कमी आहे ? बोला बिंबाताई, मी म्हणतों तें हिशेबी आहे कीं नाहीं ? ”

“ पण एक विचारतें जंबू, सांगा. तें अगदीं खरं सांगा. ”

“ विचारा, अगदीं तुमच्या गळ्याशपथ खरं सांगेन. ”

असं म्हणून जंबूनं खरोखरच बिंबाच्या गळ्याला हात लावला. पण शपथ घ्यायला लागतो त्यापेक्षां पुष्कळच अधिक वेळ तो तेथें ठेवला. बिंबानींहि या धार्मिक आचरणाला हरकत घेतली नाहीं ! !

“ विचारायचं म्हणजे असं कीं, तुम्हांला खरोखरच का संसाराचा वीट आला आहे ? ”

जंबु खो खो हंसून म्हणाला, “ बिंबाताई, ज्या संसाराला मीं अजून प्रारंभ केला नाहीं त्याचा मला वीट आला असं मी प्रामाणिकपणं कसं म्हणेन ? मी हवी तेव्हां ही दीक्षा टाकून संसारांत पडायला तयार आहें. पण उष्टं खावं तर तें तुपासाठीं अशी म्हणच नाहीं का ? त्याप्रमाणं मनाजोगं स्त्रीरत्न लाभलं तर लग्न करावं; नाहीं तर वैराग्याचं ऐश्वर्य हातचं गेलं आणि संसाराचं ऐश्वर्य मनासारखं लाभलं नाहीं ! दोहोंकडून कोण फाजिती करून घेतो जन्माची ? नाहीं तर व्हायचं तुमच्या बंधुराजासारखं ! ”

इतकं बोलून होतं तोंच हीं दोघं बसलीं होतीं त्या झाडावर पोपटाचं एक जोडपं येऊन बसलं आणि त्यांनीं एकमेकांचीं अंग आपल्या

चोचीनं साफ करण्याला सुरवात केली. मधून मधून तीं आपल्या चोची एकमेकांवर घाशीतहि. तें पाहून बिंबा जंबुला म्हणाली, "संभाळा हो शिष्यमहाराज. नाहींतर होईल आमच्या बंधुराजासारखं! एखादा दगड वर फेकाल."

"मला दगड फेकायची खोड नाहीं तुमच्यासारखी! पण समजा फेकला तर काय होईल?"

"मग त्यांतला एखादा पक्षी मरून पडेल."

"होय मरून पडला. मग काय होईल?"

"मग तुम्हीं हिंसा केली म्हणून रागावून मी तुम्हांला शाप देईन."

"पण शाप देणारा गोसावी लागतो. बरं, शाप काय द्याल मला?"

"ईश्वर तुम्हाला पाहून घेईल असं म्हणेन."

"तसं म्हटल्यावर मग काय होईल?"

"मग तुम्हाला वैराग्य येईल. तुम्ही आपल्या जहागिरीवर इनामदारीवर पाणी सोडाल. नोकरीचा राजीनामा द्याल आणि आजन्म ब्रह्मचारी राहण्याची प्रतिज्ञा कराल!"

"छत्, नांवसुद्धा काढूं नका त्या गोष्टीचं. मी तुमच्या बंधुराजासारखा कच्च्या दिलाचा नाहीं, आणि त्याचं म्हणजे चंदुलालचं तरी हें वैराग्य किती दिवस टिकेल तें तुम्हीच पाहाल! मी वैराग्याची माझी पाळी पेलून आतां संसाराला पात्र झालों आहें आणि उपोषण केल्यानंतर जशी पारण्याला कडकडून भूक लागते, तशी संसाराची क्षुधा मला आतां लागली आहे. त्याचं हेंच पहा प्रत्यंतर!"

असें म्हणून जंबूनें बिंबाच्या कमरेभोंवतीं हात घालून तिला आपणाजवळ ओढली आणि तळ्याचें पाणी निश्चल व शांत होतें त्याकडे पाहून तो म्हणाला, "बिंबाताई, हें बिंबप्रतिबिंबाचं चित्र यापुढं आरशावर अस्सं निश्चल राहणार! तो आरसा फोडणारा हा तुझा खोडकर हात बिंबा, मी अस्सा घट्ट धरून ठेवीन. तो सोडवून तर पहा सुटतो का!"

असें म्हणून त्यानं बिंबेच्या कमरेला विळखा घालणाऱ्या आपल्या उजव्या

हातानें तिचा उजवा हात घट्ट धरून ठेवला. बिम्बा पाण्याकडे पाहात निश्चल राहिली. तिच्या डोळ्यांतून आनंदाचे अश्रू ( किती ? दोन ना ! ) निघाले ते तळ्याच्या पाण्यांत पडले. पण अशा अश्रूंनीं तो आरसा मलिन कसा होईल ?

जंबूनें बिंबेच्या कानाशीं तोंड नेऊन तिला काय सांगितलें कुणाला ठाऊक ? पण तिनें नकारार्थीं मान हलविली नाहीं.

बिंबा भीति दाखवून म्हणाली, " इश्श ! किती वेळ आपण घराबाहेर राहिलों आहों आज ? बाबा आई काय म्हणतील ? "

" होय आणि तुझ्या दादालाहि तूर्त तरी मला भ्यायला हवं ! पण बिंबा, ही कोंडी आपणाला लवकरच फोडली पाहिजे. वाटेंत जाता जातां मी तुला थोडं कांहीं सांगेनच. पण पुनः एकदां अशीच संधि साधून आपणाला पुढचे सर्व बेत ठरवितां येतील. "

दोघेहि उठून परत मोटारीशीं आलीं. बिचारा माळी मोटारीच्या पायरीवर डोकें टेकून झोपीं गेला होता. बिंबेची हाक ऐकून तो खडबडून जागा झाला. दोघेहि मोटारींत बसलीं. मोटार सुरू झाली असं पाहून माळी रामराम करून म्हणाला, " पण ताईसाब ! आज फुलं अन फळं ? "

बिंबा लाजून खालीं पाहूं लागली. जबु मात्र आनंदानं मोठ्यानं म्हणाला, " अरे वेड्या, आतां फुलाफळांना काय कमी ? "



## चंदूची व मेरीची पहिली भेट : : १७

विलायतेंत असतांना शेवटच्या वर्षीं मेरी वोडहाऊसशीं जडलेली आपली मैत्री चंदुनें इकडे कोणास कळूं दिली नव्हती. शरयूशीं कमी कमी होत जाणाऱ्या पत्रव्यवहारावरून चंदु एखाद्या आंग्ल तरुणीच्या प्रेमपाशांत सापडला असावा अशी शंका शरयू व तिच्या विश्वासांतल्या चार दोन मुलीं- यांना आली होती. पण त्याचा पत्तामुद्दा त्यांना कांहींच माहीत नव्हता.

चंदूला हिंदुस्थानांत येऊन फार थोडे दिवस झाले होते. यामुळें विलायतेंत त्याचा पत्रव्यवहार कोणाशीं किती चालतो हें कळून येण्याला किंवा बाहेर फुटायला फारसा अवधि गेला नव्हता. विलायतेहून आल्याच्या थोड्या दिवसांत जे शेकडों पौंड चंदूनें तिकडे पाठविले त्याची बातमी सर गंगाराम यांना कळण्याचें कारण नव्हतें. कारण स्वतः चंदूच्या खात्यावर बँकेंत हजारों रुपये होते. त्याची परीक्षा झाल्यावर लग्नाची गडबड सुरू होण्याच्या वेळीं त्याच्या आग्लप्रणयाची बातमी बाहेर फुटायची व ती फुटली म्हणजे जो काय स्फोट होणार तो झाला असता. पण त्याआधींच मेरी वोडहाऊस मेल्याची तार येऊन सगळें गाडें उलथेंच्या पालथें होऊन बसलें होतें. यामुळें डॉ. जालंदर, इन्स्पेक्टर बन्सीधर, व मासाहेब यांच्याशिवाय ती बातमी कुणालाहि माहीत नव्हती. सर गंगाराम यांच्या कानावर ती पुढें केव्हां तरी जाणार होती आणि सर्वांतर्शांनी गुरुमहाराजांना तर त्या घटनेची कांहीं म्हणजे कांहींच माहिती किंवा कल्पना नव्हती. चंदु त्यांच्याशीं बोलण्यांत या गोष्टी कशाला काढील ?

तथापि मेरीच्या व चंदूच्या प्रेमसंबंधाची माहिती आमच्या वाचकांना देण्याची वेळ आली आहे म्हणून ती देतों.

विलायतेंतली सामान्य रीत प्रसिद्धच आहे. कुटुंबवत्सल नसलेला कोणीहि स्त्रीपुरुष फार तर एखादी खोली भाड्यानें घेऊन राहतो. पण त्या खोलींत रात्रीं निजण्याखेरीज त्याची वस्ती पडत नाहीं. खोलीच्या भाड्यांत निजण्याबसण्यापुरती खोली आणि सकाळचा चहा इतक्याचाच समावेश बहुधा असतो. स्वतंत्र आंघोळीची अशी जागा नसते. म्हणून सकाळीं उठून दंतधावनादि विधी करून चहा व रोटी घेऊन एकदां कपडे घातले म्हणजे तेच सर्व दिवसभर अंगावर असावयाचे. दिवसाचे दोन फराळ व रात्रीचें जेवण बहुधा बाहेर उपाहारगृहांत भोजनगृहांत व्हावयाचें. कामाचा वेळ कचेरींत किंवा ग्रंथालयांत आणि संध्याकाळचा रिकामा वेळ बगीचे, उद्यानें, सिनेमे, नाटकगृहें यांत जावयाचा. कोणी दोघा स्नेह्यांना एकमेकांना पाहुणचाराप्रीत्यर्थ चहाला, फराळाला, जेवणाला बोलवावयाचें झालें तरी ती सर्व

व्यवस्था बाहेरच्या बाहेर परस्पर उपहारगृहांत करतां येते. यामुळें स्नेही स्नेही झाले तरी, व पत्रापुरता पत्ता माहीत असला तरी, एकमेकांनीं एकमेकांच्या राहण्या-निजण्याच्या जागा वर्षानुवर्ष समक्ष पाहिल्या नाहींत असें होऊं शकतें. टपाल व टेलिफोन हीं विचारविनिमयाचीं साधनें, उपहारगृहें व सार्वजनिक उद्यानें या भेटण्याच्या जागा, असाच पुष्कळसा व्यवहार चालतो. दोन्ही स्नेही कुटुंबवत्सलच असले तर गोष्ट वेगळी; पण सडीं माणसं श्रीमंत असलीं तरी त्यांचा सहवास बहुधा वर सांगितल्या रीतीनेंच भागतो.

त्याच्या विलायतेंतल्या चार वर्षांच्या मुक्कामापैकीं शेवटच्या वर्षीं मेरी वोडहाऊसची व चंदुलालची गांठ आकास्मिक रीतीनें पडली. तो प्रकार असाः——लंडनचें एक उपनगर हॅम्पस्टेड म्हणून आहे. त्याच्या कांहीं भागांत वस्तीचीं घरें आहेत. तरी त्या वस्तीला लागून विस्तीर्ण माळरान सुरू होतें. तें पुढें मैलच्या मैल पसरलेलें आहे. त्याला हीथ म्हणतात. हीथ याचा अर्थ गवताचें व खुरट्या झुडपाचें पडीत रान व मैदान.

या विस्तीर्ण मोकळ्या जागेंत वर्षांतून एक दोन वेळ जत्रा भरते. ही जत्रा कोणत्याहि एका देवाला उद्देशून नसते. पण ती इतर रीतींनीं आपल्या इकडच्या जत्रेसारखीच असते. म्हणजे तेथें मोठा बाजार भरतो. पालें-राहुट्या देऊन किंवा उघड्या जागेंतहि शेकडों दुकानें लहानमोठीं तात्पुरतीं उघडलेलीं असतात. त्यांत जितकीं विकाऊ मालाचीं तितकींच खाद्य पेयांचीं असतात. दुकानाप्रमाणें सर्व प्रकारच्या खेळांचे-क्रीडांचे मांडव उभारण्यांत येतात. चित्रप्रदर्शनें असतात. तात्पर्य, चार दोन तास करमणूक करण्याचा एक ठरीव प्रसंग या निमित्तानें या जत्रेला हजारों लोक येतात. त्यांत कुटुंबवत्सल लोक घरचीं बायकामुलें घेऊन जातात. पण सडे स्त्री-पुरुषहि शेकडों जातात. त्यांचा हेतू स्वतःच्या करमणुकीपेक्षांहि इतर लोक आपली करमणूक कशी करून घेतात हें पाहण्याचा असतो. कारण स्वतःच्या करमणुकीइतकाच आनंद इतरांच्या करमणुकीचे प्रकार मार्मिकपणानें पाहण्यांत

होतो. चंदूची त्या वर्षं विभागांतील टर्म संपलेली असून तो एकटाच रिकामा म्हणून हॅम्पस्टेड हीथवरील ही जत्रा पहावयाला गेला होता.

त्यानें खरेदी अशी कांहींच केली नाहीं. पण एका स्वच्छ उपाहारगृहांत थोडा फराळ केला. एका करमणुकीच्या मंडपांत बांगड्या फेकण्यांत अपयश मिळवून चार शिलिंग गमावले. एका विकृत आरशाच्या दुकानांत जाऊन एकच चेहरा दहा रीतींनीं कुरूप कसा दिसतो हें पाहिलें. दोन शिलिंगाच्या चाकोलेटचें बक्षीस ठेऊन दहापांच उनाड मुलांची शर्यत लावली. राक्षसाचीं सोंगें घेऊन उंच काठ्यावर उभे राहून चालणाऱ्या खेळियांच्या तंगड्यांतून मार न खातां जाण्याचा विक्रम केला. पडसाद उमटविणाऱ्या खोल तव्याच्या दुकानांत जाऊन प्रतिध्वनि-रूपानें आपण आपल्यालाच दहावीस शिव्या एक शिलिंग देऊन घेतल्या. इतकें झाल्यावर हस्तसामुद्रिकाचें प्रस्थ घालून एक म्हातारी जिप्सी स्त्री बसली होती तेथें तो गेला आणि क्रमानें स्वतःची पाळी आली तेव्हां तिच्या हातावर एक ' हाफ क्राऊन ' ठेऊन आपलें भविष्य समजून घेण्याकरितां चंदूनें हात पुढें केला.

अजूनहि युरोपांत अशीं भविष्यें सांगण्याचा धंदा जोरांत सुरू आहे आणि मोठीं शहरें सोडून बाहेरगांवीं कोणी गेला–विशेषतः खेडवळ भागांत गेला–म्हणजे भविष्यें सांगण्याचा मक्ता मिळालेल्या म्हाताऱ्या बाया ठिकठिकाणीं आढळतात. त्या एक प्रकारें आपल्या इकडील देवऋषिणीसारख्याच होत. त्यांचे पोषाक मोठे विचित्र असतात. तसेंच पाहणाराला अद्‌भुतपणा भासावा म्हणून त्यांनीं आपल्या दातांना काळें दांतवण लावलेलें असतें आणि केस पिंजारलेले असतात. चंदूच्या हातचा ' हाफ क्राऊन ' आपल्या तळहातावर पडल्याबरोबर तिनें आपली जादू भासविण्याला प्रारंभ केला. तिनें त्या नाण्याकडे तीक्ष्ण एकाग्र दृष्टीनें पाहिलें; जणु कांहीं चंदूच्या हातांतून आपल्या हातावर पडलेल्या त्या नाण्यांतच कांहीं भविष्याचीं गमकें तिला दिसलीं. तिनें तें नाणें आपल्या खिशांत घातलें. नंतर तपकिरीची एक चिमूट ओढली आणि भविष्य सांगण्याकरितां चंदूचा हात आपल्या हातीं

घेतला. या देवऋषिणी साधारणतः भविष्यें कोणत्या प्रकारचीं सांगतात व कोणत्या शब्दांनीं सांगतात हें लोकांना जवळजवळ पाठ झालेलें असतें.

पण चंदु हा हिंदी मनुष्य. त्याला ऑक्सफर्डचें इंग्रजी उत्तम फर्माशीचें लिहितां बोलतां येत असलें, तरी जिप्सी लोकांचें इंग्रजी येत नव्हतें. नाहीं तर पुस्तकांतील परिचयानें चंदुच एखादें भविष्य तिचें तिला बोलून दाखविता. तथापि जत्रेंत जाणारा मनुष्य आपली बुद्धि खिशांत घालून, दुसऱ्या कडून फसविले जाण्याची जाणती करमणूक करून घेण्याकरितांच जातो, व त्या करमणुकीकरितां सहज चार पैसेहि खुषीनें नासतो. जिप्सीनें तेव्हांच ओळखलें कीं हा तरुण मुलगा इंग्रज नाहीं. त्यानेंहि आज जत्रेला जाण्या-करितां म्हणून मुद्दामच हिंदी पोषाक केला होता. पाटलोणचच पण ती पायाशीं तंग बसणारी रजपुती थाटाची. अंगांत लांब शेरवाणी. डोक्याला साफा आणि गळ्याला नेकटॉय नसून रंगीत हातरुमाल गुंडाळलेला.

ती जिप्सी त्याचा हात पाहून प्रथम खूप मोठ्यानें हसली. पण लगेच दुःखाचें नाटक करून ती रडके हेल काढूं लागली. हें सुख व हें दुःख चंदूला ह्या वेळीं समानच होतें. हे दोनहि प्रकार पाहून तो हसतच होता. मग जिप्सीनें तोंड उघडून वक्तृत्वाचा सपाटा सुरू केला. थोडक्यांत त्याचें तात्पर्य असें होतें–लग्न करून तूं पूर्वपश्चिमचीं दोन खंडें एकजीव करशील. पण तो एकच सूर्य आभाळांत वावरत असला तरी पूर्वेला पूर्वच म्हणतात आणि पश्चिमेला पश्चिमच म्हणतात. तूं कमळाचा देठ म्हणून हातांत धरण्याला जाशील पण तो साप ठरेल. तुझी प्रियकरीण तुझी वाटच पाहात आहे आणि तूं या जत्रेंतून परत जाण्यापूर्वींच तुझी व तिची गांठ पडेल.

अशीं हीं भविष्यें म्हणजे म्हापणकरांची कितीहि मोठी पट केली तरी कमीच पडणारीं असतात. हसत ऐकावीं. पण जाण्याला पुढें पाऊल टाकलें कीं विसरावीं. चंदूनें म्हातारीची कुचेष्टा करण्याकरितां आपण होऊन एक प्रश्न तिला केला--" मला विद्येचें साम्राज्य हवें आहे, तें कधीं मिळेल ? "

ती म्हणाली, " शहाणपणाची बढाई मारूं नको. लोकांकडून मूर्ख म्हणवून घेतां घेतां तुला पुरें वाट होईल." हेंहि छापील भविष्यांतच जमा.

मग अडीच शिलिंगाची ही करमणूक पुरेशी वाटून चंदु म्हातारीला सलाम करून पुढें निघाला. इकडे-तिकडे पाहून झाल्यावर तो एका उघड्या जागेवर चढते-उतरते पाळणे होते तेथें गेला. पाळणे सुमारें आठ होते. प्रत्येकांत दोनच माणसें बसतील इतकी जागा होती. एक पाळणा भरला म्हणजे तो वर चढवून उभा करावा, व आठहि भरले म्हणजे मग एका चाकाचा दांडा हातीं घेऊन चार गड्यांनीं, चरबी लावून गुळगुळीत केलेल्या कण्यावर, तो फिरवावा असा तो करमणुकीचा प्रकार होता. चंदूपुढें आलेला पाळणा नंबर दोनचा असून त्यांत एक तरुण मुलगी आधींच तिकीट घेऊन बसली होती आणि येतील त्या क्रमानें माणसें पाळण्यांत बसवावयाची असतात; तेथें ओळखीदेखीचा प्रश्न नसतो. म्हणून पाळण्याच्या मालकानें चंदूला तिकीट देऊन त्या मुलीशेजारीं बसविलें. मग पाळणा वर चढविण्यात आला. पण बाकीचे सहा पाळणे असेच भरल्याशिवाय चाक फिरणार नव्हतें. तेव्हां स्वस्थपणाची थोडी अवधि मिळाली. चंदूचें रूप व विशेषतः हिंदी तऱ्हेचा पोषाख हीं दोनहि फारच सुंदर व चित्ताकर्षक होतीं. त्याकडे बराच वेळ दृष्टि रोखून ती मुलगी आश्चर्यानें व कौतुकानें पहात होती. ओळख नसतांना आपण होऊन बोलणें ही विलायती रीत नाहीं, आणि विलायतेंत कोणचीहि विलायती रीत स्वतः विलायती लोकांपेक्षां हिंदी लोकांनींच अधिक पाळावी लागते. कारण हातून चूक घडून हास्यास्पद होण्याची भीति असते. त्यांतून तरुण मुलीशीं तर परपुरुषानें आपण होऊन बोलणें हें धाडसच ठरावयाचें. तिला तो भलेपणा वाटला तर ठीक. उलट तिला तो उपमर्द वाटला तर हा काय करणार ? पण त्या तरुण मुलीनें चंदूची ही अडचण स्वतःच काढून टाकली. तिनेंच चंदूशीं बोलण्याला प्रारंभ केला–

" मी विचारूं कां ? तुम्ही इंग्रज दिसत नाहीं ! "

" होय, मी हिंदुस्थानांतून आलों आहें. "

" हिंदुस्थानांतले सर्व लोक असेच तुमच्यासारखे तरुण आणि असाच पोषाक केलेले असतात काय ? "

चंदूला या प्रश्नाचें हसूं आल्यावांचून कसें राहील !

तो म्हणाला, "हिंदुस्थानांत तारुण्यावस्थेंत असतात तेच तरुण असतात, आणि पोषाख इतके निरनिराळ्या प्रकारचे असतात कीं त्यांनीं एखादें पदार्थसंग्रहालय भरेल."

"तुम्ही कोणत्या संस्थानाचे राजपुत्र आहां ?"

"माझें संस्थान नाहीं व मी राजपुत्रहि नाहीं. फक्त बऱ्या प्रतीचा एक सुखवस्तु आहें."

"मग इकडे काय देशपर्यटनाला आलां ?"

"नाहीं; तो आनंद मीं प्रौढ वयाकरितां राखून ठेवला आहे. मनुष्यानें तरुण वयांत विद्याच मिळवावी, नव्हे काय ?"

"मग तुमच्या स्वतःच्या देशांत विद्येला काय कमी ? परवां प्रो. मॅक्स्-म्यूलरचें पुस्तक हातात पडलें. त्यांतली तुमच्या देशाची स्तुति वाचून वाटलें कीं, सगळ्या मनुष्यजातीला देव हिंदुस्थानांतच जन्माला कां घालीत नाहीं ?

"अबब ! आणि सगळी मनुष्यजात हिंदुस्थानांतच देवानं जन्माला घातली तर हिंदुस्थानात कोण गर्दी होईल ! आणि हा तुमचा सुंदर देश ओसाड पडेल याची वाट ?"

"आमचा देश तुम्हाला सुंदर वाटतो का ?"

"हो, वाटतो तर !"

"कोणच्या दृष्टींनीं ?"

"देखाव्याच्या दृष्टीनं आणि माणसांच्याहि दृष्टीनं."

"पण तुम्हांला पाहून मला तर वाटतं कीं, इंग्लंडपेक्षां हिंदुस्थानांतलीं माणसंच अधिक सुंदर ठरतील."

"तें मी कसं म्हणूं ? हें दृष्टीच्या औदार्यावर अवलंबून आहे. पण शरीर-सौंदर्याची तुलना करण्याच्या भानगडींत न पडतां मी एवढें खास म्हणेन कीं, तुमच्या इंग्लंडांत हिंदुस्थानापेक्षां विद्या अधिक चांगली आहे आणि विद्या हेंच मनाचें खरें सौंदर्य नव्हे काय ? तुमच्या देशाला दुतर्फी सौंदर्य असल्या-मुळें वरचा नंबर कोणीहि देईल."

" परक्यांनीं परक्याची स्तुति करावी ही जगांत भलेपणाची रीतच आहे. पण तुमच्या देशांत तुम्हांला मिळणार नाहीं अशी कोणती विद्या मिळविण्याला तुम्ही येथें आला ? "

" मी ऑक्सफर्ड विद्यापीठांतला कार्यक्रम घेऊन एम्.ए. होणार. लंडनमधील कायद्याच्या अभ्यासाचा कार्यक्रम घेऊन बॅरिस्टर होणार आणि आय्. सी. एस्. परीक्षा देऊन हिंदुस्थानांत जाऊन नोकरी करणार. "

" आणि इतकी सगळी विद्या तुमच्या या लहानशा डोक्यांत मावणार ?"

" कां नाहीं ? तुमचं इंग्लंड हिंदुस्थानपेक्षां कितीतरी लहान ! त्यांत हिंदुस्थानापेक्षां शतपट अधिक विद्या व संपत्ति कशी मावते ? "

" ठीक आहे. विलायतेंत आहांत तोंपर्यंत आमची स्तुति कराल आणि तिकडे गेल्यावर इंग्लंडला विसरून जाल. "

" रम्य आठवण विसरेल तो मनुष्य काय ? आणि कृतज्ञतेमुळेंहि मला इंग्लंडची आठवण विसरूं म्हटलें तर विसरवणार नाहीं. म्हण आहे कीं, 'आठवणीला गोमेसारखे शंभर पाय असतात. एखादा तुटल्यानें तिचें कांहीं कमी होत नाहीं.' "

" मग इंग्लंडच्या आठवणीच्या गोमेचे तुमचे किती पाय जोडून झाले ? जुडण्याचे कांहीं अजून शिल्लक असतीलच ! "

" हे पाय मनुष्य जोडूं म्हणेल तर जुडतात असें नाहीं. उलट जुडलेले पाय कोणीही तोडूं म्हणेल तर तुटतहि नाहींत.ईश्वराची करणीच अशी आहे कीं, चालण्याला जे पाय उपयोगी पडतात तेच बंधनाची वेळ आली म्हणजे पाश होतात ! "

या दोघांचें हें बोलणें होतें तों बाकीचे सगळे पाळणे भरले आणि चक्र फिरूं लागण्याची शिटी वाजली.

ती मुलगी म्हणाली, " अशा पाळण्यांत बसायला तुम्ही सराईत झाला असाल ! "

" होय; आणि तुम्ही ? "

" माझी तर पाळण्यांत बसायची ही पहिलीच खेप आहे. देवाचं नांव घेऊन गमतीखातर बसलें आहे झालं ! "

" आणि भोवळ-बिवळ आली तर ? "

" भोवळ आलेलं मनुष्य जवळ सांपडेल त्याचाच आधार घेतं, तसा मी घेईन. "

" मग तो तुम्ही घ्यावा म्हणून तुम्हांला भोवळ यावी अशी प्रार्थनाच मला करावी लागेल. "

ती मुलगी हसून म्हणाली, " मनच स्वतः करतं; पण तें ईश्वरप्रार्थनेचं फल म्हणण्याची लबाड माणसाची रीतच असते. "

झालं ! पाळणे सुरू झाले ! वाढत्या गतीनें फिरूं लागले. एकदां अस्मानांत जावें, एकदां जमीनीला टेकावें, असें बरेच झोके झाले. तेव्हां प्रकृतीच्या वैचित्र्याप्रमाणें कोणी मोठ्यानं हसूं लागले, कोणी खिदळूं लागले, कोणी झोक्याबरोबर ताल देऊन टाळ्या पिटूं लागले. पण कोणाला ही गति व वेग सहन न होऊन ते दुःखदर्शक आवाज काढूं लागले. तिसऱ्याच झोक्याला या तरुण मुलीनें डोळे मिटले, व चंदूच्या हातांत आपला हात घालून आपलें डोकें त्याच्या खांद्यावर टेकलें.

चंदु किंचित घाबरल्याच्या स्वरानें म्हणाला, "खरंच, तुम्हांला भोवळ आली कीं काय ? "

पण ती तसेच डोळे मिटून व हात ठेऊन म्हणाली, " आली खरीच. पण तुमच्या आधारावर निघून जाईल. पाळण्यांत आपल्या इच्छेनं बसेल त्यानं भोवळ पत्करायला तयार झालंच पाहिजे. " सातव्या झोक्याला हे बसलेल्या पाळण्याची दोरी किंचित करकरल्यासारखी वाजली आणि आठव्या झोक्याला तर जमिनीपासून सुमारें आठ फुटावर पाळणा येतांच चंदूच्या बाजूला ती तुटली. पाळणा एककली होऊन जमिनीला लागला आणि खालीं चंदु आणि त्याच्या अंगावर ती मुलगी अशी दोघेहि कोसंळली. पण सुदैवानें खालीं ओल्या गवताची जमीन असल्यामुळें कोणालाहि फारसें लागलें नाहीं.

पाळण्याचा मालक धांवत जवळ आला. त्यानें स्वतःला शिव्या घेऊन अपघाताचें दुःख प्रदर्शित केलें आणि खिशांतून दोन तिकिटांचे पैसे काढून तो ते चंदूच्या हातीं ठेवूं लागला. चंदूनें ते अर्थातच घेतले नाहीं. तो म्हणाला, " असले किरकोळ अपघात व्हायचेच. आठ झोके घेऊन व्हायची ती आमची हौस पुरी झाली. उलट इतरांना न मिळालेला आणखी हा एक नववा झोका मिळाला असंच मी म्हणेन. "

हें बोलत बोलत त्यानें त्या मुलीला सावरून धरून उभी केली. तिनें आतां डोळे उघडले होते. पण चंदूचा हात सोडला नव्हता आणि लहानशा अपघातांत जी भीति, पण त्याबरोबरच जी गंमत वाटते त्या संयोगानें भित्र्या डोळ्यानें ती हसत होती.

पाळण्याचा मालक म्हणाला, "बाई, मी तुमचा मोठा अपराधी आहें." लगेच त्यानें खिशांतली स्मेलिंग सॉल्टची बाटली काढून उघडून तिच्यापुढें धरली व म्हटलें, " पाळण्याची दोरी तुटली हें आज विशेष झालं. पण झोके घेणाऱ्या पुष्कळांकरितां या उत्तेजक वासाची बाटली मला नेहमीं खिशांत ठेवावीच लागते. "

त्या मुलीनें ती बाटली हातांत घेऊन स्वतः चार वेळां हुंगली आणि थट्टेनें चंदूच्याहि नाकाला लावली. त्याला तो दर्प सहन न होऊन त्याला शिंक आली. तो म्हणाला, " वा ! स्मेलिंग सॉल्ट हुंगायला मी काय बायको आहें ! "

ती मुलगी म्हणाली, " पुरुषी खंबीरपणाची ऐट मारूं नका. अशीहि वेळ येते कीं, पुरुषांचे डोळे स्त्रियांनीं आपल्या हातांनीं कोरडे करावे. "

चंदु हसून म्हणाला, " किंवा वेळीं ओलेहि करावे ! "

मग तीं दोघें परत निघालीं. परत कोठें जावें याचा कोणाच्याहि मनांत पूर्वीचा निश्चय झालेला नसावा. पण इतक्या या श्रमानंतर एखाद्या चहाच्या दुकानीं बसून विश्रांति घ्यावी हें ओघानेंच आलें. जवळच एक चांगलेंसें उपहारगृह पाहून तीं त्यांत जाऊन बसलीं. दोघांना हवे होते ते पदार्थ टेबलावर आले व बोलणें सुरू झालें.

ती मुलगी म्हणाली, " खरंच सांगतें कीं, त्या पाळण्यांत तुम्ही माझ्याबरोबर होतां म्हणून फार चांगलं झालं. "

" तें कसं ? "

" कारण मला भोवळ आल्यावर जवळच हाताचा आधार घ्यायला सांपडला. "

चंदु म्हणाला, " पण मी नसतों तरी पाळण्यांतली ती दुसरी जागा रिकामी राहिली नसती. "

" तें खरं. पण तिथं जें दुसरं कोणी बसलं असतं त्याचा आधार मीं घेतलाच असता असं मात्र नाहीं हो ! "

" तर काय केलं असततं ? "

" डावीकडे डोकं टेकलं तें उजवीकडे पाळण्याच्या लाकडावर टेकलं असतं. तारतम्य पाहणं हा मनुष्यधर्म नव्हे का ? "

इतकें झाल्यावर त्या दोघांनाहि एक अडचण सुचली. एकमेकांचीं नांवें कळल्याशिवाय भाषणव्यवहार अडचणीचा होतो. संबोधनाच्या आश्रया-शिवाय उठाव येत नाहीं. मिस्टर, मिस्, मिसेस कांहींतरी म्हणून नांवानें संबोधलें म्हणजे भाषणांत जोर येतो. दोघांनींहि खुल्या दिलानें आपापलीं नांवें सांगितलीं.

चंदु म्हणाला, " माझं नांव चंदूलाल गंगाराम वर्मा. राहणार सागर प्रांतांतील नवलपूर. " असे म्हणून त्यानें आपलें व्हिजिटिंग कार्ड तिच्या हातीं दिलें. पण लगेच तें मागें घेऊन फाऊंटन पेन काढून त्याने आपला ऑक्स्फर्डचा व लंडनचाहि पत्ता लिहिला व म्हणाला, " मी कारणपरत्वें दोहों ठिकाणीं राहतों. टेलिफोनच्या डिरेक्टरींत माझे नंबर तुम्हांला सांप-डतील. "

त्या मुलीनें आपलें नांव ' मेरी वोडहाऊस '.असें सांगितलें. पण तिज-जवळ छापील व्हिजिटिंग कार्ड तर नव्हतेंच; पण राहण्याचें ठिकाण सांग-तांनाहि ती बरीच घोटाळली. नक्की कोणता पत्ता सांगावा हें तिला कळेना. शेवटीं त्या गोंधळांतून निघण्याकरितां ती म्हणाली, " माझ्या नांवच्या

पत्रांची एक पेटी लंडनमधल्या मार्बल आर्चजवळील यंग वुईमेन्स ख्रिश्चन असोसिएशनच्या ऑफिसांत लावून ठेवली आहे. माझा असा टेलिफोनचा पत्ता नाहीं; पण वरील ठिकाणीं टेलिफोन केलात तर थोड्या उशिरा का होईना मला कोणीतरी कळवतील."

" मग तुम्ही नेहमीं लंडनला राहतां कीं नाहीं ? "

" नाहीं. मी लंडनमध्यें असतें तेव्हां या ख्रिश्चन असोसिएशनच्या एका सेक्रेटरीच्या जागीं माझी फार दूरची आत एल्. एन्. पेरी म्हणून राहते, तिच्याकडे मी असतें. पण लंडनबाहेर केंट परगण्यांत एका खेडेगांवीं माझ्या घरीं मी राहतें."

" त्या खेड्याचं नांव काय ? "

" नेव्हल पोर्ट हें गांवाचं नांव आणि माझ्या घराला ' मिऱ्याकल ' असें नाव आहे. "

चंदुला या दोन्ही शब्दांचा अर्थ कळत होता. पण आपल्या सोबतिणीला नवलपूर या शब्दाचा अर्थ कळण्याचा आनंद सेवन करतां येत नाहीं म्हणून तो म्हणाला—

" थांबा हो ! या नावावरून सादृश्याच्या काय गमती अकल्पित जुळल्या हें सांगतों. त्याची तुम्हांलाहि मौज वाटेल. तुमचं नांव मेरी व त्या शब्दाचें स्पेलिंग Mary याऐवजीं Merry असें कां न व्हावें ! आणि माझें नांव चंदुलाल त्याचाहि अर्थ ' Merry Maker ' असा होतो. तसेंच नेव्हलपोर्ट आणि नवलपोर या शब्दांत उच्चाराचें साम्य दिसतें कीं नाहीं ? तसेंच तुमच्या घराच्या नांवाच्या अर्थाचेंहि आहे. कारण मिऱ्याकल म्हणजे आश्चर्य किंवा चमत्कार, आणि नवलपूर या शब्दाचाहि अर्थ ' The Wonderful City ' असा आहे ! "

मेरी म्हणाली, " किती चमत्कारिक हा योगायोग ! "

नंतर लंडनला जाण्याकरितां तीं तळघरी ( ट्यूब ) आगगाडींत बसलीं आणि एका जंक्शनला उतरल्यावर दोघेहि आपापल्या ठिकाणीं जाण्याला निघाले. तेव्हां चंदु म्हणाला, "तुमच्या आमच्या परिचयाला किती प्रकारच्या

योगायोगांनीं प्रारंभ झाला हें पाहिलेंत ना ? म्हणून आतां पुढच्या गोष्टीहि योगायोगाच्या शब्दांनींच बोलाव्या हें बरें. म्हणून म्हणतों, तुमच्या आमच्या पुढील भेटीचा योगायोग केव्हां येण र ?

मेरी म्हणाली, "अशा सगळ्याच गोष्टींचा हवाला योगायोगावर देऊन भागत नसतं. मी आणखी १५ दिवस लंडनमध्यें आहें. तरी तुम्हीहि असाल आणि यं. वु. ख्रि. असोसिएशनच्या पत्त्यावर मला टेलिफोन कराल, तर हटकून हुकमी भेटतां येईल कीं !" असें म्हणून दोघेहि परस्पर हस्तांदोलन करून आपल्या वाटेनें गेलीं. यापुढें काय झाले असेल हें सांगून जागा कुणी अडवावी ?



## एका प्रेतावर भरलेली ज्यूरी : : : १८

आज नंदभुवनाच्या माडीवरच्या मधल्याच अशा एका मोठ्या खोलींत 'एका प्रेतावर ज्यूरी' भरली होती !

हें प्रेत दुसरें तिसरें कांहीं नसून चंदूच्या बुद्धिमत्तेचें होतें. या प्राण्याला मृत्यु आला तो कोठें, कसा खरोखर आला, त्याला कारण एखादा अपघात झाला, कीं ती आत्महत्त्या होती, कीं तिचा कोणी खून केला याची चौकशी या ज्यूरीपुढें सुरू होती.

ही ज्यूरी भरविण्यांत डॉ. जालंदर आणि इन्स्पेक्टर बन्सीधर यांनीं पुढाकार घेतला होता. आज चंदू गुरुमहाराजांना घेऊन मोटारींतून सागर तलावाजवळचा खासगी बगीचा दाखविण्याला गेला होता. तो चांगला एक प्रहरभर परत येण्याचा संभव नव्हता. विंबाहि बाहेर कोठें आपल्या मैत्रिणीकडे गेली होती. अशी निर्वेध वेळ पाहून ही ज्यूरी भरविण्यांत आली होती.

हा बेत आयत्या वेळीं ठरला तरी मासाहेबांना तो सांगतांच पसंत पडला. कारण चंदुच्या मनःस्थितीसंबंधानें त्यांचें डॉ. जालंदर व बन्सीधर यांच्याशीं मधून मधून बोलणें होत असे. चंदूला दोष देण्यांत तिघेहि

एकाच मताचीं होतीं आणि ते दोघे मिळून चंदूला परत शुद्धीवर आणण्याच्या कामीं आपणाला सहाय्य करताहेत असा भरंवसा मासाहेबाना वाटूं लागला होता.

या कामीं सर गंगारामसाहेब यांच्याशीं गोष्ट कशी काढावी हा मात्र थोडा अवघड प्रश्न असें सर्वांना वाटे. चंदूचीं कृत्यें सरसाहेबांना आवडत होतीं असें मुळींच नाहीं. पण त्यांनीं त्याला आपल्या दैवतासारखें मानलेलें असल्यामुळें तो करील तें करूं दे, आपण त्याच्या आड येऊं नये, त्याला दुखवूं नये, कालांतरानें त्याची मनोवृत्ति बदलण्याचा संभव आहे, हा विचार आणि ही आशा ते आपल्या मनाशीं धरून बसले होते. म्हणून मासाहेबाप्रमाणें सरसाहेबांनीं आपली गैरमर्जी अशी कधीं चंदूला भासूं दिली नव्हती. उलट ते आपल्या बायकोलाच म्हणत, 'अग, तूं त्याला कांहीं टाकून राग येईल असं बोलूं नको हो. चंदू कोवळ्या मनाचा आहे. त्याच्या जिव्हाळीला आमच्या कुणाच्या बोलण्याची धार लागली तर आणखी अधिकच विपरीत परिणाम व्हायचा. त्यानं सर्वतोपरीं माझी निराशा केली आणि स्वतःचा सत्यानाश केला हें मला कळतं. पण करायचं काय? तो घरच्या घरीं आपल्या संगतींत आपल्या डोळ्यासमोर तरी आहे. हो, कारण वैतागानं अंगाला राख फासून स्वतःच उठून कुठं तरी हिमालयांत गेला असता तर आपण काय केलं असतं? त्यापेक्षां गुरु करण्यावर आणि घरच्या घरीं मठ बनविण्यावर भागलं हें भाग्य समज.'

ते म्हणत, 'यांतून चंदूला बाहेर काढायचा उपाय जर कुणी मला सांगेल तर मी काय वाटेल तें करीन, तो मागेल तें देईन. पण तसा उपाय कुणी सांगेपर्यंत दम धरला पाहिजे आपणाला.'

पण सरसाहेबांना समक्ष चर्चेला बोलावून हा उपाय सांगण्याची वेळ आतां आली आहे असें वाटल्यावरून, डॉक्टर जालंदर व बन्सीधर यांनीं ही गोष्ट मासाहेबाजवळ काढली. ती गोष्ट सरसाहेबाजवळ काढायला त्या कबूल झाल्या. त्या आपल्या पतीला म्हणाल्या, "आपली सूचना स्वीकारून मीं आजवर चंदूचं मन दुखावेल असं कांहीं केलं नाहीं, कांहीं बोललें नाहीं;

पण आपण अगदींच गप्प बसून कसं चालेल ? झालं हें कसं काय झालं आणि याचा उपाय काय याचा नको का कांहीं विचार करायला ? ”

यावर सरसाहेब म्हणाले, “ असा विचार करायला मीं केव्हां नाहीं म्हटलं आहे ? पण चंदु आपल्या मनाचा थांग लागूं देत नाहीं, मला स्वतःला कांहीं सुचत नाहीं आणि इतरहि कोणी कांहीं उपाय सुचवीत नाहीं. तेव्हां विचार तो कसला करायचा ? ”

मासाहेब म्हणाल्या, “ होय, उपाय सुचला आहे मला आणि-”

“ आणखी कुणाला ? ”

“ डॉ. जालंदर आणि आपला बन्सीधर यांना. ते आपणाशीं मोकळ्या मनानं बोलूं म्हणतात याविषयीं. त्याला तरी आपली तयारी आहे काय ? ”

सरसाहेब हसून म्हणाले, “ हें काय बोलता मासाहेब ? अशा गोष्टीला मी माघार कसा घेईन ? ”

“ ठीक आहे. घटकाभऱ्यानं आपण सर्व एकत्र जमण्याची व्यवस्था मी करतें. मात्र आपण त्या दोघांचं सगळं बोलणं अगदीं शांतपणानं ऐकून घेतलं पाहिजे. आपल्याला हें पटलं न पटलं तें मग पाहूं ! आहे कबूल ? ”

“ कबूल. ”

अशा रीतीनें सरसाहेबांची संमति मिळाल्यामुळं ही ज्यूरी भरली होती. तिचे मेंबर सर गंगाराम, मासाहेब, डॉ. जालंदर, आणि इन्. बन्सीलाल असे चौघेच होते. सर्व मंडळी बसल्यावर त्या खोलीला कडी लावून घेण्यांत आली आणि ‘ मीं सांगितल्याशिवाय कुणालाहि जिन्याचं दार उघडूं नको ’ अशी सक्त ताकीद देऊन मासाहेबांनीं आपला एक नोकर पहाऱ्यावर बसविला.

प्रथम बन्सीधरानें बोलण्याला सुरवात केली. तो म्हणाला, “सरसाहेब, आपण आज एक ठिकाणीं बसून कशाचा विचार करणार आहों हें मासाहेबांनीं तुम्हांला सांगितलंच असेल. मला इतकंच सांगायचं कीं या कामीं मी अव्यापारेषु व्यापार करतों आहें असं तुम्हीं समजूं नका. चंदु-करितां व आपणाकरितां या कामांत मीं लक्ष घातलं हें खरंच. तरी पण

माझ्या सरकारी कामांतलं एक काम म्हणूनहि मला यांत लक्ष घालावं लागलं आहे आणि तें कसं हें लवकरच आपणाला मी सांगेन; पण आपण आतां जें जमलों आहों तें चंदूच्या अलीकडच्या अतर्कित वर्तनाचा विचार करायला जमलों आहों. हें वर्तन इतकं सदोष आहे कीं तें चंदूच्या मनांत कांहीं रोगट बिघाड झाल्याशिवाय घडलं नाहीं हें तुम्ही कबूल कराल कीं नाहीं ? ”

“ चंदूच्या मनांतच कांहीं तरी बिघाड झाला असला पाहिजे हें मी कबूल करतों. पण त्याबद्दल त्याला किंवा इतर कुणाला किती दोष देतां येईल हें तुमचं म्हणणं ऐकून घेतल्याशिवाय मला आतांच सांगतां येणार नाहीं. ”

“ ठीक आहे. तर या बाबतींत डॉक्टरसाहेबांचं म्हणणं काय आहे हें प्रथम ऐकून घ्या. ”

याला सरसाहेबांची संमति मिळाल्यावर डॉक्टर जालंदर म्हणाला, “ आपण शांत मनानं, आणि झालं तें तें नीट आठवून, विचार करूं. प्रथम चंदूच्या तब्येतींत अगदीं पहिल्यानं कोणत्या वेळीं बिघाड झाला हें पाहूं. मासाहेब, तुम्ही सांगा तुम्हांला काय आठवतें तें. ”

मासाहेब म्हणाल्या, “ चंदु पास झाल्याची तार बुधवार सकाळीं १० वाजता आली. त्यानंतरच्या रविवारच्या दिवशींच्या संध्याकाळचीच गोष्ट नव्हे का ? संध्याकाळीं मेजवानी व्हायची ठरली होती. त्यांत मला कांहीं करायचं नव्हतं. पण अशी सुमारें पांच वाजतां मी बिंबाला म्हणालें कीं चंदूची मोटार घेऊन रायबहादुरांच्या घरीं जा, आणि शरयूच्या मनगटाला मोत्यांच्या बांगडया केवढ्या लागतात त्याचं माप घेऊन ये. पण बिंबा सांगत आली, ‘दादा म्हणतो, नको जाऊं. मलाच मोटार हवी आहे.’ पण हें खोटं कारण. त्याला शरयूच्या हाताचं मापच आणायला नको होतं. म्हणून मी जाऊन त्याच्याशीं बोललें. तेव्हां तूर्त आपल्या लग्नाचा विचार करूं नका असं तो स्पष्टच म्हणाला ! या वेळीं तो विलायतेच्या टपालाची वाट पहात होता आणि थोडा व्यग्र आणि त्रासिक दिसला. म्हणून मग मी

कांहीं अधिक न बोलतां निघून गेलें. पुढें मेजवानीची मंडळी येऊं लागली. तशी मी माजघराचं दार लावून घेऊन घरांत आपल्या कामाला लागलें. तुम्हांला माहीतच आहे कीं घरीं रात्रीची मेजवानी असली म्हणजे मी माजघरापलीकडं ढुंकूनहि पहात नाहीं. मला तें हसणंखिदळणं आणि तीं बाटल्यांचीं बुचं उडणं ऐकवत नाहीं. रात्रीं मेजवानीनंतर तर चंदूशीं जाऊन बोलण्याची सोयच नसते. त्या दिवशीं जाऊन बोलायला थोडं कारण होतं. कारण चंदूला तंबाकूच्या धुरानं थोडी घेरी आली होती असं कोणसं म्हणालं. पण तेंच पुढं आणखी म्हणालं कीं चदूसाहेब माडीवर जाऊन निजले आणि त्यांना निजवून डॉक्टर घरीं गेले. मग मी कशाला जाऊं त्याची झोप मोडायला ? दुसरे दिवशीं सकाळीं त्यानं सोप्यावर आमच्या-जवळ रोजच्यासारखा चहा घेतला. पण दुपारीं कान्या माळी सांगत आला चंदूचा चमत्कारिक निरोप. तेव्हां मग आम्हीच भद्रेश्वराला गेलों आणि पाहतों तों चंदू आणि बैरागीबुवा याची गांठ ! ”

डॉक्टर जालंदर आतां सरसाहेबांकडं वळून म्हणाला, “ आपण सांगा ना आपली आठवण. ”

सरसाहेब म्हणाले, “ त्या मेजवानीला मंडळी येऊं लागली तिथपर्यंत चंदू खूप आनंदांत होता. विलायतची डाक आली ती त्यानं घेतलेली मीं स्वतः पाहिली. मग बाहेर गेलों. कारण मीं म्हटलं कीं ही समवयस्क स्नेही मंडळींची खुषखबरीची ख्यालीखुशालीची मेजवानी. माझ्या वयाचा एकटा मीच. म्हणून कमिशनरसाहेबांची भेट व जेवण ठरलंच होतं बाहेर; तेव्हां तेंच निमित्त करून निघून गेलों. सकाळीं कळलं कीं रात्रीं चंदूला सिगारेटचा धूर थोडा बाधला होता म्हणून. पण सकाळीं मी त्याच्या चौकशीला जाणार तोंच चंदू स्वतःच नेहमींसारखा चहाच्या जागीं हजर. मग तो भद्रेश्वराला गेला. आम्हांला निरोप पाठविला. मग आम्ही गेलों आणि पाहतों तों सगळच विपरीत. पण त्याच्या मनांत बिघाड व्हायचं खरं कारण, देवाशपथ, याहून मला अधिक कांहींच आतांपर्यंत कळलेलं नाहीं. ”

" बरं, पण चंदूनं शिकारींत पक्षी मारले त्या हत्येच्या पश्चात्तापानं त्याला हें वैराग्य आलं असं वाटतं का तुम्हांला ? "

" छट " सरसाहेब म्हणाले, " तो शिकारीहून आला तो आनंदांत आला. मग तो पास झाल्याची तारहि आली आणि त्यानंतर त्याचा सगळा दिवस ख्यालीखुशालींत गेला. "

" बरं, चंदूला घेरी आली ती तंबाखुच्या धुरानं अशीच तुमची अजून खात्री आहे का ? "

" होय, अगदीं बरोबर. पण डॉक्टर, त्या घेरीच्या वेळीं तुम्हीच हजर होतां आणि आम्हांला हो काय विचारतां आणि सांगतां ? "

बन्सीधर थट्टेच्या स्वरानें म्हणाला, " सरसाहेब, तुमच्या या फॅमिली डॉक्टरना तुम्ही जबाबदार धरा आणि त्यांची फी तोडा. "

" तें कां रे बाबा ? डॉक्टरचा काय दोष यांत ? " डॉ. जालंदरनें हसून विचारलें.

मासाहेब या विनोदांत भाग घेऊन म्हणाल्या, " बरोबरच आहे. फॅमिली डॉक्टर नेमतात ते कुटुंबांतल्या मनुष्यांना रोग झाल्यावर मग औषध देण्याकरितांच नुसते नेमीत नाहींत, तर रोग आजार होण्याला आधींच प्रतिबंधकारक इलाज करायला, औषधें द्यायला. "

" अस्सं ? " डॉ. जालंदर म्हणाला, " पण आतां माझ्यावर आणून बेत-विलं म्हणून सांगतों कीं, चंदूची प्रकृति न बिघडण्याचा इलाज करण्याची जबाबदारी जर या फॅमिली डॉक्टरवर होती, तर मासाहेब, मला चंदूबरोबर आपण विलायतेला पाठवायला पाहिजे होतें. कारण आतां सांगतोंच कीं चंदूच्या घेरीचं कारण तंबाखूचा धूर नव्हे. त्या वेळीं बोभाटा वाचावा म्हणून मींच तें खोटं रचून सांगितलं. "

" हें काय ? अन् मग खरं कारण दुसरं कोणचं ? " सरसाहेबांनीं आश्चर्यानं विचारलं.

: जालंदर म्हणाला, " तंबाखूचा धूर नव्हे, तर विलायतची तार ! "

" विलायतची तार ? अन् ती कसली ? कुणाची ? परीक्षा पास झाल्याची तार तर बुधवारींच आली होती ! "

" होय. पण संध्याकाळीं मेजवानीची मंडळी टेबलावर जाऊन बसण्याच्या ऐन वेळीं ही जी तार आली, ती तुम्हांला काय माहीत ? चंदूला घेरी येतेशी पाहून मींच जवळ जाऊन त्याला सावरून धरला. इतक्यांत मला दिसूं नये म्हणून ती तार चंदूनं चुरगळून खिशांत घातली आणि याच्यापुढची हकीकत इन्स्पेक्टरसाहेब सांगतील. "

बन्सीधर म्हणाला " सरसाहेब, मासाहेब, गोष्टी दिसतात तशा नसतात. या तारेची बातमी डॉक्टरनीं मला सांगितली. त्यांनाहि तिची पक्की माहिती नव्हती. पण त्यांचा अदमास खरा ठरला. मी दुसरे दिवशीं सकाळीं तार ऑफिसांत जाऊन तिची प्रत आणली, ती ही पहा. वाचून दाखवितों त्यांतला मजकूर. "

सरसाहेब व मासाहेब दोघेहि उत्सुकतेनें तो ऐकण्याकरितां पुढें सरसावलीं

बन्सीधर म्हणाला, " ऐका तारेंतला मजकूर. ' चंदूलाल, तुम्हांला कळविण्याला मला फार वाईट वाटतें कीं, मेरी बोडहाऊस काल पहाटे साडेतीन वाजतां मृत्यू पावली. आज सकाळीं तिला स्मशानांत पुरण्यांत आलें. तिला हृदयाच्या विकारानें मृत्यू आला. अखेरपर्यंत ती तुमची आठवण काढीत होती, तुमच नांव घेत होती. ' बोला, या तारेचा अर्थ तुम्हांला कांहीं कळतो का ? "

मासाहेब पतिराजांना म्हणाल्या, " हें पहा आपल्या चिरंजिवाचे चाळे. तुम्ही कमींत कमी पन्नास साठ हजार रुपये खर्चून विलायतेंत ठेवलात. तो ऐशीएसची परीक्षा पास झाला तें याला कांहींच नाहीं आणि ही कुणी कार्टी मेल्यानं तिच्याशीं होणाऱ्या लग्नाची परीक्षा नापास झाली त्या दुःखानं मात्र हा सर्वसंगपरित्याग करून गोसावी व्हायला निघाला ! तरी मी तेव्हांच म्हणत होतें कीं चंदूला विलायतेला पाठवूं नका म्हणून. कशाला मेली ती ऐशीएस ? घरचा मुलगा बाहेर घालवायला ? "

" ठीक आहे. मासाहेब आतां बोलतील तें थोडेंच आहे म्हणा. पण काय

रे बन्सीधर, या तारेचा आणि गुरु करून घरीं आणलेल्या या गोसाव्याचा काय संबंध ? ”

“ संबंध हा कीं बुधवारीं सकाळींच या गोसाव्यानं म्हणे चंदूनं पक्षी मारल्याबद्दल त्याला शाप दिला आणि तो शाप या तारेनं ऐन मेज-वानीच्या दिवशीं संध्याकाळींच फळाला आला हा योगायोग ! ”

“ पण मेलेली ही विलायती कार्टी हा गोसावी आतां फिरून जिवंत करून देणार कीं काय चंदूला ? आणि हा चमत्कार घडून येईपर्यंत ही गोसाव्याची ब्याद या आमच्या वाड्यांत राहणार कीं काय ? ” मासाहेबांनीं अगदीं कळवळून प्रश्न केला.

“ त्याची नको तुम्हाला काळजी मासाहेब. ती ब्याद तुमच्या वाड्यां-तनं उठवून लावण्याच्या कामीं मला चंदूचीच काय पण तुमचीहि कोणाची मदत नको. तें काम मी आपल्या स्वतंत्र अधिकारानं कसं करूं शकतों हें सांगेन तुम्हांला इथल्या इथं लवकरच. पण त्या कामीं सरसाहेबांनीं माझ्या-बरोबर आपला घरधनीपणा थोडासा गाजवायला तयार झालं पाहिजे. ”

“ म्हणजे या गोसाव्यांच्या सांगण्या—चिथावणीवरनंच का चंदु आय्. सी. एस्. चा राजीनामा द्यायला तयार झाला ? आणि आजन्म ब्रह्मचारी राहण्याची शपथ त्यानं घेतली ? ”

“ खरं बोलायचं तर तें कांहीं गोसाव्यानं केलं नाहीं. तो सगळा चंदूच्या दुबळ्या मनाचाच प्रताप. पण हें गोसाव्याचं बिऱ्हाड इथून हलल्याशिवाय त्याला ताळ्यावर आणण्याचे प्रयत्न यशस्वी होणार नाहींत. ”

“ पण त्याला चंदूची खुषीची संमति कशी मिळणार ? ” सर गंगाराम म्हणाले.

“ तें आतां या क्षणीं मला सांगतां येत नाहीं. पण आज उद्यां पत्त्या-मुद्दयानिशीं कळेल. हे गोसावी आपल्या मरणानंच मरणार आहेत आणि तो प्रकार चंदु पाहील तेव्हां गोसाव्याचं बिऱ्हाड हलण्याला तो संमति देईल, इतकंच नव्हे तर उलट मदत करील. ”

" मग एकूण चंद्र ताळ्यावर येण्याची आशा आहे तुम्हा दोघांना ? " मासाहेबांनीं काकुळतीनें विचारलें.

डॉ. जालंदर म्हणाला, " असं होण्याचा संभव भरपूर आहे. पण इथं तो संभव प्रत्यक्ष पदरांत पडेल कीं नाहीं हें यापुढं कांहीं गोष्टी कांहीं प्रकारानं घडण्यावर अवलंबून राहील. "

सर गंगाराम म्हणाले, " वाहवा डॉक्टरसाहेब, तुमचं हें चंद्रूच्या मानसिक रोगाचं निदान एखाद्या दरबारी ज्योतिष्याच्या भविष्याप्रमाणं आहे म्हणायचं. "

" तें कसं म्हणतां सरसाहेब ? "

" तें असं कीं, संभव खरा ठरून अनुभव पदरांत पडला तर तुम्ही भविष्यवादी ठरलां ! पण संभव खोटा ठरला तर त्याचा दोष इतर कांहीं गोष्टी न घडून येण्यावर ! म्हणजे बुडाला तर बेडूक आणि उडाला तर कावळा ! रोग बरा झाला तर माझ्या औषधानं, न झाला तर रोग्याच्या कुपथ्यानं ! "

जालंदर म्हणाला, " तर मग आतां सांगतोंच सगळं तुम्हाला ऐकून घ्यायला वेळ असेल तर. कारण चंद्रूच्या मनाला अपघात झाल्याच्या त्या दिवसापासून या अघटित घटनेचा मी खोल विचार करूं लागलों. चंदु माझा बाळमित्र म्हणून त्याच्या प्रेमानं तर हा विचार मीं केलाच. पण जीवनशास्त्राचा अभ्यासू व मानसशास्त्राचा अभ्यासू याही दृष्टीनं मीं तो विचार केला. "

सर गंगाराम हसून म्हणाले, " या दोन शास्त्रांची जोडगोळी एकाच डॉक्टरी नळींत कशी काय बसते बुवा ? "

मासाहेब म्हणाल्या " डॉक्टर, तुमचं हें शास्त्रांतलं बोलणं मला समजण्यासारखं नाहीं. पण त्यांतून शेवटीं चंद्रूचा रोग बरा होण्याचं काय पिल्लू बाहेर पडतं तें पाहावं म्हणूनच मी आपली ऐकत बसणार आहें. मलाहि आतां कांहीं दुसरं काम नाहीं. "

" ऐका मासाहेब, तुम्हीहि थोडं ऐका. कां समजणार नाहीं ? शास्त्र

म्हणजे असं कांहीं तें गूढ नसतं. मी जीवनशास्त्र आणि मानसशास्त्र यांचा संबंध कसा आहे हें दाखवितों पाहा. आपण शास्त्राचं अवघड नांव सोडून देऊं. पण शरीर आणि मन हीं दोनहि एक नसलीं तरी एकाचा परिणाम दुसऱ्यावर होतो हें तुम्हांला कबूल आहे कीं नाहीं ? ”

मासाहेब म्हणाल्या, “ हो, तें मला कळतं. हट्टी मुलाला उपाशी ठेवलं म्हणजे त्याचा हट्ट जातो. मन ताळ्यावर येतं. उलट मन खेळांत रमलं, म्हणजे मूल तहानभूक विसरतं. होय कीं नाहीं ? ”

“ बरोबर सांगितलंत मासाहेब, आणि शरीराचा आणि मनाचा जसा संबंध लागतो तसाच मनाचे जे निरनिराळे गुणधर्म आहेत त्यांचाहि एक-मेकाशीं लागतो. ”

सर गंगाराम हे पुरुष असले तरी आडमुठे अशिक्षितच. ते म्हणाले, “ मनाचे गुणधर्म म्हणतां ते काय डॉक्टर ? ”

“ गुणधर्म असे—मनुष्य सामान्यतः बुद्धि चालवून वागतो कीं नाहीं ? तर्क लढवितो कीं नाहीं ? अनुमान बांधतो कीं नाहीं ? ”

बन्सीधर म्हणाला, “ बरोबर, आमच्या पोलिसी कामाच्या अनुभवांत तरी आम्ही हेंच करतों. अगदीं विचारी माणसासारखे वागतों. मनुष्य हा विचारी प्राणी आहे, बुद्धिप्रधान आहे, ही त्याची व्याख्या बरोबर ठरेल.”

“ होय, इन्स्पेक्टरसाहेब ” जालंदर म्हणाला. “ तुम्हां पोलीस लोकां-प्रमाणं आम्हा डॉक्टर लोकांनाहि बुद्धीला प्रमाण मानून रोगाचं निदान आणि औषध-योजना करावी लागते. पण—”

“ म्हणजे तुम्ही कोणती गोष्ट टाळतां ? ” बन्सीधर म्हणाला.

“ आम्ही आमच्या मनावर भावनेचं वर्चस्व टाळतों. इतर रोग्यापेक्षां घरच्या मुलावर डॉक्टराचं प्रेम अधिक असतं. पण निदान व औषधोपचार करतांना तें प्रेम आडवं येऊं देत नाहीं किंवा त्यामुळं औषध अनुपान लिहून देण्यांत डॉक्टर फरक करीत नाहीं. पण बन्सीधरसाहेब, तुम्ही तपास करतांना स्वतः विकारवश न झाला तरी तुमच्या तपासांत जे गुन्हेगार किंवा

इतर लोक येतात ते सर्व केवळ बुद्धि चालवून, तर्क लढवून, अनुमानें बसवूनच वागतात असं तुम्हाला आढळतं काय ? ”

“ छे, छे, तें बोलूंच नका ! मनुष्य भावनावश न होतां केवळ बुद्धि प्रमाण म्हणून चालेल तर आमचं पोलिसाचं काम आणि जगांतले गुन्हे-वखेडे निम्मे तरी कमी होतील. ”

“ मग मनुष्य बुद्धीचा उपयोगच करीत नाहीं असं तरी तुम्ही म्हणता काय ? ”

“ छे, तसंहि नाहीं. तो बुद्धीचा उपयोग करतो; पण आधीं भावनावश होऊन काय करायचं, म्हणजे काय साधायचं, काय टाळायचं, हें ठरवितो आणि मग आपली बुद्धि तें ध्येय पदरांत पाडण्याकडे खर्च करतो. ”

“ आमच्या वैद्यक शास्त्रांत मुख्यतः शरीराचाच संबंध येतो. म्हणून रोगाची चिकित्सा आम्ही करूं लागलों म्हणजे प्रथम शरीराच्या मार्गानं चिकित्सा करतों हें खरं; पण त्यांतहि कोठें तरी मध्येंच मनाच्या विकाराचा सुगावा लागतो आणि मग शरीर सोडून मनाच्या मार्गानं शोध करावा लागतो. पण जिथं आमच्याकडं मुळातच मनाचा रोग येतो, तिथं ती चिकित्सा फार कठीण होते आणि म्हणूनच मीं प्रारंभीं म्हटलं कीं, खऱ्या डॉक्टरला जीवनशास्त्राबरोबर मानसशास्त्राचाहि अभ्यास केला पाहिजे. ”

आतां सर गंगाराम म्हणाले, “ अरे, तुम्ही दोघं तर शास्त्रीच भेटलां. पण ही मोघम चर्चा सोडून चंदूचं काय बोलतां तें ऐकायचं आहे. त्याबद्दल बुद्धिवादी तूं वन्सीधर, आणि भावनावादी तुम्ही डॉक्टर, काय म्हणतां ? ”

जालंदर म्हणाला, “ चंदूनं बुद्धि कशी चालविली हें मी सांगतों. ज्या वेळीं चंदूनं बंदुकीनं पक्षी मारून खालीं पाडले त्याच वेळीं तिकड विलायतेंत त्यानं मनानं वरलेली मेरी गतप्राण झाली. या दोन गोष्टींचा संबंध कार्यकारणभावानं चंदूनं लावला. कार्यकारण भाव लावून पाहाणं हें बुद्धीचं पहिलं काम आहे. पण मुळांत मेरी ही त्याचा प्रेमविषय होऊन

बसली होती. म्हणजे तिच्या कारणानं कांहीं एक भावना आधीं उत्पन्न झाली होती. म्हणून हा कार्यकारण भाव बसविण्याचं चंदूला सुचलं. पण समजा त्याच वेळीं अमेरिकेंत एखादा भूकंप झाल्याची वार्ता आली असती, तर चंदू आपली शिकार आणि हा भूकंप यांचा संबंध लावून हळहळत बसता का ? एका मेरीऐवजीं हजार माणसं तिकडे मेलीं असतीं आणि आज सरसाहेबांच्या आणि मासाहेबांच्या कुटुंबसौख्याचा सत्यानाश झाला, त्यापेक्षां अधिक भयंकर नाश हजारों अमेरिकन कुटुंबांचा झाला असता तर काय चंदु डोक्यांत राख घालून असा संन्यास घेता ? त्यानं ती बातमी वाचली असती तरी कमाल पक्ष भिवया एक वेळ वर चढाविल्या असत्या, सहानुभूतीचा एखादा सुस्कारा टाकला असता आणि हातांतलं वर्तमानपत्र टाकून सिगारेट उचलता किंवा हातांत टेनिस ब्याट घेऊन खेळायला धांवता. पण त्या मेरीच्या प्रेमानं चंदूचं मन भारावून गेलं होतं. ती हिन्दुस्थानला येण्याची तो वाट बघत होता. कदाचित् तिचं ताजं पत्र डोळ्यापुढं असल्यामुळें त्या प्रेमभावनेला खूप तीव्रता आली होती आणि इतक्यांत ती मेल्याची तार आली म्हणून त्याला वैराग्याचा शाप आठवला. नाहीं तर अशा छप्पन्न वैराग्यांचीं भविष्यं त्यानं खिशांत घातलीं असतीं. हेंच पहा ना कीं, या भविष्याच्या उच्चारानंतर लगेच तो आय्. सी. एस्. परीक्षा पास झाल्याची तार आली, तीच भविष्याला लावून त्यानं त्या भविष्याची आणि ईश्वरी न्यायाची थट्टा नाहीं का केली ? पण ही परीक्षा पास होण्याच्या आनंदापेक्षां मेरीच्या प्रेमाचा आनंद त्याला अधिक वाटत होता आणि त्याचा नाश झाल्याबरोबर सगळं गाडं गडाडलं !"

मासाहेब म्हणाल्या, " काय रे ! आम्हा न शिकल्या-सवरलेल्या बायकांनीं असं भावनेच्या आहारीं जावं, आणि बुद्धीशीं वैर करून आततायीपणा करावा हें शोभेल. पण चंदु आधीं पुरुष म्हणून अधिक खंबीर मनाचा असावा. त्यातून तो शिकलेला. विलायतेंत चार वर्षं राहून इतक्या परीक्षा दिलेला. मग इतकी कमावलेली त्याची बुद्धि सारी फुकटच का जावी ? ती एक विलायती पोरगी मेली म्हणून जग कांहीं ओस पडलं नव्हतं.

तिच्याहून अधिक सुंदर उपवर मुली इकडं काय थोड्या मिळत्या ? राय-बहादुराची शरयूच घ्या ना. तिच्यांत रतिमात्र तरी कांहीं वैगुण्य आहे काय ? बरं, त्या मेरीवर प्रेम बसलं तर फार तर चंदुन कांहीं काल अविवाहित राहावं, आणि दुःख ओसरल्यावर पुढचा विचार करावयाचा होता. पण त्या मेरीचा आणि त्या आय्. सी. एस. च्या जागेचा काय संबंध ? तिचा राजिनामा त्यानं कां द्यावा ? आणि त्या पलीकडची गोष्ट, या वैराग्या-गोसाव्यांना घरीं आणून त्यांना गुरु आणि गुरुबंधु करून, स्वाभिमानाला न शोभेल असं लाजिरवाणं वर्तन करावं हें काय ? मग चंदूची बुद्धि, विचारशक्ति काय चुलींत घालून जाळायची ? '

" बरोबर म्हणतां मासाहेब तुम्ही. पण गेल्या काहीं दिवसांत मीं मानसशास्त्राचा अभ्यास मुद्दाम केला. त्यांत मला हें आढळलं कीं, मनुष्याला तर्कप्रधान, बुध्दिप्रधान किंवा विचार करणारा प्राणी म्हणतात हें आपलं तितपतच खरं मानावं. प्रसंग नाहीं तोंपर्यंत तें ठीक आहे. शिवाय, अप्रिय गोष्ट मनुष्याला हळूहळू कळत कळत कळली तर तिचा परिणाम सोसण्याला त्याबरोबरच हळुहळु त्याची तयारी होत असते. पण बातमी अप्रिय आणि तीही अकस्मात् कळली तर मेंदूवर हातोड्यानें घाव घालावा तसं होतं. विहीर खणतांना झरा लागावा, आणि पाणी आवरेना म्हणून तें थांबविण्या-करितां झऱ्याच्या तोंडीं शिशाचं बूच घालावं आणि इकडे विहिरीचं काम पुरं करून बूच काढावं तो झरा आटलेला आढळतो. झऱ्याचं पाणी आंतून दुसरीकडे मार्ग काढून वाहूं लागतं, आणि मग पूर्वीच्या जागीं परत येत नाहीं असा अनुभव जलशास्त्री सांगतात. "

" तर मग डॉक्टर, इतकं शास्त्र इतके वेळ सांगून अखेर चंदूची बुद्धि परतली ती फिरून जागीं येणार नाहीं हीच का फलश्रुति तुम्ही मला सांगणार ? मला वाटलं होतं कीं मला शास्त्र सांगाल; पण शेवटीं चंदूला ताळ्यावर आणण्याचा कांहीं उपायहि सांगाल अशी आशा धरून मी बसल्यें होत्यें तुमचं हें शास्त्रपुराण ऐकायला ! त्यांत शेवटीं माझी निरा-शाच झाली म्हणायची ! "

असं म्हणून डोळ्याला आलेलं पाणी पुसण्याकरितां मासाहेबांनीं कमरेचा हातरुमाल डोळ्याला लावला.

तें पाहून जालंदर घाईनं म्हणाला, " नाहीं, नाहीं मासाहेब ! तुम्हांला असं निराश होण्याचं कारण नाहीं आणि मींहि जें शास्त्र अलीकडं वाचलं, तें रोग जडतो कसा एवढं समजण्यापुरतंच नाहीं वाचलं, तर रोग बरा कसा होतो हें कळण्याकरितांहि वाचलं. वैद्यकशास्त्रांत काय, मानसशास्त्रांत काय, रोग जडण्याचीं कारणं सांगतात त्याप्रमाणं तो बरा होण्याचं इलाजहि सांगतात. "

सर गंगाराम म्हणाले, " मग चंदु ताळ्यावर येण्याला तुम्ही इलाज काय सांगतां ? "

" इलाज असा कीं, एखाद्या क्षोभनामुळं जर रोग झाला तर त्याला प्रतिक्षोभन द्यावं. म्हणजे तो रोग बरा होण्याचा संभव असतो. शास्त्रांत त्याला ' काऊन्टर इरीटंटची थिअरी ' प्रतिक्षोभनाची उपपत्ति म्हणतात."

" ही तुमची उपपत्ति झाली. पण प्रत्यक्ष प्रयोगाचं कांहीं सांगा ना ! "

" चंदूच्या या प्रकरणीं क्षोभकारणं दोन तीन ठळक आहेत. पहिलं कारण मेरी. "

" मग हें गाडं उलट व्हायला ती मेलेली मुलगी फिरुन जिवंत व्हायला पाहिजे ! "

" तें कांहीं शक्य नाहीं. मेरी खरोखरच मेली असेल तर ती जिवंत होत नाहीं खास. पण तिच्या ज्या गुणांनीं चंदूचं प्रेम तिच्यावर बसलं त्या गुणांत कमीपणा आणण्यासारखी कांहीं गोष्ट घडली, माहिती मिळाली, तर तें प्रतिक्षोभन ठरेल आणि या मुलीवर मीं प्रीति केली ती योग्य नव्हती असं चंदूला सकारण वाटलं तर त्याच्या मोहाचा रोग बराच हटेल. "

मासाहेब आतां थोड्या सावचित्त झाल्या होत्या. त्या म्हणाल्या, " डाक्तर, तुम्ही सांगतां हें घडणं मला दुरापास्तच दिसतं. मेल्या मेरीच्या अंगीं अवगुण असले तर ते सांगणार कोण ? ते चंदूला पटणार कसे ?

आणि त्याच्या प्रेमाचा आणि दुःखाचा आवेग कमी होणार कसा ? बरं, दुसरं कांहीं ? ''

'' होय दुसरं, हे गुरुमहाराज गोसावीबुवा. यांच्याविषयीं चंदूच्या मनांत अत्यंत पूज्य भाव उत्पन्न झाला आहे. तो कोणत्याहि कारणांनीं कमी झाला तरी तिकडून थोडंसं काम होईल. ''

बन्सीधर म्हणाला, '' आणि तें काम मासाहेब, मीं पत्करलं म्हणून तुम्हांला पूर्वीं सांगितलंच आहे. या गुरुमहाराजांबद्दलची चंदूची पूज्य बुद्धि अगदीं शून्यावर आणून ठेवण्याचं साधन या कागदाच्या पुडक्यांत आहे ! '' असें म्हणून त्यानें आपल्या हातांतलें फाईल वरवर चाळून सर गंगाराम यांच्या नजरेला घातलें.

सर गंगाराम म्हणाले, '' अरे गोसाव्यांना तर आगा नाहीं, पिछा नाहीं असं मी समजतों. चंदूहि तसंच समजतो. मग यांच्या संबंधानं इतके कागदपत्र, एवढं प्रकरण कुठलं ? ''

बन्सीलाल जागेवरून उठला. सावधपणाच्या संवयीप्रमाणं दाराशीं जाऊन तें नीट बंद आहे, तिथं दुसरं कोणी नाहीं, असा कानोसा त्यानं घेतला आणि परत येऊन हलक्या आवाजानं म्हणाला, '' डॉक्टर ! या गोसाव्यांना जर मीं कैद करून हातकड्या घातल्या, आणि हें चंदूनं पाहिलं, आणि तें कां हे त्याला कळलं, तर मग मिळालं कीं नाहीं तुम्हांला हवं तसं प्रतिक्षोभन म्हणजे ' काउन्टर इरिटंट ' ! ''

हें ऐकून सरसाहेब म्हणाले, '' मग हे गोसावी लेकाचे असे आहेत तरी कोण ? ''

'' आहेत अट्टल बदमाष, चोर, डाकू ! या वेषानं आज दोन वर्षं संस्थानच्या आणि खालसांतल्या पोलिसांना गुंगारा देत या संस्थानांतनं त्या संस्थानांत अशा झुकांड्या देत आहेत; लपून छपून राहात आहेत. ''

'' तरी मला वाटलंच !'' मासाहेब म्हणाल्या. ''मनाची साक्ष तीच खरी साक्ष. या गोसाव्यांना पाहिलं त्या दिवसापासून माझ्या मनांत त्यांच्याबद्दल तिटकाऱ्याशिवाय दुसरी भावनाच आली नाहीं. पण चंदू आमचं दैवत

पडलं आणि ( या ठिकाणीं त्या सरसाहेबाकडे हात दाखवून म्हणाल्या ) हें त्याबरोबर आमचं दुसरं दैवत ! शिवानं विष्णूची पूजा करावी, आणि आम्हीं भक्तगणानीं दोघांची ! चंद्र मुलगा म्हणून आणि हे मुलाचे लाड पुरविणार म्हणून. मला कुणाच्याहि विरुद्ध बोलण्याची चोरीच झाली होती. एरवीं या गोसाव्यांना मीं आपल्या घरांत एक क्षणभरहि थारा दिला नसता आणि आतां ओघाला आलं म्हणून सांगतें कीं या गोसाव्याच्या पायीं चंद्र-पेक्षां त्या पोरीची–बिम्बाचीच-काळजी मला अधिक वाटते. मीं म्हणूं नये, पण कशी या पोरट्यानं आपली बुद्धि गमावून आमच्या सत्यानाशाची ही वेळ आणली ! ”

इतक्यांत चंद्र बाहेरून आल्याची चाहूल लागल्यामुळं सर्व मंडळी निघून गेली.



## मठांतील कानोसा : : : १९

यानंतर सुमारें दोन आठवड्यांनीं एके दिवशीं संध्याकाळीं सूर्यास्ताच्या सुमाराला एक यात्रेकरू नंदभुवनामध्यें आला आणि मठांतले गोसावी कोठें राहातात याची माहिती मिळाल्यावर इतर कोणाची परवानगी न घेतां तो एकदम मठाकडेच गेला. त्याला असें वाटत असावें कीं मठांतल्या गोसाव्यांची व आपली गाठ पडली म्हणजे तेच माझी ओळख सांगून मला ठेवून घेतील. इतर कोणाला जाब देण्याचें कारण मग उरणार नाहीं. यात्रे-करूनें खांद्यावर तीर्थाच्या कावडीसारखी एक कावड घेतली होती. काठीच्या दोहों टोकाला दोन निमुळत्या तोंडाच्या टोपल्या लटकत होत्या. त्यावर भगव्या रंगाच्या बुट्टेदार छाट्या आच्छादन म्हणून घातल्या होत्या. यात्रे-करूच्या डोक्याला पांढऱ्या गोपीचंदनाचा त्रिपुण्ड्र लावलेला असून त्याचे कपडे एखाद्या चिरप्रवासी यात्रेकरूच्या कपड्यासारखे जुने व मळकट दिसत. तोंडानें तो मोडकें तोडकें हिंदी बोले. पण त्याच्या चुका होत त्या

एखाद्यानें जाणून बुजून कराव्या, म्हणजे हिंदी भाषेचें ज्ञान प्रगट करण्यापेक्षां लपविण्याकरितां कराव्या, असें कोणाहि ऐकणाराला वाटलें असतें.

या यात्रेकरूला पाहातांच गुरुमहाराज व शिष्य या दोघांनीं त्याचा नमस्कार घेऊन त्याच्या कावडीसकट त्याला आंत बोलावलें. चंदु जवळच होता. त्याला गुरुमहाराज म्हणाले, " आम्हा तीर्थयात्रेकरू लोकांच्या गाठी अशाच अभावित कोठें कोठें पडतात. एका दृष्टीनें आम्हा लोकांचीं पर्यटणें अशीं कांहीं चालतात कीं कोणाला वाटेल कीं हे एकमेकापासून मुद्दाम दूर जाण्याची इच्छा करतात. पण दुसऱ्या एका दृष्टीनें तींच पर्यटणें अशीं घडतात कीं जसे कांहीं आम्ही मुद्दाम एकमेकांच्या गाठी घेण्याकरितांच फिरतों."

चंदुला झाल्या प्रकारांत कांहींच विशेष वाटलें नाहीं. कारण नंदभुवनांत एक तापसी अधिक आला काय किंवा कमी झाला काय, जागेला आणि शिधासामुग्रीला कमतरता नव्हतीच. शिवाय आपल्या पाहुण्याचा पाहुणा तो आपलाहि पाहुणाच. चंदुनें या नव्या यात्रेकरूला कोण, कोठून आला वगैरे सहज चार मामुली प्रश्न टाकले. त्यांचीं उत्तरें देतांना यात्रेकरूकडून हिंदी भाषेंतील होणाऱ्या चुकांचा कृत्रिमपणा त्याच्या लक्षांत आला. पण यात्रेकरू म्हटला म्हणजे तो दहा प्रान्तांत हिंडणारा, दहा प्रांतांतील भाषा मोडक्या-तोडक्या बोलण्याचा प्रयत्न करणारा. बरें, शंका घेण्याला इतर कांहीं कारण नाहीं. म्हणून तो कांहीं वेळानें निघून आपल्या खोलीकडे गेला.

इतक्यांत मागाहून दुसरीहि एक प्रवासी व्यक्ति नंदभुवनांत आली. पण तो पाहुणा नसून इन्स्पेक्टर बन्सीधर हाच होता. नेहमींप्रमाणें आपलें सामान त्यानें ठरलेल्या खोलींत लावलें आणि प्रथम मासोहेबांची गांठ घेतली. तो त्यांना म्हणाला, " मासाहेब ! तुमच्या घरच्या या पाहुण्या गोसाव्यासंबंधानं मला जी चौकशी करायची होती, माहिती मिळवायची होती, ती माझी मिळवून आतां झाली आहे. म्हणून मला माझं सरकारी काम तडीला नेण्याला आतां उशीर करतां येत नाहीं. यांत अडचणीचा प्रश्न आहे तो फक्त चंदूसंबधाचा. म्हणजे मला या गोसाव्याचें जें काय करावयाचं

तें करतांना तो किती आड येईल किंवा मला त्याला किती दुखवावा लागेल याचा. आतां माझें हें सरकारी कामच असल्यामुळं त्यांत आडवं येणं ठीक नाहीं हें आय. सी. एस. झालेल्या चंदूलाहि कळतच असेल. पण त्याची गुरुभक्ति अजून जितकी ठिकाणावर असेल तितका या गोसाव्यांना बचावण्याचा, किंवा निदान माझ्या तावडींतून सुटून जाण्याला साहाय्य करण्याचा मोह चंदूला होण्याचा संभव! म्हणून याविषयीं त्याच्याशीं आधीं न बोलतां सरसाहेबांशीं बोलावं असा माझा विचार आहे. यांत तुमचा सल्ला कसा काय?"

मठांतल्या गोसाव्यासंबंधानें अशी भाषा बन्सीलालच्या तोंडून निघाली हें पाहून मासाहेबांना मनांतून आनंदच झाला. त्या म्हणाल्या, "या गोसाव्याविषयीं माझ्या मनांत अगदीं पहिल्या दिवसापासून वाईट ग्रह झालेला होताच. त्याला कारण म्हणून कांहीं सांगतां येणार नाहीं किंवा ते गोसावी चंदुला आवडण्याला जें कारण झालं असेल त्याहिपेक्षां माझं कारण कच्चं किंवा चुकीचं म्हणेनास! पण तें तसं आहे खरं. घरच्या पुरुषांची मात्र मला मनांतून कींव येते. कारण चंदूसारखी गोसाव्यावर यांची खरी श्रद्धा नाहीं. पण चंदूखातर त्याला घरांतून घालवून द्यावेंसेंहि वाटत नाहीं अशी त्यांची कुचंबणा चालू आहे. बरं, कारणाशिवाय गोसाव्यांना घालवून देऊं म्हटलं, आणि चंदूनं त्याला मोडता घातला, तर ते त्याची बाजू घेणार. अशी पंचाईत येऊन पडली आहे."

बन्सीधर म्हणाला, "या गोसाव्यांचं येथून उच्चाटन करण्याचं अपयश तुम्हा कोणाच्या पदरीं न येईल असंच मी कांहीं करूं शकेन. पण एक करतां एक व्हावं असं कांहीं होऊं नये. चंदूच्या माझ्या प्रेमांत बिघाड येऊं नये, आणि हें घर मला अंतरूं नये, एवढीच माझी इच्छा. असो. तर आतां यापुढची पायरी म्हणून मी असं सुचवितों कीं, मीं पूर्वीं तुम्हाला व डॉ. जालंदरला या गोसाव्याबद्दल जी ओझरती माहिती दिली आहे ती आतां सरसाहेबांपुढेंहि मांडीन आणि आपणा सर्वांचं बळ एकवटलं म्हणजे चंदूशीं कलागतच करावी लागली तर ती करणं सोपं जाईल."

मध्यंतरीं रात्रीची वेळ आली ती बन्सीधराला फुकट घालवेना. संध्याकाळीं कावडी घेऊन आलेला यात्रेकरू हा फत्तरगढच्या चोरींतलाच या गोसाव्याचा एक साथीदार आहे असा तपास पोलिसांना लागलेला होता आणि आज नंदभुवनाकडे येण्यांत वर सांगितलेल्या कामाबरोबर साथिदारावर टेहेळणी ठेवावी असाहि त्याचा दुसरा हेतु होता. नेहमींच्या अनुभवावरून बन्सीधराला हें माहीत होतें कीं, एखाद्या गुन्ह्यांतले साथीदार एकत्र आले म्हणजे ते आपल्या पुढील बेताविषयीं आपापसांत खलबत केल्याशिवाय राहावयाचे नाहींत. तेव्हां आज रात्रीं या मठांतच कोठेंतरी गुप्तरूपानें जवळच राहून या तिघांचें बोलणें काय होतें तें ऐकायला मिळाल्यास तो योग साधावा असें बन्सीधरानें ठरविलें.

रात्रीं जेवण झाल्यावर आपण नाटकाला जाणार आहों, खोलीची किल्ली आपणाजवळ आहे, तेव्हां आपली वाट कोणी पाहूं नये, असें सांगून तो बाहेर पडला. भोजनोत्तर चंदु मठांत गेला. तो नित्याप्रमाणें गुरुमहाराजासमोर बसून राहिला होता. त्याजजवळ जाऊन बन्सीधर चंदूला म्हणाला, " तुला मजबरोबर नाटकाला ये म्हणण्याची सोयच राहिली नाहीं. पण तूं कदाचित् मला शोधशील म्हणून तुला सांगायला आलों आहें. मी आणि गांवांतला एक स्नेही नाटकाला जाणार आहों व रात्रीं कदाचित् त्याच्याकडेच मी निजेन " आणि हें सर्व त्या गोसाव्याला ऐकूं जाईल इतकें मोठ्यानें मुद्दाम तो बोलला.

नंतर रात्रीं मठांत निजणाऱ्या रखवालदाराच्या घरीं जाऊन त्यानें त्याची गांठ घेतली. प्रथम गोसाव्यासंबंधानें त्यांचें मत अजमावण्याकरितां खडा टाकलासा करून, आणि त्याच्या हातांत पांच रुपयाची नोट ठेवून बन्सीधर म्हणाला, " का रे गिरधर ! तुझी तर लेका आतां चैन आहे. "

गिरधर आश्चर्यानें म्हणाला, " ती कशी म्हणतां बन्सीसाहेब ? "

" अरे, तूं मठाचा रखवालदार. हरघडीं हरकामीं या दोघां गोसावी महाराजांना उपयोगी पडणारा. त्यांच्या रोजच्या मेजवानींतला अंश तुला

मिळणार आणि वरती या मठांत हल्लीं जो पुण्यसंचय चालू आहे त्याचा अंशहि तुला मिळणारच. ”

हें ऐकून गिरधर रागावल्यासारखा उखडला आणि ती पांच रुपयांची नोट बन्सीधराच्या अंगावर परत फेकून म्हणाला, “ मरेनात लेकाचे ते गोसावी ! कोणा लेकाला हवं त्यांच्या मेजवानींतलं उष्टं ! आणि पुण्याई-बिण्याई कांहीं म्हणाल तर तिचंहि तोंड पहा. आतां आमचे धनीच त्यांच्या नादाला लागले, तेव्हां आपण काय बोला ? पण मी या मठाचा मालक असतों तर या गोसाव्यांना धक्के मारून केव्हांच हांकून बाहेर काढलें असतें. आमचे धनी समोर आले म्हणजे तेवढ्यापुरते हे गोसावी म्हणजे जशी कांहीं गरीब गाय आणि भजन काय म्हणतात, जसे कांहीं लेकाचे आईबापांच्या पोटीं आले तेच रडायच्या ऐवजीं एकतारी वाजवीत ! पण धनी निघून गेले म्हणजे या गायींचीं तोंडं डुकराचीं होऊन घाण खायला बाहेर परेड करायला निघतात. काय तें त्यांचं बोलणं, चालणं, हसणं आणि खिदळणं ! यांच्या सगळ्या पैशांच्या आणि बायकांच्या गोष्टी. याच्याजवळ तर कफनी आणि कमंडलूशिवाय दुसरं कांहीं नाही. पण गोष्टी चालतात त्या शेंकडों हजारो रुपयांच्या ! जसे कांहीं एखाद्या श्रीमंत पेढीचे मुनीमच ! मी आपल्या जागीं आश्चर्य करतों कीं, गोसाव्यासारख्यांना या उठाठेवी कशाला ? मला तें समजावून कोण सांगणार ? पण सांगूं का बन्सीसाहेब, मला याच्याहून चीड आली ती बायकांचं ते बोलतात तें ऐकून. कोण कुठली मथुरा नावाची बाई त्यांच्या बोलण्यांत येते. ती नायकीण असावी; कारण पुष्कळ बुवांच्या नादीं नायकिणी शिष्यिणी म्हणून लागतात असं मला ऐकून माहीत आहे. ”

बन्सीधर मध्येंच म्हणाला, “ अरे, बरोबरच आहे. आपण लग्नाशिवाय राहून जन्मभर पाप करतों असं नायकिणींचं मन टोचीत असतं त्यांना आणि अशा एखाद्या साधूची कृपा झाली म्हणजे त्या पापाचं निराकरण होईल अशी त्यांची भोळी भाविक समजूत असते. आतां यांत कांहीं साधु त्यांच्या मनाला समाधान उत्पन्न करून देतील असे निस्पृह व सात्त्विक

असतात. पण असेहि कांहीं असतात कीं त्यांच्याबद्दल बोलण्यांत आपलीच जीभ विटाळायची. "

गिरधर पुढें म्हणाला, " मरो ती मथुरा कीं फतुरा ! मला तिच्याशीं काय करायचं आहे ? पण काय हो बन्सीसाहेब, आमच्या बिंबाताईचं नांव त्यांच्या भाषणांत कां हो निघावं ? आमचे धाकटे धनी त्या गोसाव्यांचे शिष्य झाले तशा कांहीं बिंबाताई झालेल्या नाहींत ! "

बन्सीधर म्हणाला, " मी तरी काय सांगूं ? पण गुरु आणि शिष्य हे भजनीं लागायला, तुझ्या धाकट्या धन्यानं आणि बिंबाताईनं वाटून घेतले असतील कदाचित्. पण तूं सांगतोस या हकीगतींवर विश्वास कसा बसावा रे ? तूं मुद्दाम कांहीं रचून सांगतोस असं मी म्हणत नाहीं. पण तूं सांगतोस त्या गोष्टी इतक्या चमत्कारिक वाटतात कीं, स्वतःच्या कानांनीं त्या ऐकल्याशिवाय त्यांवर पुरा विश्वास ठेवावा असं मन घेत नाहीं. "

" मग ऐका कीं तुम्हांला वाटलं तर आपल्या कानांनीं ! मात्र मीं ऐकलं तें सगळं तसंच्या तसं तुम्हाला ऐकायला सांपडेल कीं नाहीं कुणाला ठाऊक ? "

" अरे, काय सांपडेल तें सांपडेल. धुरानं वाऱ्याची दिशा तरी कळते. त्यांच्या मनांत काय विचार घोळतात याबद्दल यांच्या बोलण्यावरून थोडासा तरी सुगावा लागेलच. पण काय रे मला त्याचं बोलणं ऐकायला कसं मिळणार ? आणि तुला तरी तें ऐकायला मिळतं कसं याचं आश्चर्य वाटतं ! "

" ऐका सांगतों. मी या मठाचा रखवालदार असलों तरी फक्त दिवसाच तिकडं वावरतों. पण रात्रीं मोटारच्या तबेल्यांत जाऊन निजतों असं मीं या गोसाव्यांना भासवलंय्. पण त्यांच्या निजण्याच्या जागेला लागून उंचावर एक पोटमाळा आहे. त्यांत घरच्या जुन्या गाद्या, कापूस, काथ्या रचलेलीं असतात. म्हणून त्या माळ्यावर पावलं पडलीं तरी तीं वाजत नाहींत. तेव्हां मी हळूच रात्रीं मागच्या एका दादरानं चढून त्या माळ्यावर जाऊन निजतों, बसतों आणि तिथून बारीक फटीला कान लावले तर

त्या गुरुशिष्यांचं बोलणं ऐकायला तर येतंच; पण आंत उजेड असला तर ते काय करतात हेंसुद्धां बारीक नजरेनं पाहायला सांपडतं. "

" वा: ! छान बातमी सांगितलीस. मग आज व उद्यां दोन दिवस तूं माळ्यावरची आपली जागा मला देशील ? "

" घ्या कीं ! माझी तरी ती कुठली ? मी तबेल्यांत निजायचा तों चोरून जाऊन माळ्यावर निजतों इतकंच ! "

" मग हें ठरलं तर ! "

" हो, त्यांत काय ठरायचं ? तुम्हांला आपल्या कानांनीं कांहीं ऐकायला सापडलं तर तुमचा संशय तरी फिटेल. त्यांतून तुम्ही पोलिस अधिकारी ! माझ्या ऐकण्यापेक्षां तुमच्या ऐकण्याचा उपयोग तरी होईल. "

* * *

त्या रात्रीं नऊ वाजतां गिरिधर नेहमींप्रमाणं गोसावीबुवांना सलामी देऊन तबेल्याकडं निजायला जातो म्हणून सांगून गेला. थोड्या वेळानं बन्सीधरानें गिरिधरजवळची किल्ली घेतली होती, तिनें मागच्या दादराचं कुलूप काढून त्या पोटमाळ्यांत प्रवेश केला आणि मऊ गाद्या पडल्या होत्या त्यांवर उशाला हात घेऊन बारीक फटीला कान लावून तो निजला. मात्र त्यानं दोन वस्तू आपणाजवळ ठेवल्या होत्या. बहिरट लोक बोलणं ऐकण्याला कानाला लावतात तो जाळीदार कर्णा, आणि खिशांत त्याचं पिस्तूल.

रात्रीची निजानीज होऊन सामसूम झाल्यावर मठाचं पुढचं दार नीट बंद झालंसं पाहून, जम्बू आणि संध्याकाळीं आलेला यात्रेकरू हे दोघे, कावडीवरचीं कापडी आच्छादनें काढून आंतून कांहीं जिन्नस घेऊन, आंतल्या खोलींत गुरुमहाराजाशेजारीं बसले आणि मग तिघांचं बोलणं सुरू झालं.

गुरुमहाराज त्या कावडीवाल्याला म्हणाले, " अरे, तूं आज अिकडं कसा कुठं उमटलास ? "

" न येऊं तर काय करूं ? थोरामोठ्यांचा आश्रय करून तुम्ही दोघे इथल्या सुखांत बाहेरचं जग विसरला, तुमची अलीकडं कांहींच बातमी कळेना. तेव्हां मथुराराणीनं मला मुद्दाम तुमच्या शोधाला पाठविलं. 'मनुष्य

सुखासीन झाला म्हणजे आत्मस्वरूपाची ओळख विसरतो हें तुम्हां साधु भोन्दू वेदान्ती लोकांचं एक ठरीव वाक्य आहे, नाहीं का ? आणि तुमच्या नादीं लागलेल्या इथल्या तरण्या घरधन्याला तें तुम्ही मधून मधून ऐकवीतही असाल, आपलं साधुपण पटवायला ! पण तुम्ही स्वतः आत्मस्वरूप विसरलेले दिसतां. तेव्हां तें पुन्हा ओळखून मुक्ति मिळवावी, म्हणजे इथून पळून जावं, असं सुचवायला मी आलों आहें. "

"पण आमचा नक्की शोध तुला कसा लागला ? "

"वा ! तुम्हांला बाहेर किती कीर्ति लाभली आहे हें तुम्हांला काय माहीत ? या आसपासच्या पंचवीस कोसांत वाट चालतांना जिथं-तिथं तुमची कीर्ति ऐकली. "

"ती काय बुवा ? "

"कीर्ति ही कीं, नवलपूरच्या मोठ्या जमीनदाराच्या मुलाला दोघा गोसाव्यांनीं फार मोठे चमत्कार दाखविले. म्हणून त्यानं आपल्या घरचा मठ करून त्यांत तुमची स्थापना केली आणि स्वतः वैराग्य घेतलं. तोहि हळुहळू गोसावी बनण्याच्या पंथांत आहे म्हणे ! पण तुमची दाढी दोन वर्षांत वाढली तितकी त्याची दोन महिन्यांत कशी वाढणार, असं मी आपल्या ठिकाणीं म्हणत होतों. पण मला वाटतं कीं, आतां तुम्ही ही इथली बुवाबाजी आवरती घ्यावी आणि चालायला लागावं. पोलिसांनीं फत्तरगढच्या खजिन्याच्या लुटीचा पुरा शोध लावलाय् व ठिकठिकाणीं गुन्हेगार नि साथीदार यांची धरपकड त्यांच्याकडून लवकरच होणार आहे असं समजतं."

"आम्हीहि आपल्या ठिकाणीं त्याचा विचार करतोंच आहों. पण म्हणतात ना, श्रीमंताच्या घरांत पाऊल पडायचं जितकं कठीण तितकंच आंत पडलेलं पाऊल बाहेर निघायचं कठीण ! हा कसला मठ ? मला तो तुरुंग झाला आहे. माझा अजून कुणाला संशय आला नाहीं खरा. पण माझी बरदास्त ठेवण्याकरितां का होईना, घरधन्याचं माणूस इथं अष्टौप्रहर मठपहाऱ्यावर राहतं. मी आलों त्यापेक्षां बाहेर निघतांना गाजावाजा अधिक होईल. कारण आर्धी माझा शिष्य झालेला हा घरधनी सहसा सोडायचा

नाहीं आणि त्यानं जाऊं दिलं तरी निरोपाचे सत्कारसमारंभच किती दिवस तरी चालतील. ”

“ फार छान ! आणि हे सत्कारसमारंभ सुरू असतां किंवा या मठांत गुरूची गादी स्थापून तूं बसलेला असतां पोलिसांनीं येऊन तुला पकडून हातकडय़ा घातल्या म्हणजे चांगलीच शोभा होईल ! ”

“ आणि पळून जायचं म्हटलं तरी पुढं कोणत्या मुलुखांत जावं याचा विचार करतों आहें. म्हणूनहि जागचा पाय लवकर निघेना. इथून कुठं जावं याचा सल्ला कांहीं देशील कीं नाहीं ? ”

“ सल्ला काय द्यायचा ? इथून तीस-पसतीस कोसावर रामगड संस्थानाची हद्द लागते. ती रियासत मुसलमानी आहे. तिथं पोलिसचे पाश तुला येऊन चिकटण्याला फार प्रयास पडतील. बरं, पण इथं तुम्ही सुग्रास खाल्लां, प्यालां. पण इथंहि कांहीं करामत दाखवून इथली कांहीं आठवण बरोबर नेण्याचा बेत आहे कीं हात हलवीत जाणार ? ”

“ तोहि विचार अगदींच नाहीं असं नाहीं. इथल्या आठवणीच्या वस्तु म्हणून कांहीं निर्जीव पण कांहीं सजीवसुद्धां नेण्याचे बेत मनात चालू आहेत. ”

“ निर्जीव समजलों. पण सजीव म्हणावं तर तुमच्या कपडय़ांतल्या ढेकणा–कृमिकीटकाशिवाय दुसरं काय नेणार ? ”

“ वाः ! तें काय म्हणून ? गुरूनं शिष्याकडून पराभवाची इच्छा करावी म्हणतात आणि जम्बूचं मनासारखं साधलं तर तो इथली एखादी सजीव चालती-बोलती आठवण बरोबर घेऊन जाण्याचा संभव आहे. पण अडचण हीच वाटते, कीं पळून जायला आम्ही दोघेच दोघे. शिवाय हातांत हत्यार पात्यारहि कांहीं नाहीं. तूं मघाशीं म्हणालास तसं आमचं आत्मस्वरूप दाखविण्याचाहि प्रसंग यायचा ! पण हातांतल्या या नुसत्या काठीनं काय होणार ? ”

“ एकूण मथुराराणी तुझ्यापेक्षां शहाणी खरी. कारण तुझ्यावर आलेलं हें ऐश्वर्याचं संकट तिनं ऐकलं आणि म्हणूनच तिनं तुमच्या सटकेंत मदत

व्हावी म्हणून माझ्याबरोबर ही भेट पाठविली आहे." असं म्हणून त्यानं बाहेरच्या खोलींतून कावडींतून काढून आणलेल्या जाड कपड्याच्या दोनतीन लांबट गुंडाळ्या सोडल्या. आंतून दोनतीन लहान पण पाणीदार जंबिये आणि दोन पिस्तुलें निघालीं. गुरुमहाराज आश्चर्यचकित झाले. ते म्हणाले, "धन्य आहे मथुराराणीच्या दूरदृष्टीची ! पण हें तूं सगळं संभाळून कसं आणलंस वाटेनं ?"

"वैराग्यापेक्षां कावडीवाल्या यात्रेकरूचं सोंग अशा कामाला सोयीचं असतं. तुम्हा गोसाव्यांना आपल्या चामडी आसनांत अशा वस्तु लपवायला कठिण. कावडीवाल्याला अशी सोय असते कीं, आधीं बाहेर कामट्याच्या कावडी. त्याचं झाकण काढल्यावर आंत तांब्याच्या पत्र्याच्या झाकण-बंद गिंड्या असतात आणि त्यांत तीर्थ असतं या समजुतीनं कोणी मनुष्य त्याला हात लावीत नाहीं. यामुळं गिंड्यांच्या पोटांतले जिन्नस चांगले लपवितां येतात."

"मग हें ओघालाच आलं कीं तूं आमच्याजवळच दोन-तीन दिवस राहा, म्हणजे तोंपर्यंत या जिनसा कावडींत अशाच गुप्त राहातील आणि रात्रीं पळून जायला दोघाचे तीन होतील."

"ठीक आहे; पण तुझा शिष्य आमच्याबरोबर येणार, कीं बरोबर सजीव न्यायचं म्हणून वेगळ्या रीतीनं वेगळ्या वाटेनं जाणार ?"

"तें आजच सागतां येत नाहीं. कदाचित् तें सजीव नेण्याकरितां वाहनाची सोय झाली तर आपणा सर्वांना एकदमच जातां येईल !"

"पण आतां उशीर मुळींच खपणार नाहीं हें मात्र मी सांगतों. पोलिस आमच्या तपासांत असत, तसे आम्हीं त्यांच्या तपासांत असतों. त्यावरनं मला कळलं आहे आहे कीं पोलीस अधिकारी खालसांतलीं तशींच संस्थानांतलीं वॉरंटं खिशांत घालून आसपास हिंडतात. तूं या मठात येऊन पडलास ही एका तऱ्हेनं जशी अडचण झाली तशी सोयहि झाली म्हणावी. कारण एरवींच्या ठिकाणासारखे सर गंगारामांच्या या वाड्यांत पोलीस अधिकाऱ्यानाहि आपले बेत घसमुसळेपणानं अंमलांत आणतां यायचे नाहींत.

स्वतः सर गंगाराम हे ऑनररी मॅजिस्ट्रेट आहेत. पण त्या हुद्याचीच एखादी वेळ पोलिसांना अडचण व्हायची ! "

शेवटीं गुरुमहाराज म्हणाले, " याचा मी विचार करून रात्रीं तुला काय तें नक्की सांगतों."

हे दोघे-तिघे आपआपल्या खोलींत निजावयास गेल्यावर बन्सीधरहि मागच्या दादरानं खालीं उतरला, आणि हळूच जाऊन आपल्या खोलींत निजला.

सकाळीं उठल्यावर चहाच्या वेळीं त्यानं आपले डोळे चोळीत रात्रीं जागरण झाल्याचं सोंग चागलं वठाविलं आणि न पाहावयाला गेलेल्या नाटकाच व नाटकगृहाचं वर्णन त्यानं तिखटमीठ लावून सांगितलं. कारण त्याला खात्री होती कीं ऐकणारापैकीं कोणीहि काल रात्रीं नाटक पाहायला गेलं असण्याचा मुळींच संभव नाहीं.



## चंदूचें गुप्त संशोधन : : : २०

मधून मधून रात्रीच्या वेळीं दारें लावून घेऊन मेरीचें पत्र व तिच्या मृत्यूची तार हीं पुनःपुन्हा हातीं घेऊन चंदु बसे. तेव्हां त्याच्या मनांत असा विचार येई कीं मेरी मेली खरी; पण तिच्या मरणाला खरें कारण काय झालें, ती कशानें कितपत किती दिवस आजारी होती, शेवटीं ती कुणाकडे होती, तिच्या पश्चात् तिचें कोण आहे, इत्यादि गोष्टींची कांहीं विश्वसनीय माहिती मिळवावी. म्हणून एक दिवस तारेचा फॉर्म हातांत घेऊन तो तार लिहूं लागला. पण प्रथम कुणाच्या नांवें व कुठें तार करावी या विचाराशीं तो अडला.

ता. १२ ऑगस्टचें मेरीचें स्वदस्तुरचें पत्र होतें. तें अक्षर त्याच्या ओळखीचें म्हणून तें पत्र तिनेंच लिहिलें याविषयीं शंकाच नव्हती. पण पत्त्याकरितां पत्र पुन्हा नीट पाहतां त्यावर पत्ता लिहिलेला नाहीं हें त्याच्या

ध्यानांत आलें. नंतर तार पाहिली तों तीवर तार करणाराची सही नाहीं. तारेवर ती पाठविणाराच्या घरचा पत्ता बहुधा नसतो. नुसत्या गांवाचें नांव असतें. त्याप्रमाणें या तारेवर लंडन हीं अक्षरें होतीं. पण सहीहि नसावी हें काय? एवढी आठवण ठेवून खर्च करून तार पाठविणारा तो आपलें नांव कां घालणार नाहीं? तो काय आणखी एकदोन शब्दाच्या हंशीलाला भिईल? आपण होऊन तार पाठविणारा कोणी स्नेही अगत्यवाटीच असणार! मग नाव कळविल्यानें अगत्यवादाच्या जिव्हाळ्यांत भरच पडते नव्हे का?

कसेंहि असो, तारेंतील मजकुरासंबंधानें उलट जबाब म्हणून आणखी माहिती मागविण्याकरितां कोणाला लिहावें हें त्याच्या लक्षांत येईना. बरें, मेरीच्या पत्रावर पत्ता असता तरी काय झाले? त्या पत्त्यावर लिहावयाचें म्हटलें तरी ती मेल्यावर आतां त्या पत्त्यावर कुणाला लिहावयाचें? स्वतः तिला पत्रोत्तर लिहावयाचें असतें तर त्या पत्त्याचा उपयोग झाला असता.

या कामीं पत्रें लिहून माहिती मागविण्यासारखे, म्हणजे चंदूकरिता माहिती काढून पाठविण्याचे श्रम घेण्यास मागें पुढें पाहणार नाहींत असे चंदूचे काहीं मित्र लंडन व ऑक्सफर्ड येथें होते. पण त्यांना लिहून माहिती मिळण्याचा संभव बराच कमी असें चंदूला दिसत होतें. कारण यातील कांहीं थोड्या स्नेह्यानींच क्वचित प्रसंगीं चंदु व मेरी याना एकत्र पाहिलें असेल, व त्यानें औपचारिक रीत्या त्यांची तिची ओळख करून दिली असेल. तरी ती राहते कोठें हें त्यांना माहीत असण्याचा संभव नव्हता. तिच्या राहत्या घरीं आपल्या कोणा स्नेह्याला घेऊन तो कधींच गेला नव्हता आणि खरेंच म्हटलें तर त्यांना असें घेऊन घरीं जाण्याला तिचें घर तरी कोठे होतें?

तारेवर सही नाहीं हें लक्षांत आल्यावर चंदूच्या मनांत असा एक संशय चमकून गेला कीं, ही तार खोटी तर नसेल? म्हणजे मेरी खरोखर मेली नसतां तिच्या वाईटावर असलेल्या, किंवा माझें शत्रुत्व मनांतून करणाऱ्या, कोणा फाजील दुष्ट मनुष्यानें मला ही तार केली असेल काय? याच्याहि पलीकडची एक शंका त्याच्या मनांत चमकून गेली. पण ती वरच्या कल्पने-

हून कमी वेळ टिकली आणि त्या कल्पनेनें चंदूला स्वतःचें हसूं आलें. एखादी कल्पना इतकी असंबद्ध किंवा मूर्खपणाची असते कीं, ती मनात आल्यानें दुःखी मनुष्यालाहि हसूं यावें. तारेवरून चंदूला सुचलेली विक्षिप्त कल्पना अशी कीं, ही तार स्वतः मेरीनेंच केली असेल तर त्यांत तिचे हेतू काय असूं शकतील ? तिचा स्वभाव थोडा थट्टेखोर व थोडा विनोदी होता हें त्याला माहीत होतें. पण असली जीव जाण्याची किंवा वेळीं दुसऱ्याचा जीव घेण्याची ही थट्टा कोणी विनोदी झाला म्हणून करण्याचें धारिष्ट करील? पण त्याचा तरी नेम काय सांगावा ?

तारुण्याच्या खेळीमेळींत कित्येक वेळां विनोदाला मर्यादा राहात नाहीं.मेरी कदाचित् मनांत म्हणाली असेल, 'इकडे हिंदी तरुण येतात,गोडगोड बोलतात, लग्नाचीं वचनेंहि देतात, कुमारिकांना नादीं लावतात. पण त्यांच्या मनांत खरं प्रेम किती आहे याची परीक्षा कशानें होणार ? विलायतेंत असतांच लग्न झालें तर ठीक, प्रश्न मिटला. प्रेमाची, विश्वासाची परीक्षा झाली. पण इंग्रज तरुणी राहिली विलायतेंत आणि हिंदी तरुण गेला हिंदुस्थानांत ! मध्यें अन्तर पडलें पांच हजार मैलांचें ! आणि तारा-पत्रांना थोडी झुकांडी दिली म्हणजे सगळें संपलें. तेव्हां या तरुणांची प्रेमपरीक्षा करायची तर असली भलती तार करूनच खरी पाहतां येईल. ती अशी कीं या अशा तारेवर कोणत्या प्रतिक्रिया घडतात हें दिसून येईलच.'

पाण्याची खोली अजमावावयाची एक रीत अशी असते कीं पाण्यांत खडा टाकावा आणि तो तळाला पोचून बुडबुडे वर येण्याला किती वेळ लागतो हें पाहावें. माझ्या प्रेमाचा ठाव पहाण्याला मेरीनें हा तारेचा खडा टाकून पाहिला असेल काय ? समजा, मी या तारेनें भिऊन जाऊन दुःखी होऊन तिची विशेष चौकशी तावडतोब केली तर त्यावरून माझें मनोगत तिला अजमावतां येईल. पण मी खिशांत तार घालून बसलों, चौकशी कांहींच केली नाहीं, तर मीं तिला खोटें प्रेम दाखविलें असें अनुमान उघड ठरेल. मग पुढें काय होईल हें तिचें मन जसें असेल त्यावर अवलंबून. तिचें खरें प्रेम असेल तर ती या विश्वासघातानें दुःखी होईल आणि

तिचेंहि प्रेम असें तसेंच असेल तर ती म्हणेल, ‘ बरी आयती ब्याद गेली ! ’ स्वतः वचनांतून मोकळी होऊन माझ्यावर उलट शह ठेवण्याला तयार !

ही विक्षिप्त कल्पना त्याला आवडली नाहीं. ‘ मेरीच्या मनाची अशी परीक्षा करणें मला किंवा तिला शोभतें काय ? ’ पण कल्पना आलीच, आणि तिचें निराकरण संपूर्ण समाधानकारक रीतीनें करावयाचें तर, या तारेंतील मजकुराची छाननी करण्याकरतां एक पत्र दुसऱ्याला तर एक तिच्याहि नांवावर पाठवावें. आपल्या हातीं असलेली तार ही या विक्षिप्त पत्राला भरपूर जवाब किंवा आधार होईल किंवा थट्टेला थट्टेचें उत्तर मिळेल.

अशा सर्व बाजूंनीं विचार करून चंदूनें पत्रें पाठविलीं तीं अशीं. एक पत्र उदयशंकरला लिहिलें. त्याच्या पोटीं इकडे आलेल्या तारेची प्रत ठेऊन चंदूनें त्याला लिहिलें कीं, ‘मेरी वोडहाऊसची माहिती तुला फारशी असण्याचा संभव नाहीं. तथापि माझ्या संगतींत असतांना तूं तिला केव्हां पाहिलेली असण्याचा संभव वाटतो. तरी पोस्टाच्या टेलिफोनची डिरेक्टरी पाहून किंवा सुचेल ती उपाययोजना करून मिळेल ती माहिती पाठविण्याची कृपा कर. ’

त्यानें दुसरें पत्र मार्बल आर्च पोस्ट ऑफिसच्या मास्तराला लिहिलें. त्यांत मजकूर असा—‘ आपणाला मी एक अनोळखी माणूस पत्र लिहून त्रास देत आहें खरा; पण त्याची क्षमा करा. तुम्हांला पत्र लिहिण्याचें कारण मला आलेल्या सोबतच्या तारेच्या नकलेवरून कळून येईल. कांहीं थोडे दिवसापूर्वी या तारेंतील मेरी वोडहाऊस या स्त्रीला मीं तीनशें पौंड तारेनें पाठविले ते ‘ केअर ऑफ पोस्टमास्तर, पोस्ट ऑफिस मार्बल आर्च ’ या पत्त्यावर तिनें मागवले म्हणून पाठविले. ती रक्कम देतांना तुम्ही तिची कांहीं ओळख पटवून घेतली असेल; तरी त्या ओळखीच्या सुगाव्यावर या स्त्रीची कांहीं माहिती मला देऊं शकाल तर फार आभारी होईन.’

त्यानें तिसरें पत्र केंट परगण्यांत नेव्हलपोर्ट या गांवीं ‘ मिऱ्याकल ’ या

घरीं पाठविलें. पण तें कोणाच्या नांवावर पाठवावें हें माहीत नसल्यानें त्यानें पत्ता लिहिला तो असा—

'Next best friend of Mary Woodhouse, Miracle, Post Navalport, county Kent, England.'

त्यानें चौथें पत्र युनियन चर्चच्या अधिकाऱ्याला पाठविलें.

आणि पांचवें पत्र पाठविलें तें सर्वांत अधिक माहिती मिळण्याच्या विश्वासानें. कारण तें त्यानें यंग वुइमेन्स ख्रिश्चन असोसिएशनच्या पत्त्यावर सेक्रेटरी एल्. एन्. पेरी इच्या नांवानें पाठविलें. एलेन पेरी ही मेरी वोडहाऊसची दूरची पण माया करणारी नातलग असून, ती यंग वुइमेन्स असोसिएशनची एक सन्मान्य सेक्रेटरी होती. लंडन व ऑक्सफर्ड येथील मुक्कामांत शेवटच्या वर्षी त्या दोघींची व चंदूची अनेक वेळीं गांठ पडत असे. एलेन पेरी ही भाविक, धार्मिक वृत्तीची, पण स्वभावानें विनोदी व बरीच वक्रोक्तिप्रिय असे आणि कोणाला लावून मर्मभेदक बोलणें तिला फार साधे. स्वतः ती जुगार, सिनेमा इत्यादिकांविरुद्ध असून मेरीलाही आपल्या ध्येयाकडे वळवून घेण्याचा तिचा उघड प्रयत्न असे. मेरीच्या पोरकट, थिल्लर, उल्लू स्वभावाचें तिला वाईट वाटे आणि तिनें चंदूबरोबर लग्न करून किंवा करण्याला हिंदुस्थानांत जाण्याची गोष्ट निघाली म्हणजे एलेन पेरीनें माना हलहलवून म्हणावें-- ' छेः छेः ! ती गोष्ट कालत्रयीं घडणें शक्य नाहीं. मेरी हिंन्दुस्थानाला जाते ? वाट बघा ! मी तिला माझी शिष्यिण आणि जोगीण बनविणार आहें ' आणि एलेननें असें म्हटल्यावर सर्वजण थट्टेनें हसत. मग चंदूनें किंचित् पडका चेहरा केला म्हणजे मेरी एलेनच्या देखत त्याच्या गालाचें चुंबन घेई आणि म्हणे, ' आतां तरी खात्री पटली ना, मूर्ख पोरा ! ' या व या प्रकारच्या इतर अनेक आठवणी एलेन पेरीबद्दलच्या चंदूच्या स्मरणांत ताज्या होत्या.

नाहीं होय म्हणतां म्हणतां मनाचा हिय्या करून त्यानें स्वतः मेरी वोडहाऊसलाहि एक विनोदी पत्र लिहिलें तें असें—

" तुला मरण आल्याची शुभ वार्ता तारेनें कळवलीस याबद्दल तुला

बक्षीस काय देऊं ? विनोदाला झाली तरी कांहीं सीमा असावी. तुझा हेतू ही तार करण्यांत माझी कुचेष्टा करण्याचा होता, कीं माझी सत्त्व-परीक्षा करण्याचा होता ? कसेंही असो. तूं इकडे आल्यावर तुला हा गुन्हा माफ होईल. गुन्हेगाराला फार तर क्षमा केली म्हणजे जास्तींत जास्त दया दाखविली असें होतें. पण तूं आलीस तर तुला क्षमा मिळून वरती बक्षीसहि मिळेल. त्या बक्षिसाचा हवाला मात्र मी अंतराळांत फिरणाऱ्या कोणा पक्ष्याला देणार नाहीं. कारण पक्ष्याशीं संबंध ठेवल्याची अद्दल मला चांगली घडली आहे. पण ती मौजेची हकिगत तूं येशील तेव्हांच समक्ष सांगेन. तारेला जाब तारेनेंच द्यावयाचा. पण तुझ्याइतकी विनोदगर्भ तार थोडक्यांत लिहिण्याची पात्रता मला नाहीं. तुझी असेल तितकी विनोद-प्रकृतीहि या क्षणीं मजजवळ नाहीं. ”

चंदूनें हीं पत्रें लिहिलीं; पण कदाचित एल्. एन्. पेरीखेरीज इतर कोणाचाहि खरा उपयोग होईल असें त्याला वाटत नव्हतें. पण निराश मनुष्याला निर्विकार बुद्धि चालवून अगदीं युक्तिसिद्ध असें वागतां येत नाहीं. त्यानें पत्रें लिहिण्याचा हा जो उद्योग केला त्याला एकच दाखला सुचतो. तो असा—एखादे वेळीं समुद्रावर वादळ होऊन एखाद्या नावेला अपघात होतो, सुकाणूं मोडतें, शिडें अवजारें फाटून जातात, डोलकाठी कोसळून पडते, फक्त एखाद दुसरें मोडकें तोडकें वल्हें शिल्लक उरतें. त्याच्या साधनानें अथांग समुद्रावर वाऱ्याच्या आधीन होऊन नाव व नावाडी असहाय स्थितींत वाहत जात असतात. त्यांनीं साहाय्य कोणाला कसें मागावें ? आणि निरोप पोचल्याशिवाय तें देण्याची बुद्धि कोणाला व्हावी ? मग नावाडी अशी युक्ति करतात. आपली स्थिति लिहून साहाय्य मागण्याचें विनंतिपत्र, दोन चार प्रति करून, दोन चार बाटल्यांत घालून तोंडें पक्कीं बंद करून त्या समुद्रांत फेकून देतात. दैवानें समुद्रांतच किंवा किनाऱ्यावर कोणाच्या हातीं त्यांतली एखादी बाटली लागली तर कुमक येण्याचा संभव. पण अशा बाटल्यांचा उपयोग झाल्याचीं उदाहरणें विश्वसनीय अशीं नमूद आहेत ! आज चंदूनेंहि तोच मार्ग स्वीकारला होता.

उदयशंकरचें उत्तर आलें तें असें —

"तूं पास झाल्याची तार मीं केली त्याबद्दल आभारप्रदर्शक तार केलीस ती पोंचली. त्यानंतर तुझें पत्र आलें. पण त्यांतील विषयाची माहिती तुला कळविण्यासारखी मिळाली नाहीं याचें वाईट वाटतें. मात्र मी आपल्याकडून माहिती काढण्याची कांहीं कसूर केली नाहीं. तूं पत्रांत लिहिलेल्या नांवाच्या मुलीची व माझी ओळख तू येथें असतां केव्हां करून दिल्याचें मला चांगलें स्मरत नाहीं. कदाचित् करून दिलीहि असशील. पण मी ती विसरलों असेन. कारण विलायतेंत रस्त्यावर उभ्या उभ्या करून दिलेल्या ओळखी या गीतेत सांगितल्याप्रमाणें, महापुरांत वाहून येतांना एकमेकांना क्षणांत भेटून दूर जाणाऱ्या गवताच्या काड्या-प्रमाणें होत. पण मला सांग कीं, इकडे आय्. सी. एस. सारख्या एखाद्या दुसऱ्या गुप्त सामाजिक परीक्षेला तूं बसला होतास कीं काय? आतां बसला असलास तरी तूं ती गोष्ट या कानाची त्या कानाला कळूं दिली नाहींस याचें आश्चर्य वाटत नाहीं. कारण तुझा गंभीर मर्यादशील स्वभाव आम्हाला माहीत आहे. तारेंत लिहिलेल्या मेरी बोडहाऊसशीं तुझें प्रेम जडलें असलें तरी तें तूं शक्य तेवढें गुप्तच ठेवलें असतेंस. तें आपल्या अंगरख्याच्या बाहीवर एखाद्या बिल्ल्याप्रमाणें लावून मिरविलें नसतेंस हें खास. इकडे दोन प्रकारचे तरुण हिंदी विद्यार्थि मला आढळतात. एक प्रकार असा कीं, त्यांच्या प्रेमाचा बॉम्ब गुप्तपणें 'टाइम फ्यूज' लावून ठेवलेला असतो, व त्या बॉम्बचा स्फोट झाला म्हणजे मगच तो कोठें तरी होता असें लोकांना कळतें. मला वाटतें तूं बॉम्बच्या उद्योगांत इकडे पडला असलास तरी तुझा बॉम्ब वरील प्रकारचा असणार! दुसरा एक वर्ग असा असतो कीं, तो सहज आपल्या बरोबर बोलत चालत जाणारी कोणतीहि तरुण इंग्रज मुलगी जणू कांहीं आपली खास प्रियतमा आहे आणि तिच्याशीं पूर्वीं लग्न झालें नसलें तरी तें लौकरच होईल, असें तो आपल्या हिंदी मित्रांना भासविण्याला चुकत नाहीं. यामुळें त्याच्याशीं वरचेवर गांठ पडणाऱ्या मित्राला असा भ्रम पडतो कीं हा मर्द एक डझन इंग्रज बायका करून बरोबर नेणार आहे कीं

काय.? कारण हिंदुस्थानांत जाऊन त्यांनीं एखाद्या विधीनें धर्मान्तर केलें म्हणजे त्या डझन मुलींशीं त्याला कायदेशीर लग्न करतां येईल. पण खरी वस्तुस्थिति अशी असते कीं त्यापैकीं एकहि याला बुटाच्या टोकानें देखील स्पर्श करणार नाहीं. असो. मेरी वोडहाऊस या नांवाच्या मुलीशीं तुझा काय संबंध होता याची मी अधिक चौकशी करूं इच्छित नाहीं. पण मनुष्य एखादें नांव ध्यानांत ठेवून चौकशीच करूं लागला म्हणजे तें इतर रीतीनेंहि डोळ्यां-पुढें आलें तरी मनाला तेथल्या तेथें थोडा तरी अटकाव करतें. परवां ' सन्डे न्यूज ' नांवाचें सचित्र साप्ताहिक वाचीत असतां त्यांत एक चित्र आढळलें. तें मीं कापून घेतलें आणि तेंच तुला पाठवीत आहें. त्यावरून कांहीं कळतें का पहा ! नांवासारखीं नांवें अर्थात् पुष्कळच असतात. पण हें चित्र असल्यामुळें ओळखीला हवें तें निर्णायक गमक मिळेल. या चित्रा-खालीं मेरी वोडहाऊस व टॉम कूपर याचीं नावें दिलीं असून या दोन सिनेमाताऱ्यांचें लग्न नुकतेंच झालें आहे, व एक विख्यात सिनेमाकंपनी त्यांच्याशीं नोकरीचा करार करून त्यांना ऑस्ट्रेलियाला घेऊन जात आहे असा मजकूर आहे. त्या शकुनवंतींत तुझ्या प्रश्नाला कांहीं जाब मिळाला तर पहा. माझ्या स्थानिक चौकशींत मात्र मला या मेरीची कांहीं माहिती मिळाली नाहीं. उलट शंका अशी आली कीं ऑगस्ट २७ मंगळवार रोजीं मेलेली व २८ बुधवार रोजीं स्मशानांत पुरलेली ही मेरी खास नव्हे. कारण यांच्या लग्नाच्या प्रसिद्धीची तारीख या मृत्युतिथीनंतरची आहे. तुझी प्रोबेशनर म्हणून नेमणूक कोणच्या जिल्ह्यांत झाली ? यापुढील तुझ्या अधिकाराची बढती लिहितांना तूं, एका सुप्रसिद्ध सिव्हिलियनाप्रमाणें, हिंदी लोकांना शिक्षा देण्याचे वाढते अधिकार कोणते मिळाले या शब्दां-नींच बहुधा लिहिशील. तुझी बढती म्हणजे तूं हिंदी गुन्हेगारांना करशील त्या दंडाच्या व तुरुंगवासाच्या शिक्षेची बढतीच ठरेल."

' मार्बल आर्च 'च्या पोस्ट मास्तराकडून उत्तर आलें तें असें—"तुम्हीं पाठविलेल्या तीनशें पौंडाच्या तार-मनिऑर्डरीचा बटवडा या पोस्ट ऑफि-सांतून झाला. पैसे घेणाऱ्याचें नांव मेरी वोडहौस होतें. तिची ओळख

सांगण्याकरितां या भागांतील मिड्लन्ड बँकेच्या शाखेंतला एक माहीतगार नोकर आला होता. त्या ओळखीवरून व तिची सही घेऊन रक्कम देण्यांत आली. या तारांशिवाय तिच्या नांवचीं पत्रें या पोस्ट ऑफिसच्या पत्त्यावर केव्हां आलेलीं बटवडा करणाऱ्या टपालवाल्यांना (पोस्टमनना) आठवत नाहींत. याहून अधिक माहिती इकडून तुम्हांस मिळण्याचा संभव नाहीं."

लंडनमधील यूनियन चर्चच्या मुख्य अधिकाऱ्याला चंदूनें पत्र लिहिलें. त्याला जबाब आला तो असा—"तुमच्या पत्रांतील मजकूर वाचून आश्चर्य वाटलें. कारण मेरी वोडहाऊस या नांवच्या एका स्त्रीचा तुमच्या पत्रांत लिहिल्या तारखेला या चर्चमध्यें एक धर्मविधी झाला खरा. पण तो तिचा प्रेतसंस्कार म्हणजे दफनविधी नसून लग्नसंस्कार होता! लग्नाच्या रजिस्टरांत त्या तारखेला एकच लग्न नोंदलेलें असून त्यांतील वधूवरांचीं नांवें टॉम कूपर व मेरी वोडहौस अशीं आहेत. यावरून तुमच्या हें लक्षांत येईल कीं कोणीतरी तुमचे पाय ओढून तुम्हांला बनवूं पहात आहे. यांतच दुसरा संभव तुम्हीं मला बनविण्याचा! पण त्याला कांहींच कारण नसल्यानें मी ती कल्पना ग्राह्य मानीत नाहीं. लग्न रजिस्टर हा सार्वजनिक स्वरूपाचा कागद असल्यामुळें तुम्हीं योग्य ती फी व खर्च पाठविल्यास त्याची सर्टिफाईड नक्कल मी तुम्हांस पाठवूं शकेन. आयुष्याच्या विम्याची रक्कम वसूल करण्याचा कांहीं कट असल्यास त्याविषयीं या तारेवरून सावधगिरी ठेवावी."

केन्ट परगण्यांतील नेव्हलपोर्ट या गांवच्या पोस्ट मास्तराचें लिहून आलें कीं, "या गांवीं 'मिऱ्याकल' या नांवाचें घर आहे असें ऐकून तें आम्हांला मिऱ्याकलच म्हणजे आश्चर्यच वाटलें. कारण या गांवचें पोस्ट ऑफिस मजकडे दहा वर्षें असून या गांवांतील शंभर घरांपैकीं प्रत्येक घर न् घर माझ्या ओळखीचें आहे म्हणा ना! मेरी वोडहौस या नांवाची स्त्री व तिचा 'नेक्स्ट् बेस्ट फ्रेंड' यापैकीं कोणाचीच कोणास माहिती नसल्यामुळें तें पत्र डेड लेटर ऑफिसकडे रवाना केलें. एखाद्या मृताच्या आत्म्यानें तेथें जाऊन वाटल्यास चौकशी करावी."

शेवटला जबाब एल्. एन्. पेरीकडून आला होता. पण तिला चंदूचें पत्र पोचण्याला वेळ लागता तर तो जबाब आला नसता ! असो.

एल्. एन्. पेरीकडून आलेलें पत्र असें होतें—

" तुमचें पत्र टल्ले खात खात शेवटीं परवां माझ्या हातीं आलं. इथें विचारा, तिथें विचारा, अशा अक्षरांचे पाकिटावर मागेंपुढें इतके शेरे पडले होते कीं, त्याला इजिप्तमधील जुन्या ' इस्टिका ' लेखाचें स्वरूप आलें होतें. पण तुमचें सुदैव कीं, परवां तें पत्र माझ्या हातीं येऊन मला आज उत्तर लिहून टाकतां येत आहे. नाहींतर उद्याच्या बोटीनें मी अमेरिकेला रवाना झालें असतें म्हणजे तुमचें पत्र ' डेड लेटर ऑफिस 'मध्येंच जाव-याचें ! अमेरिकेची माझी सफर अगदीं अचानक ठरली एवढी गोष्ट मात्र खरी. तुमचें क्वचित् एखादें पत्र मला येण्याचा संभव वाटत होता. पण तुमचा माझा पूर्वीचा पत्रव्यवहार नाहीं. माझा पत्ताहि तुम्हांला पक्का माहीत असण्याचें कारण नाहीं. यामुळें जरा अडचणच वाटत होती खरी.

" पण खरें सांगावयाचें तर मेरी वोडहाऊसच्या बाबतींत तुम्हाला कांहीं लिहावें असें मनाला वाटेच ना ! प्रथम त्या तारेचा अर्थ मला दिसतो तो थोडा तुम्हाला समजावून सांगितला पाहिजे. कारण मला तरी तिच्यांतले शब्द लिहिणारानें मुद्दाम लाक्षणिक अर्थानें घातलेले दिसतात. कसे तें पाहा—'मेरी वोडहाऊस त्या पहाटे साडेतीन वाजतां मृत्यू पावली असें लिहिलेलें आहे. पण ती खरोखरी शरीरानें मृत्यू पावली नाहीं, तर शीलानें–चारित्र्यानें मृत्यु पावली ! कारण अखेरपर्यंत तुमच्याशीं लग्न कर-ण्याचा देखावा दाखवून नकळत काल पहाटे तीन चार वाजतां ती आपल्या एका लफंग्या प्रियकराचा हात धरून घरांतून पळून गेली. पुढच्या वाक्यांत असें लिहिलें आहे कीं, सकाळीं नऊ वाजतां युनियन चर्चमध्यें तिला पुर-ण्यांत आलें. पण त्याचा अर्थ हा कीं या लफंग्याशीं तिचें लग्न सकाळीं नऊ वाजतां युनियन चर्चमध्यें विधिपूर्वक लागून चुकलें. तिसरें वाक्य असें आहे कीं अखेरपर्यंत तिच्या ओठावर तुमचें नांव होतें. याचा अर्थ हा कीं आदले दिवशीं रात्रीं गुडनाईट म्हणून निरोप घेऊन निजायला

जातांना तिचें बोलणें झालें, त्यांत तिनें तुमच्याच गोष्टी काढल्या होत्या आणि तुमची परीक्षा पास झाल्यावर तुमचें पत्र येईल त्याप्रमाणें हिंदुस्थानला जाण्याचा ध्यास तिला लागला होता, असा बहाणा तिनें चालविला होता.' तेव्हां आतां मला सांगा कीं, तुमच्या दृष्टीनें ती मेली आणि तिचें दफनहि झालें ही गोष्ट खरीच कीं नाहीं ?

" ती मृत्यू पावली असें एकदम तुम्हांला सांगून टाकलें म्हणजे त्यांत सर्व कांहीं आलें. म्हणजे तुमच्या दुःखाची परमावधी होऊन गेली आणि तिनें तुम्हांला फसवून आपला कावा साधला हें समजल्यानें पुढें जें दुःख तुम्हांला होईल तें मृत्यूवार्तेच्या दुःखापेक्षां केव्हांहि कमी; तें त्याच्याच पोटांत आलें. तुमच्याशीं कोणी तरी प्रतारणा केली आहे. पण ती या बुद्धीनें असेल काय ?

" मेरी वोडहाऊसच्या कुटुंबाचा व माझा ऋणानुबंध बराच दाट. तुमचा माझा कांहींच नाहीं म्हटलें तरी चालेल ! माझ्या बरोबर मेरी असतांना क्वचित् कोठें रस्त्यांत गांठ पडून तिच्या कारणानें ओळखीनें तुमचे माझे चार शब्द काय झाले असतील तितकेच. पण त्या कुटुंबाशींहि माझा ऋणानुबंध होता; तो तिच्या सात्त्विक आई-बापामुळें. ते बिचारे मेले आणि आणि त्याबरोबर ती मोकाट सुटली. तिचा माझा स्वभाव मुळींच जुळण्यासारखा नव्हता आणि मी तुम्हांला एकदम सांगून टाकतें कीं, ही अवदसा तुमच्या गळ्यांत पडली नाहीं ही ईश्वराची तुमच्यावर कृपाच समजा.

" मी ' यंग वुइमेन्स ख्रिश्चन असोसिएशन ' ची एक चिटणीस आहें. उलट मेरी वोडहौस ही कैफी, जुगारी, बदफैली, सट्टोडिये व त्यांचे आश्रित सिनेमा स्टार्स यांच्या संगतींत नेहमीं रमणारी ! यावरून तिचें माझें रहस्य किती असेल हें लक्षांत येईल. तिचें शील व चारित्र्य हें असें, म्हणूनच तिच्या पाशांतून तुम्ही मुक्त झालां याबद्दल मीं तुमचें अभिनंदनच करतें. "

" तिनें आपली खरी माहिती तुमच्यापासून मोठ्या चतुराईनें अखेरपर्यंत लपवून ठेविली असें दिसतें. तुमच्या तोंडावर मीं तुमची स्तुति करावी असें नाहीं. पण तुमचें वर्तन जें ओझरतें माझ्या लक्षांत आलें

त्यावरून तुम्ही स्वतः सद्‌गुणी व सौजन्यपूर्ण आहां अशी माझी खात्री झाली आणि ही बया तुमच्या गळ्यांत पडती तर तुमचे हाल व धिंडवडे किती झाले असते याची कल्पना मला येते. म्हणूनच मी तुमचें अभिनंदन करतें. कारण मेरीनें तमच्यावर प्रेम जडल्याचा जो देखावा, जें नाटक केलें, तें तुमच्या खऱ्या गुणावर मोहून नव्हे ! तर तुमचें रूप व त्याहूनहि अधिक म्हणजे तुमची संपत्ति ! ”

“ तुमच्यासारखे गर्भश्रीमंत तरुण विद्यार्थी इकडे येतात. त्यांना इकडे कसें वागावें हें नीट ध्यानांत येत नाहीं. मनुष्यानें परदेशांत कृपण कंजुष वृत्ति ठेवूं नये हें खरें. परंतु फाजील उदारपणानें आपल्या खऱ्या योग्यतेपेक्षां आपण अधिक श्रीमंत आहों असेंहि भासवूं नये. तुम्हांला हें स्मरत असेलच कीं, इकडे तुमचे कॉलेजचे सोबती स्नेही ‘ प्रिन्स ’ या शब्दाशिवाय तुमचा उल्लेख करीत नव्हते आणि हिंदी संस्थानिक किंवा राजपुत्र म्हटला म्हणजे त्याच्या खर्चिकणाबद्दल इकडील लोकांच्या काय अपेक्षा असतात याची कल्पना तुम्हाला असेलच. ”

“ हिंदुस्थानांतील श्रीमंत आईबापही या कामीं बरेच दोषी ठरतात. आपला होतकरू मुलगा विलायतेला आय्. सी. एस्. होण्याकरितां गेला म्हणजे मग तो मागेल त्याहून अधिक पैशांचा पाऊस ते त्याजवर पाडतात. हेतु हा कीं, एक तर आपल्या मुलाला कोणी कृपण, कंजूष म्हणूं नये, त्याचें दैन्य यत्किंचितहि दिसूं नये आणि दुसरा विचार असा कीं दूर परदेशांत मुलगा गेलेला, त्याला सुखांत ठेवणें हें आपलें कर्तव्यच होय. तुमच्या श्रीमंत वडिलांना तर मुलानें आय्. सी. एस्. होणें म्हणजे स्वर्ग खालीं उतरून दोन बोटावर येणें असें वाटत असल्याचें तुमचा एखाद दुसरा मित्र चुकून बोले. आय्. सी. एस्. या नात्यानें हिंदुस्थानांत तुम्हाला पुढें येणाऱ्या ऐश्वर्याचा-वैभवाचा वेधच जणु इकडे आधीं लागावा त्याप्रमाणें ते तुम्हांला वागवायला शिकवीत असावे. तुम्हीं मेरीच्या पायीं किती पैसे खर्च केले व केवळ स्वतःच्या सुखसोयीवर किती खर्च केले हें तुमचें तुम्हांलाच माहीत असणार ! पण हिंदुस्थानला निघण्याच्या तयारीकरितां

म्हणून तुम्ही हिंदुस्थानांत गेल्यावर तिला जें तीनशें पौंड तारेनें पाठविलें त्याचें काय झालें असेल याची आतां कल्पना करा !

" इकडे तुमचें लक्ष स्वतः नाच-रंगढंग करण्याकडे मुळींच नव्हतें असें माझें अनुमान आहे. तुम्ही आपल्या अभ्यासावर इतकें लक्ष दिलें म्हणूनच तुम्हांला एम्. ए., बॅरिस्टर व आय. सी. एस्. होतां आलें. पण तुम्हांला शेवटीं या मुलीचा कांगावखोरपणा उमगला नाहीं एवढें मात्र खरें !

" मेरी दिसण्यांत सुंदर होती हें मला मान्य आहे. तिच्याजवळ एक प्रकारची जबरदस्त मोहनी होती. पण तुमच्या हिन्दुस्थानांत अशा सुंदर कुमारिका नसतीलच काय ? मला खात्री वाटते कीं तुमचे प्रेमळ आईबाप तुमच्यासाठीं सुंदर अनुरूप वधू हुडकून काढण्यांत गढून गेलेले असतील आणि हिच्यापेक्षां ती बरी असें म्हणण्यासारख्या दहा कुमारिका तुम्ही परत गेल्यावर विवाहेच्छु म्हणून तुम्हांला दाखविण्यांत आल्या असत्या. पण इच्या मोहाला बळी पडून तुम्हीं लग्न करण्याविषयीं तिला जो शब्द दिला तो तुम्ही तुमच्या आईबापांचा रोकडा घातच केलांत कीं नाहीं ?

" मिश्र विवाहांना नांवें ठेवणारी मी नाहीं. पण मिश्र विवाह करतांना देखील वधूवरांच्या स्वभावाची, शीलाची, चारित्र्याची व ध्येयाची छाननी उभयपक्षीं व्हावी तितकी होत नाहीं असें म्हणावें लागतें आणि आधींच असलेल्या विषम विवाहांत या इतर गोष्टींच्या विषमतेची भर पडली म्हणजे परिणाम कसे होत असतील ? इकडील मुलींशीं लग्नें करण्याच्या फंदांत पडलेल्या मुलांपैकीं शेंकडा पांच इतक्यांच्या आईबापांनाहि ही गोष्ट पसंत नसेल आणि मी आणखी असें म्हणतें कीं, या मिश्रविवाहांतील हिंदी तरुणांना जेव्हां पुढें मुलगे होतील तेव्हां आपली परंपरा त्यांनीं चालवावी असें स्वतः त्यांनाहि वाटणार नाहीं. पण या जगांत जो तो आपल्या-पुरती चूक करतो खरी; मग पश्चात्तापाचा प्रसंग सर्वांवर सारखा येवो वा न येवो. पण मी थोडी बाजूला जाऊन असल्या अप्रिय गोष्टी लिहिल्या याबद्दल क्षमा करा ! त्या सुचण्याचें खरें कारण मला तुम्ही आपल्या लहान भावासारखे वाटलां हेंच होय. तुमच्या दृष्टींत मला प्रेमळपणाचा

ओलावा दिसे. पण विषारी गहरेपणा कधींच दिसला नाहीं. म्हणून शेवटीं इतकेंच लिहितें कीं,मेरी बोडहाऊसनें तुम्हांला जो दगाफटका दिला तो तिचा तिलाच पावला असें आतां समजा ! किंबहुना ती मेली आणि पुरली गेली हें लाक्षणिक शब्दांनीं तुम्हांला कोणी लिहिलें तें खऱ्या अर्थानें लिहिलें असेंच वाटलें तर समजा आणि तुमच्या मनावर मोहाचें जें आवरण आलें होतें तें ईश्वरानें दूर केलें याबद्दल त्याचे आभार माना.

" मेरीचें चरित्र अजून पुरें घडावयाचें आहे. पण त्याच्या प्रारंभावरून अनुमान करावयाचें तर तें भयंकर होईल.

"असो. 'यंग वुइमेन्स ख्रिश्चन असोसिएशनची चिटणीस' म्हणून माझी फेरी हिंदुस्थानकडे झाली तर तुमच्या भेटीचा लाभ होईलहि अशी आशा कां न करावी ? मात्र मी येईन तेव्हा तुमची हिंदी पत्नी व मुलें यांच्याशींही ओळख करून घेण्याचें भाग्य मला लाभेल अशी मी इच्छा करतें. "

पेरी बाईचें पत्र वाचून चंदूच्या मनाला चांगलाच धक्का बसला. किंबहुना असें म्हणतां येईल कीं मेरीच्या मृत्यूच्या तारेनें बसलेल्या धक्क्या-एवढाच जवळ जवळ हा धक्का होता. पण या दोन धक्क्यांची जात मात्र एक नव्हती आणि त्याचा परिणामहि एकाच स्वरूपाचा नव्हता. तारेनें चंदूला झालें तें दुःख प्रेमसर्वस्वाचा नाश झाल्याचें; पण तें मेरी मेल्या-मुळें आणि मेरीचें प्रेम आपणावर खरें होतें या विश्वासानें. पेरीच्या पत्रानेंहि मेरी मेली; पण ती देहानें नसून लाक्षणिक अर्थानें. त्या तारेनें दुःख झालें, व त्याच्या उलट या पत्रानें त्याला झालें तें सुख होतें असा विरोध मांडतां येणार नाहीं. परंतु खरी प्रेम करणारी मेरी मेल्याचें दुःख, आणि तिनें आपणाला फसविलें व मूर्खांत काढलें या जाणिवेचें दुःख, हीं दोन्ही दुःख या शब्दानें वर्णन करतां आलीं तरी तीं एका जातीचीं कशीं ठरतील ? फजितीच्या दुःखाचा दर्जा प्रिय माणसाच्या मृत्यूच्या दुःखा-खालींच केव्हांहि लागणार. तार खरी ठरती तर चंदूला एका दैवाशिवाय दुसऱ्या कोणावर रागावण्याचें कारण नव्हतें. पण मेरी विश्वासघातकी ठरली तर चंदूला दैवाबरोबर स्वतःवरहि रागावण्याला सबळ कारण होतें.

त्याचें मन त्याला म्हणेल, ' ती पोरटी फसवी निघाली; पण तूं तर शहाणा-सुर्ता होतास ना ! एवढा एम.ए., बॅरिस्टर, आय.सी.एस् या परीक्षा होण्या-इतकी बुद्धि तुला होती. पण यःकश्चित् एका मायावी मुलीच्या अन्त-रंगाचा खरा ठाव घेण्याइतकी बुद्धि तुला नसावी ? मग मानसशास्त्री म्हणतात त्याप्रमाणें मनुष्य हें बुद्धीचें दिवाळें व भावनांचें गवाळें हेंच खरें कीं काय ? '

कसेंहि असो, चंदु मेरीला नांवें ठेवो, दैवाला ठेवो, स्वतःला ठेवो, तरी पण प्रतिक्षोभनाची जी उपपत्ति ग्रंथांतरीं सांगितली आहे ती या ठिकाणीं खरी ठरल्याशिवाय कशी राहील ? जादूचे खेळ करणारा प्रोफेसर आपला सगळा सरंजाम आवरून निघून गेला म्हणजे मागें काय उरतें ? तर पाहि-लेल्या देखाव्यांचें आश्चर्य करीत, आपल्या इंद्रियांना, बुद्धीला मूर्ख करून सोडल्याबद्दल स्वतःला हसणारा प्रेक्षक तेवढा जागेवर उरतो. मेरीच्या कारणानें उत्पन्न झालेला सुखदुःखमिश्रित हा मायाबाजार अशा अकल्पित रीतीनें आवरल्यावर, मेरी जितक्या प्रमाणानें चंदूच्या मनांतून निघून जाईल त्याच प्रमाणानें चंदूला आलेलें वैराग्यहि निघून गेलेंच पाहिजे कीं नाहीं, हें वाचक तुम्हीं सांगूं शकाल. मी तें माझ्या शब्दांनीं सांगण्याचें काय कारण ? पण बेशुद्धि एकदम येऊं शकते. उलट शुद्धि मात्र हळुहळू येत येत येते.

मेंदूवर हातोड्याचा घाव पडल्याबरोबर बेशुद्धीनें एकदम मिटणारे डोळे एकदम उघडत नाहींत. ते हळूहळू उघडतात; व ते जसजसे उघडून आजू-बाजूच्या वस्तू दृष्टीस पडूं लागतील तसतसें गेलेलें भान परत येतें. चंदूला सहजच असा विचार सुचूं लागला कीं, मेरीचा मृत्यु हाच जर खोटा ठरला तर गोसाव्याचा शाप आणि ईश्वराचा न्याय याचें काय होणार ? या शापानंतरच ना मी आय्. सी. एस्. पास झाल्याची तार आली ? ईश्वर मजवर खरा रागावला असता तर तो माझी परीक्षा नापासच कां न करतां आणि पास होऊं दिलें त्या अर्थीं ईश्वरी अवकृपेला पन्नास टक्के काट पडला कीं नाहीं ? उरले पन्नास टक्के ! मी पास होऊन मेरी खरें प्रेम हृदयांत

ठेवूनच मरती तर हे उरले पन्नास टक्के खरे झाले असें म्हणतां आलें असतें. पण मेरी खरोखर मेली तर नाहींच. पण एल्. एन्. पेरीनें केलेलें तारेवरचें भाष्य जर खरें मानलें, तर अशा विश्वासघातकी मुलीच्या पाशांतून आपण सुटलों ही, एका अर्थानें आपली निराशा किंवा फसवणूक असली, तरी एकंदरीच्या दृष्टीनें ती शंभर टक्के ईश्वरी कृपाच कां न म्हणावी ? आणि सगळ्या गोष्टींतली उरली गोष्ट गोसाव्याची. तार खोटी, मृत्यू खोटा, विश्वासघात तेवढा खरा; तर गोसाव्याला अन्तर्ज्ञान होतें असें आपण समजलों तें अन्तर्ज्ञान कशाचें ? ती गोसावी पद्धतीची ठराविक दमदाटीच नसेल काय ? म्हणजे तिकडे या मुलीनें तसें फसविलें आणि इकडे या गोसाव्यांनीं असें फसविलें ! आणि हें अन्तर्ज्ञानाचें भांडवल पोकळ ठरलें तर गोसाव्याला गुरु करण्याला आधार काय उरला ? आणि आपण इतके दिवस त्याची जी सेवा केली, हें आत्म-विडंबनच केलें नव्हे काय ? गुरुभजनीं लागून आपणाला दिव्य ज्ञानाचा लाभ तर झालाच नाहीं; वैराग्याचें कृत्रिम मनःसमाधान काय चार दिवस लाभलें असेल तेवढेंच ! पण उद्यां या सगळ्या रहस्याचा स्फोट झाला—आणि तो केव्हां तरी झाल्याशिवाय थोडाच राहतो--तर फजितीला पारावार नाहीं. लोक प्रत्यक्ष तोंडावर थुंकणार नाहींत इतकेंच. पण त्यांना मी तोंड दाखवूं तरी कसें ? आणि स्वतःच्या जिव्हाळ्याच्या कामीं विवेकबुद्धि चालविण्याला अपात्र ठरलेला हा मी उद्यां आय्. सी. एस्. च्या नात्यानें मोठा अधिकारी होऊन लोकांचे न्याय-निवाडे आणि सरकार-दरबाराचें महत्कार्य कसें करणार ? '

या विचारांनीं चंदूच्या मनांत हलकल्लोळ उडविला. त्याला खुर्चीवर बसवेना. तो पिंजऱ्यांत कोंडलेल्या रानटी श्वापदाप्रमाणें दिवाणखान्यांत येरझारा घालूं लागला. आपण शुद्धीवर असल्याची खात्री करून घेण्याकरितां तो आपलीं बोटें दातांत धरून चावूं लागला. मधून मधून ज्ञानतंतु उत्तेजित करण्याकरितां तो स्मेलिंग सॉल्टची बाटली हुंगूं लागला. टेबलावरचे कागद उगीच उलथे पालथे करूं लागला. जणू कांहीं शकुनवन्तींतून संशयग्रस्त मनाला एखादें उत्तर मिळतें तसें उत्तर सुचविणारा एखादा कागद किंवा

चिटोरें हातीं लागेल. हा क्षोभ ओसरण्याला दिवाणखाना त्याला पुरेनासा झाला. म्हणून कोठें तरी बाहेर दूर एकटेच फिरावयाला जावें, आणि ताज्या हवेनें मन थोडें शान्त करावें अशा विचारानें त्यानें खुंटीवरील कपड्यांना हात घातला. इतक्यांत बन्सीधरानें त्याच्या दरवाज्यावर टक्टक् असा आवाज करून दिवाणखान्यांत प्रवेश केला.

भाषण करण्याला कोणी आल्यानें चंदूच्या मनांतील विचारपरंपरा खंडित झाली. पण बन्सीधर येणार हें माहीत नसल्यानें तो किंचित् त्रासिकपणानें म्हणाला, " बन्सीधर, काय कांहीं विशेष काम आहे ? नसलें तर मी बाहेर फिरायला जाणार आहें. "

बन्सीधर हसून म्हणाला, " फार चांगलें. मी तुझ्याबरोबरच फिरायला आलों तर चालेल कीं नाहीं ? "

याला काय उत्तर द्यावें हें चंदूला एकदम कळेना. होय म्हणावें तरी अवघड; नको म्हणावें तरी अवघड; पण याचा निकाल बन्सीधरानेंच केला. तो म्हणाला, " चंदू, तूं मला क्षमा कर; पण तुझ्याच नव्हे तर तुझ्या एकंदर कुटुंबाच्या हिताहिताची, सुखदु:खाची, अशी जिव्हाळ्याची कांहीं गोष्ट मला तुजजवळ आज बोललीच पाहिजे. पूर्वीं नंदभुवनाला आलों त्या दोन प्रसंगीं तुला मीं कांहीं त्रास दिला नाहीं. पण आज देणार, नाहीं दिलाच पाहिजे. मग कशी काय तुझी मर्जी ? "

या रोखठोक सवालाला चंदूला नाहीं म्हणवेना. " चल तर आपण मोटारींतूनच लांब जाऊ. निवांत जागेंत बोलत बसूं."

" थांब जरा " असें म्हणून बन्सीधर धांवत घरांत जाऊन एक कागदाचें फाईल घेऊन परत आला.

दोघेहि बाहेर पडले. तबेल्यांतून आपली मोटार त्यानें बाहेर काढली. या मोठ्या तबेल्यांत या मोटारीशेजारीं घरची दुसरी मोटार असावयाची ती दिसेना. दोन मोटारींचा ड्रायव्हर एकच, तो तबेल्यापाशीं उभा. पण दुसरी मोटार दिसत नाहीं. तेव्हां चंदूनें सहज प्रश्न केला कीं ' दुसरी मोटार कोणी नेली ? आणि तूं इथें मोकळा कसा ? '

मोटार-ड्रायव्हरनें मान खालीं घातली. तो म्हणाला, " ती मोटार बिम्बाताईनीं आणि—"

" आणखी कुणी ? " चंद्रनें उतावळीनें प्रश्न केला.

ड्रायव्हर म्हणाला, " ताईसाहेब आणि ते छोटे गोसावीबुवा. दोघांनीं मिळून मोटार नेली आहे. "

चंद्र रागावून म्हणाला, " ही गोष्ट अशीच अलीकडे बरेच वेळां घडलेली पाहिली. तिचा अर्थ काय ? "

" तोच अर्थ सांगायला मी तुझ्याबरोबर येणार आहें." असें बन्सीधरानें उत्तर केलें.

मोटार सुरू करून दोघेहि आंत बसले. चंद्र ड्रायव्हरला म्हणाला, " तबेला लावून घेऊन तूं येथेंच उभा रहा. त्या दुसऱ्या मोटारींतून तीं दोघें केव्हां परत येतात तें मला सांग. "



## टेकडीवरचें हितगुज : : : २१

ते दोघे मोटारींत बसून बरेच दूर गेल्यावर एका मळलेल्या आडवाटेला वळले आणि हिरव्या गवतानें आच्छादिलेल्या एका लहानशा टेकडीच्या पायथ्याशीं मोटार ठेवून टेकडीच्या माथ्यावर जाऊन बसले. संध्याकाळचें कोवळें ऊन आणि तेंहि पाठमोरें होतें. टेकडीखालीं दूरवर रम्य देखावा दिसत होता.

अशा ठिकाणीं मन मोकळें करून बोलण्याला आतां एकान्त लाभला आहे असें पाहून, बन्सीधरानें खिशांतून सिगारेट व काड्यांची पेटी काढली. पण ती ओढण्यापूर्वी एकदम हसून चंद्रूला म्हणाला, " भिऊं नको रे चंद्रू, मी सिगारेट तुला द्यायला काढलेली नाहीं. ती माझी मीच ओढणार आहें. तूं आपलें सिगारेटचें व्यसन सोडून दिलेंस याबद्दल मला तुझ्याविषयीं मनांतून खरोखरच आदर वाटतो. व्यसनी माणसांना आपलें व्यसन सोडवत

नसेल तर त्यांनीं निदान दोन गोष्टी कराव्या. आपलें व्यसन एखाद्या सद्-गुणाप्रमाणें भूषण मानून,किंवा उलट निर्लज्जपणाचें नीतिधैर्य दाखविण्याकरितां तें दुसऱ्यापुढें मिरवूं नये आणि दुसरी गोष्ट ही कीं, जें आपल्या हातून होत नाहीं तें दुसरा करूं शकतो याबद्दल त्याचा श्रेष्ठपणा प्रांजलपणें कबूल करावा."

चंदु म्हणाला, "बन्सी, ही मायावी प्रस्तावना पुरे झाली. 'पुलाखालून पुष्कळ पाणी वाहून गेलें आहे' अशी एक इंग्रजी म्हण आहे. पण तिच्याच जोडीला, 'पुलाखालून अजून पुष्कळ पाणी वाहून जायचें आहे' अशी नवी म्हण मी मांडीन. मीं सिगारेट सोडण्याची शपथ घेतली. पण माझा अजून सगळा जन्म जायचा आहे! 'रानांतून बाहेर पडण्यापूर्वीं शीळ घालूं नये' ही म्हण मला चांगली माहीत आहे. म्हणून मीं सिगारेट सोडल्याबद्दल तूं आदरबुद्धि दाखविलीस तिजकरितां आभार मानावयाचे ते माझ्या मृत्युपत्रांत मानीन. असो. चला, आपण आतां दोघेच दोघे आहों. तेव्हां बोल काय बोलायचें तें."

"पण बोलण्याआधींच तुला बजावून ठेवतों कीं, तें बोलण्यांत मी एक प्रकारें वडिलकीचा हक्क बजावणार आहें. तुझ्यापेक्षां मी दहा वर्षांनीं वडील आहें ना?"

"पण तुझा हा अधिकार मीं केव्हां नाकबूल केला होता? आणि त्या तुझ्या अधिकारांत आज माझा कान पिळण्याची तुला इच्छा झाली असेल तर हा पाहा मी माझा कान तुझ्यापुढें केला."

"शाबास, पण शहाण्याचा कान हातानेंच पिळावा लागतो असें नाहीं. मी तुला कशाविषयीं बोलणार याचा तर्क तूं कदाचित केला असशील! पण तुझ्या तर्कांत न आलेल्या अशा एकदोन गोष्टी मी प्रथमच तुला सांगतों."

असें म्हणून बन्सीधरानें सिगारेट काढून ओठांत धरली. लगेच चंदूनें काडी ओढून तिला लावली. गोष्ट लहानशीच असते; पण ती माणसांच्या मनःस्थितीची दर्शक असते.

बन्सीधर म्हणाला, "मेजवानीच्या दिवशीं संध्याकाळीं विलायतेहून

आलेली एक तार तुझ्या हातीं पडली. ती तूं अजून कोणाला दाखविलेली नाहींस आणि वेड्या मुला, तुझी समजूत अशी दिसते कीं, त्या तारेची बातमी अजून कोणाला लागली नाहीं ! पण ही पहा त्या तारेची नक्कल. अस्सलबरहुकूम आहे कीं नाहीं ! पाहून घे. "

चंदूनें चटदिशीं तो कागद हातीं घेऊन पाहिला, वाचला, आणि खिन्न मनानें म्हणाला, " ही नक्कल मुळाबरहुकूम आहे. पण तुला ही बातमी कोणी सांगितली ? "

" हें गूढ वाटतं इतकं उकलण्याला अवघड नाहीं. तूं घेरीं येऊन पडतांना तूं एक कागद चुरगळून खिशांत घालतांना डॉ. जालंदर यानं पाहिलं. त्यावरून त्यानं अर्थात् नुसता तर्क केला कीं, ती एखादी तार असावी आणि ही गोष्ट त्यानं मला सांगितल्याबरोबर मी अंदाजानं तार कचेरींत जाऊन अस्सल तार पाहिली. मी गुप्त पोलिस-खात्यांतील इन्स्पेक्टर असल्यामुळें मला ती गोष्ट अगदीं सुलभ होती. "

" मग या तारेची बातमी आणखी कोणाला तूं दिली आहेस ? "

" मासाहेब, जालंदर व सरसाहेब यांच्याशिवाय आणखी कोणालाहि तिचा सुगावा लागूं दिलेला नाहीं. त्याची काळजी नको. असो. मला तुला म्हणावयाचें तें या तारेंतील व्यक्तीविषयीं कांहीं नाहीं. तो विषय स्वतंत्र आहे. पण या तारेंतील दुःखद बातमीमुळें तूं हें जें वैराग्य घेऊन बसला आहेस, आणि त्यांतूनहि तूं, गुरु व गुरुबंधु मानून, दोन गोसावी घरांत आणून ठेवले आहेस, त्यांच्याबद्दल मला बोलायचं आहे. तथापि मी तें बोलण्यापेक्षां या फाईलांतले कागद तूं क्रमानें वाचलेस किंवा नुसते चाळलेस तरी तुझ्या लक्षांत येईल. तुझें वाचून होईपर्यंत मी कांहीं बोलणार नाहीं. तिथपर्यंत पुरतील इतक्या सिगारेटस् या डबींत आहेत. "

चंदूनें तें फाईल उघडलें आणि त्यांतील कागद क्रमानें पण वाढत्या आश्चर्यानें त्यानें वाचले. फाईल वाचून खालीं ठेवल्यावर तो होऊन म्हणाला, " बन्सीधर ! मीं माझ्या डोळ्यांवर विश्वास तरी कसा ठेवावा ? "

" कां बरं ? डोळ्यानें न पाहिलेल्या गोष्टीवर जर तूं विश्वास ठेवूं शकतोस, आणि तोहि इतका कीं त्यामुळें तूं आपला सगळा जीवनक्रम बदलावा, तर डोळ्यांनीं वाचलेल्या या सरकारी कागदपत्रांतील माहिती खरी मानण्याला तूं मनानं शंका कां घ्यावी ? "

" बरं, तू म्हणतोस ती दुसरी गोष्ट कोणती ? "

" मी कांहीं तुझ्या मनांत शिरून तुझ्या अनुमानाचे धागेदोरे पाहिलेले नाहींत. मात्र वाटतें तें असें कीं, (१) तूं पक्ष्याची शिकार केलेली पाहून या गोसाव्यांनीं तुला शाप दिला आणि या घटकेची आठवण ठेव असं बजावलं आणि (२) या तारेंत जी नक्की वेळ लिहिली ती तीच घटका असून त्या वेळीं मेरी वोडहाऊस मेली. या दोन गोष्टी जुळल्यामुळें तुझ्या मनानें घेतलं कीं, या गोसाव्याला काहींतरी दिव्य ज्ञान असलं पाहिजे. "

" तूं अनुमानपरंपरा म्हणून मांडलीस ती बरोबर आहे. पण पुढें काय म्हणतोस ? "

" हेंच म्हणतों कीं, ही सगळी अनुमानपरंपरा सदोष आहे आणि त्या अनुमानशृंखलेनें तुझ्या तीक्ष्ण बुद्धीच्या पायांत शृंखला घालून तुला असें हास्यास्पद केलें आहे. कसें तें पाहा—२४ तासाचे बारीक विभाग केले तर ६० घटका होतात आणि या एकंदर जगांत ६० घटकांत घडणाऱ्या गोष्टी गणति न करतां येईल इतक्या घडत असतील, नव्हे* काय ? मग त्या एकेका घटकेंत घडणाऱ्या निदान हजार पांचशें ठळक गोष्टींचा परस्पराशीं कार्यकारणसंबंध जोडणार कीं काय ? "

" वाः वा ! इतका व्यापक सिद्धान्त कोणीच बनवीत नाहीं. पण मी व्यक्ति या नात्यानें मजसंबंधानें एकाच घटकेंत ठळक अशा दोन गोष्टी जर पांच हजार मैलावर झाल्या तर त्यांचाहि संबंध मीं मानूं नये ? "

" बरं, विलायतेंत घडलेली ही गोष्ट शिकारींत पक्षी मारल्याबद्दल तुला शिक्षा म्हणून ईश्वरानें घडविली असं तूं मानलंस, तर मी त्याबद्दल तुझ्याशीं भांडणार नाहीं. मी म्हणेन कीं, मी नास्तिक आहें; पण तूं आस्तिक आहेस. ईश्वराच्या न्यायबुद्धीवर तुझा विश्वास आहे. म्हणजे तुझें अध्यात्मज्ञान माझ्या-

पेक्षां श्रेष्ठ आहे. उच्च वातावरणांत मनाला नेणाऱ्या अशा विश्वासाबद्दल कोणी कोणाशीं भांडूं नये. पण या सगळयांत या गोसावड्यांची काय करामत ?"

"कां बरं ! या घटकेची आठवण ठेव, असं जें मला त्यानं बजावलं तें त्या वेळीं घडणाऱ्या गोष्टीचं कांहीं अन्तर्ज्ञान त्याला झालं असेल म्हणूनच कीं नाहीं ?"

"इथं मात्र मी तुझ्याशीं वाद करूं शकेन. कारण मला जगाचा जो अनुभव आहे तो तुला नाहीं. तूं इतका पडदपाशीत वाढविला गेला आहेस कीं, या गोसाव्यापूर्वीं इतर चार गोसावी तरी तुझ्या दृष्टीस पडले असतील कीं नाहीं शंकाच वाटते. तूं या गोसाव्याला प्रथम पाहिलंस तेव्हां प्राणिवधाच्या निषेधानं तुझं मन किंचित् कमकुवत झालं असेल. तूं शिकारी क्षत्रिय असलास तरी, उग्र हिंसा ही डोळ्यांना केव्हांहि विषाद उत्पन्न करणारीच असते. जमिनीवर सांडलेलं रक्त हें दयाबुद्धीचा उपजत मनुष्यधर्म जागृत केल्याशिवाय रहात नाहीं. तूं शिकारीचें समर्थन कितीहि केलेंस तरी आपण अन्याय केला, अपराध केला अशी थोडी तरी जाणीव त्या क्षणीं तुझ्या मनाला झाल्याशिवाय राहिली नसेल. मनाच्या अशा दुबळ्या स्थितींत भयप्रद वेषाच्या त्या गोसाव्यानं तुझा निषेध रागानं केला तर त्याची आठवण तुझ्या मनांत ताजी राहणारच. पण कान्या मला सांगत होता कीं तूं त्या वेळीं तरी गोसाव्यांना दम देऊन आत्मसमर्थन करून वेळ मारून नेलीस आणि यानंतर थोड्या वेळानं तुझी आय. सी. एस्. पास झाल्याची तार आली, तेव्हां तर तूं त्या गोसाव्याबरोबर ईश्वराच्या न्यायबुद्धीचीहि थट्टा केलीस म्हणे ! पण ही तार हातांत पडतांच तुझं जातिवंत व कृत्रिम दोन्ही प्रकारचं धैर्य गळून पडलं, तुझी बुद्धि दिङ्मूढ झाली आणि मग त्या गोंधळांत चाचपडतांना हाताला लागलेली या गोसाव्याची दाढी तीच आधारभूत धरून त्याला तूं अंतर्ज्ञान नी गुरुपद देऊन टाकलंस; पण या फाइलांतल्या कागदावरून गोसाव्यांची खरी योग्यता तुझ्या लक्षांत आल्यावर तूं काय म्हणतोस सांग ? अशा नीच मनुष्यांना आपल्या ठेव-

गींतली दिव्य अंतर्ज्ञानाची मौल्यवान् देणगी देण्याइतका ईश्वर मूर्ख आहे, अन्यायी आहे, तारतम्यशून्य आहे,असं तुला म्हणायचं आहे काय?"

विषयाला किंचित् कलाटणी देण्याकरितां चंद म्हणाला, " पण आतां बोलून काय उपयोग ? "

" उपयोग हाच कीं, मी गोसाव्यांची जी व्यवस्था लावणार आहें त्यानं तुझ्या गुरुभक्तीला मूठमाती मिळाली तर उत्तमच. पण तिनं निदान माझ्या कर्तव्याच्या तरी आड येऊं नये ! या कर्तव्यांत मी तुझा नुसता वडील भाऊ नसून जबाबदार सरकारी अधिकारी आहें हें लक्षांत ठेव. शिवाय तुला सांगतों कीं, या गुरुनं तुझ्या बुद्धीचा बळी घेतला तरी मला त्याचं कांहीं वाटणार नाहीं. पण त्याचा शिष्य बिम्बाचा बळी घेण्याला टपला आहे ही शंका आली कीं, मनाचा थरकांप होतो. तुला त्याचा कांहीं सुगावा आहे काय ? "

" मलाहि तशी शंका आली आहे. त्या दिवशीं आणि आजहि तूं आणि मी मठाकडे गेलों तेव्हां जम्बु व बिंबा मोटार घेऊन वेळीं अवेळीं बाहेर जातात हें रखवालदार मोटार ड्रायव्हरकडून आपण ऐकलंच ! "

" पण त्यापुढं मीं जें आणखी ऐकलं तें तूं ऐकलेलं नाहींस. असो. हें सर्व तुला ओघानंच कळेल. तुझ्याकडून मला आतां एकच वचन पाहिजे; तें हें कीं, मी यापुढं जें करणार आहें त्यांत तूं प्रत्यक्ष साहाय्य द्यावं. यापुढील घटनेचा आणि तुझ्या गुरुभक्तीचा मेळ तुला टिकवितां आला तर टिकीव; माझी हरकत नाहीं. टिकवितां न आला म्हणून तोडून टाकलास तर तें सोन्याहून पिवळं होईल आणि या कामाला आज रात्रीपासूनच कसा प्रारंभ करावयाचा आहे तें तुला मी वाटेनें सांगतों. दिवेलावणीला आपण घरीं पोचावें हें बरें. "

गुरु व शिष्य यांच्या संबंधानें आपली श्रद्धा हळूहळू कशी ढासळत चालली होती हें चंदूनें मन मोकळें करून बन्सीधराला या वेळीं सांगितलें असतें तरी तें योग्य झालें असतें. तथापि आपला मूर्खपणा लोकांपुढें कबूल करण्याची गोष्ट जितकी लांबणीवर टाकतां येईल तितकी कोणालाहि इष्टच

वाटते. म्हणून इकडे आपली लाज राखून व तिकडे बन्सीधराशीं मित्रत्व दाखवून चंदूनें त्याच्याशीं पूर्ण सहकारिता मान्य केली.

घरीं गेल्यावर प्रथम लगेच बन्सीधरानें मासाहेबांची गाठ घेतली आणि चंदूसमक्ष तो त्यांना म्हणाला, “ मासाहेब, यापुढं माझ्या कामांत चंदू मला साहाय्य देणार आहे एवढी एकच खुणेची गोष्ट सांगतों. तुम्ही आतां इतकंच करा कीं, मठांतले गुरु, शिष्य व यात्रेकरू तिघांनाहि आज रात्रीं मठांत जेवायला न घालतां इकडे थोरल्या घरीं जेवायला बोलवा. नोकरांकडून वाढवा. जेवणावर देखरेख ठेवण्याकरितां चिम्बेला तुमच्या वतीनें हजर राहायला सांगा. म्हणजे मग पुढें काय करायचें तें सांगेन. ”

* * *

आज रात्रीच्या जेवणाची जागा बदलली, आणि खुद्द मासाहेबांच्या निमंत्रणावरून मोठ्या वाड्यांत आपणांला जेवायला बोलावलें आहे, या गोष्टीची गुरुमहाराजांना अपूर्वाई वाटली. तिघेहि तिकडे जेवावयाला गेले.

त्यांचें जेवण सुरू होतांच आचाऱ्याला एकीकडे बोलावून जेवणारांना शक्य तितका आग्रह करण्याची सूचना करण्यांत आली. नंतर मासाहेब व चंदू यांच्यासह बन्सी मठांत गेला. त्यानें मागचे पुढचे दरवाजे पक्के बंद केले. खिडक्या लावून घेतल्या. यात्रेकरूच्या कावडीशीं जाऊन त्यानें त्यावरील आच्छादन काढून आंतील तांब्याच्या गिंडयांचीं तोंडें सोडलीं आणि एका भांड्यांतून तीन जंबिये व दुसऱ्यांतून दोन पिस्तुलें बाहेर काढलीं. चंदु व मासाहेब यांना याचा अर्थ कळेना. तेव्हां बन्सीधर म्हणाला, “ त्या दोन डाकूंचा हा यात्रेकरू तिसरा साथीदार. त्यांना आज किंवा उद्यां रात्रीं इथून पळून जाण्याला साहाय्य करण्याकरितां, व वेळ पडल्यास बचावाकरितां, हीं हत्यारें तो घेऊन आला आहे. आतां मी त्यांचें काय करतों हें दाखवितों. त्यानें पिस्तुलें उकलून त्यांतील गोळ्या काढून खिशांत घातल्या आणि जंबिये धारेच्या बाजूनें व टोकानें फरशीवर घासून इतके बोथट केले कीं, त्यांनीं इजा होणें अशक्य. मग त्यानें तीं हत्यारें फिरून जेथल्या तेथें ठेवून दिलीं, गिंडयांचे दादरे बांधले, कावडीवर फडकीं घातलीं

आणि तिघेहि भोजनाच्या जागीं आले आणि ' सावकाश होऊं द्या ' असें मोघम बोलून बन्सीधर त्या दोघांनाहि घेऊन मासाहेबांच्या खोलींत गेला आणि म्हणाला, " आज रात्रीं तुम्ही आपापल्या जागीं सावध रहा. कारण पडलंच तर मी तुम्हांला हाक मारीन. " झाला प्रकार सांगून रात्रीं सावधगिरी ठेवण्याचा निरोप सर गंगारामसाहेबांनाहि कळवावयाला हवाच होता. पण तें काम त्यांनीं मासाहेबावर सोपविलें आणि सर्वजण आपापल्या जागीं जाऊन निजले.



## ईश्वराघरचा न्याय : : २२

बन्सीधर निजावयाला आपल्या खोलींत गेला; परंतु लगेच त्याला कांहीं एक कल्पना सुचल्यामुळें तो हळूच उठून खोलीचें दार लावून नंदभुवनांतून बाहेर पडला. त्यानें कोतवालीच्या अधिकाऱ्याची गांठ घेतली, आणि कारण पडल्यास दोनतीस पोलिस जवान नंदभुवनाच्या अगदीं नजीक असलेल्या पोलिस गेटावर आपणास मिळावे अशी तजवीज करून तो परत आला. पण आपल्या खोलींत न जातां मठाचा रखवालदार व मोटार ड्रायव्हर गिरधर यांची गांठ त्यानें घेतली आणि पूर्वींच्या प्रसंगाप्रमाणें, आजहि मठाच्या मागच्या माळ्यावर जाऊन बसला. पण पुष्कळ वेळ त्याला कांहीं हालचाल दिसली नाहीं.

इकडे मध्यरात्र झाली तरी चंदूच्या खोलींत दिव्यासमोर तो वाचीतच बसला होता. त्याला कांहीं केल्या झोप येईना. त्यानें डोक्याला, डोळ्यांना पाणी लावून पाहिलें आणि वाचन हें तर झोप येण्याचें उत्तम साधन असा त्याचा अनुभव असल्यामुळें विषयांत मन न रमलें तरी झोपेचा इलाज म्हणून तो वाचूं लागला. पण आज तोहि उपाय फुकट गेला. शेवटीं कंटाळून दिवा मालवून तो अंथरुणावर पडला. झोप नसली तरी डोळे मिटलेल्या स्थितींत स्वप्नाप्रमाणेंच कल्पनांचें परिभ्रमण सुरू होतें. मात्र अशा

स्थितींत झोपेंतल्यापेक्षां कान अधिक तीक्ष्ण असतात. त्याचा त्याला या वेळीं उपयोग झाला. कारण सुमारें पंधरा मिनिटांनीं त्याला खालीं एका दारावर टक्टक् असा आवाज झालेला ऐकूं आला.

प्रथम त्याला त्याचें काहीं वाटलें नाहीं; पण वरचेवर तोच तो आवाज दारावर होतो असें पाहून चिकित्सेमुळें तो आपल्या खोलीच्या खिडकीचें दार किलकिलें करून त्यांतून खालीं पाहूं लागला. चंदूची खोली माडीवर असून, ज्या दारावर हा टक्टक् आवाज होत होता ती खालच्या तळ-मजल्यावर सुमारें दहा फुटाच्या अंतरावर होती. या खोलींतून बाहेर पडण्याचें हें दार होतें.

कांहीं वेळानें खोलीचें दार उघडलें. तथापि खोलींतून बाहेर कोणी आलें नाहीं किंवा आंत कोणी गेलें नाहीं. खोलींतलें मनुष्य उंबऱ्याआंत व बाहेरचें मनुष्य उंबऱ्याबाहेर अशीं उभीं राहून अगदीं हलक्या आवाजानें कुज-बुजत होतीं. एका तिरप्या बाजूनें चंद्रप्रकाश किंचित् या भागावर पडत असल्यानें, उंबऱ्याबाहेरचें माणूस दुसरें कोणी नसून जम्बू होता अशी चंदूची खात्री पटली. उंबऱ्याआंतील मनुष्य कोण हें चंदूला दिसलें नाहीं; पण ती बिम्बा असावी असें त्याला खात्रीपूर्वक वाटलें. कारण ही बिम्बाची खोली हें त्याला माहित होतें. खालच्या या दोघांच्या कुजबुजीचे शब्द वर स्पष्ट कसे ऐकूं येणार ? पण जम्बू हा जोरानें आग्रहानें बिम्बाला बाहेर बोला-वीत होता, व बिम्बा आंतूनच खोलीबाहेर पडण्यास नाखुषी दर्शवीत होती, असा त्याचा ग्रह झाला.

आणखी थोड्या वेळानें या दोघा बोलणारांचा आवाज किंचित् मोठा झाला. ते जाणूनबुजून निर्भयतेनें मोठ्यानें बोलूं लागले असें नव्हे. पण बोलण्याला होय-नाहींचें वादाचें स्वरूप आलें कीं, नकळतच माणसाचा आवाज चढतो. अशींच चार-दोन मिनिटें गेल्यावर नकार किंवा निषेध दर्शविणारा बिम्बाचा हात बाहेर येतांच जम्बूनें तो घट्ट पकडला व तो म्हणाला, " तबेल्यांतून कोणाला न कळतां हळूच मोटार बाहेर काढली आहे आणि ती उतारावर ढकलून किंचित दूर नेऊन मी दाराशीं उभी

केली आहे. तूं त्यांत जाऊन बैस. म्हणजे मी इंजिन सुरू न करतां आणखी तशीच मोटार ढकलून दूर नेतों. मग ते दोघे येतील आणि ते व आपण मिळून पुढील पांच तासांत शंभर मैल मजल गांठून परक्या संस्थानच्या हद्दींत जाऊं. तूं अगदीं निष्काळजी रहा. तूं अधिक सामानसुमान घेऊं नकोस. कपाटांतून लहानशी दागिन्याची पेटी काढून घेतलीस तरी पुरें. पण चल. उशीर करूं नकोस. हें सर्व काम कोणाला कानोसा न लागतां पार पडलें पाहिजे."

पण बिम्बा जम्बूच्या पाशांत कितीहि सांपडली असली तरी, घरांतून बाहेर पडून त्याच्याबरोबर निघून जाण्याची कल्पना तिला आवडली नसेल किंवा भयप्रद वाटली असेल. तिनें परोपरीनें नकार दर्शविला. प्रथम काकुळतीनें, नंतर गोडीगुलाबीनें, व नंतर निश्चयानें ती नकार दर्शवूं लागली आणि म्हणाली, " जंबू, माझें ऐक. या साहसांत पडूं नको, मला पाडूं नकोस." पण जम्बू कांहीं केल्या तिचा हात सोडीना.

इतकें पाहातांच चंदु देहभान विसरला. त्यानें आपल्या कपाटाचें दार उघडलें. त्यांतील एक खण बाहेर ओढला. त्यांतून पिस्तुल बाहेर काढलें. त्यांत गोळ्या भरल्या आणि घोडा नीट बसवून पिस्तुल खिशांत घालून तो तसाच अनवाणीं बाहेर पडला. जिना उतरून जम्बूच्या पाठीशीं येऊन त्यानें जम्बूचा डावा हात रिकामा लोंबत होता तो पकडला. त्याबरोबर जम्बूनें बिम्बाचा धरलेला हात सोडला आणि तो एकदम मागें वळला. ती संधि साधून बिम्बानें झटदिशीं दार लावून घेऊन कडी घातली. आपण दार उघडून कोणाशीं बोलत होतों याची कल्पना तिकडून आलेल्या या माणसाला आली होती कीं नाहीं हें तिला कशानें कळणार ! पण येथून पुढें काय घडेल त्यांत तरी आपला संबंध न यावा अशा निश्चयानें तिनें दार लावून घेतलें.

चंदूनें जम्बूच्या हाताला हिसडा देऊन त्याला पायरीवरून खालीं ओढलें, व तो म्हणाला, " हरामखोरा, हा तुझा गोसावीपणा ! हें तुझें वैराग्य ! हें तुझें शिष्यत्व ! तुला पाहिला त्या दिवसापासून, तुझें खरें स्वरूप मला न कळलें

तरी, तूं दिसतोस तसा नाहींस असा माझा पक्का ग्रह झाला होता. माझ्या परवानगीशिवाय माझी मोटार नेऊन तूं बिम्बाबरोबर फिरायला जातोस याबद्दल मीं तुला बजावलें, तेव्हां तूं निर्लज्जपणानें आपल्या वर्तनाचें समर्थन केलेंस. पण माझ्या ताकिदीनें तूं हे चाळे सोडशील अशी आशा वाटल्यानें मी तुझी कागाळी त्या दुसऱ्या गोसाव्याकडे आजवर फारशी नेली नाहीं. पण आजच संध्याकाळीं पत्त्यामुद्यानिशीं त्या गोसाव्याचीहि खरी हकिगत मला कळली. हा मठ नसून मी आपल्या हातानें तुम्हां दुष्ट सर्पांना हें बीळ तयार करून दिलें. ठीक आहे. चल, असाच्या असा मी तुला त्याच्याकडे घेऊन जातों आणि जाब विचारतों. बन्सीधरानें संध्याकाळीं माहिती सांगितल्यापासून मी पश्चात्तापानें वेडा झालों आहें. तुमच्याइतकाच मला माझाहि राग आला. पण चल, आतां शेवट काय लागावयाचा तो मठांतच लागूं दे. ”

असें म्हणून चंदू जम्बूला ओढून मठाकडे चालला. जम्बू बलवान होता तरी त्याला चंदूच्या हातून आपलें मनगट सोडवून घेतां आलें नाहीं. शिवाय वरील शब्द बोलतांना चंदूनें खिशांतून आपलें पिस्तुल काढलेलें त्यानें पाहिलें होतें म्हणून जम्बूनें असा विचार केला असावा कीं, बिनहत्यारी स्थितींत चंदूशीं कलागत करून आसपासचीं माणसें जागीं करण्यापेक्षां त्याच्याबरोबर मठांत जावें. म्हणजे तेथें त्या इतर दोघांचें सहाय्य तरी मिळेल. कदाचित् कावडवाल्याच्या कावडींत लपून ठेवलेलें एखादें हत्यारहि वेळेवर हातीं येईल.

ते दोघे मठांत गेले. चंदूनें बटन दाबून विजेचा दिवा लावला. पाहतो तों गुरु महाराज व कावडवाले यात्रेकरू आपले कपडे-बिस्तारा नीट बांधून मज्ज होऊन कोणाची तरी वाट पाहात बसले आहेत. अभावितपणें विजेचा दिवा लागतांच ते दोघे दचकले. पण चंदू जम्बूला एका हातानें खेचीत पिस्तुल घेऊन आलेला पाहून तर ते गांगरूनच गेले.

वैराग्याला पाहून गर्जून आणि पेंढा भरून ठेवलेल्या कपोताकडे हात करून चंदु म्हणाला, “ या पक्ष्याची हिंसा केल्याबद्दल मला ईश्वरानें जी शिक्षा केली ती मी सोसली. पण आतां वैरागी महाराज, तुमच्या शिक्षेचा

वाटा तेतढा उरलेला दिसतो. नीचा, तुला मी गुरु करून घरीं घेऊन आलों, पण तूं आलास यांत तुझा अपराध नसून माझाच मूर्खपणा होता. मठांत येऊन राहिल्यावर तूं माझा कांहीं प्रत्यक्ष असा अपराध केला नाहींस. पण हा पहा तुझा पट्टशिष्य म्हणून मिरवणारा ! शिष्य कसला ? बदमाशींतला साथीदार ! तुझा साथी तो आणि त्याचा साथी तूं ! या दुष्टानं त्या गरीब बिचाऱ्या बिम्बाला नादीं लावून आमच्या घराची अब्रु पोखरण्याचं काम चालविलें हें तुला माहित होतं. असं असून तूं त्याला परावृत्त न केल्यामुळें ही स्थिति आली. मी झोप न येऊन जागा होतों; यामुळं मला वेळेवर जाऊन पोचतां आलं. पण तसं नसतं तर काय झालं असत याची कल्पना करवत नाहीं. आज इतके दिवस या जम्ब्याचा राग मी मनांत सांठविला. पण आज त्याचं अधम वर्तन डोळ्यानं पाहिल्यावर मला तो आवरत नाहीं. त्याला मी तुझ्या समक्ष देहान्त प्रायश्चित्त दिलं तरी योग्यच ठरेल ! " असं म्हणून चंदूनें जम्ब्यावर पिस्तूल रोखलं.

गुरुमहाराज ओरडून म्हणाले, " हां, हां ! हें काय भलत करतोस ? तूं अहिंसेची शपथ घेऊन त्याचा जामीन म्हणून गळ्यांत तुळशीची माळ घातली आहेस ! त्या शपथेला व त्या माळेला कांहीं स्मर. एका हिंसेबद्दल ईश्वरानं तुला शिक्षा केली ती पुरे झाली नाहीं काय ? पण ती फार तर पक्ष्याची हिंसा होती आणि आतां तूं मनुष्यवध करण्याला तयार होतोस ? तुला काय म्हणावं ? "

चंदु त्यांच्या अंगावर जाऊन ओरडून म्हणाला, " मानभावी गोसावड्या ! माझी शिष्यत्वबुद्धि नष्ट झालेली तुला दिसत असतांहि तूं आपली गुरुबुद्धि सोडायला तयार नाहींस ? ठीक आहे. एकतर्फी भावनेनं गुरु-शिष्यत्व टिकत नसतं. मला अहिंसेच्या शपथेची आठवण देणाऱ्या कावळ्या ! तुझे निषेधाचे शब्द आतां तुझ्या तोंडांतच ठेव. ते बाहेर काढून त्यांचा कांहीं उपयोग होणार नाहीं. माझ्या मूर्खपणाच्या अहिंसेची जामिनकी देणारी ही माळ या क्षणीं तोडून टाकली पाहा. वास्तविक तुमच्यासारखे सर्प दिसतांच त्यांना जागच्या जागीं ठेचून टाकलें पाहिजे.

त्यांत हिंसा कसची ? गुरुमहाराज, या तुमच्या पूर्वीच्या शिष्यालाहि मान-भावीपणाचं बोलणं येत नाहीं असं समजूं नका. मीहि तुम्हांला सांगतों ऐका. मीं अहिंसेची शपथ घेतली तेव्हां आंतल्या आवाजानें मनांत म्हणालों होतों कीं, ही अहिंसेची शपथ दीन दुबळ्या निरपराधी पशुपक्ष्यापुरती आहे. दुष्ट माणसांना ती लागू नाहीं. आतां मीं या दुष्टाचा प्राणच घेतला तर मला त्याचे जे परिणाम भोगावे लागतील ते आज इष्ट नाहींत. म्हणून या पिस्तुलानं त्याचा प्राण घेत नाहीं. परंतु त्याला जखमी करून त्याचं रक्त जमिनीवर सांडल्याशिवाय माझा राग शांत होणार नाहीं. शिवाय प्राण्याचे पंचप्राण घेतले तरच ती हिंसा ठरते, एरवीं ठरत नाहीं, अशी पळवाटहि मला काढतां येईल."

असें म्हणून त्यानें जम्बूच्या पावलावर पिस्तूलाचा रोख धरून तें झाडलें. त्यासरशीं गोळी पावलांतून आरपार जाऊन दूर पडली. जम्बूचा पाय रक्त-बंबाळ होऊन तो त्या वेदनेनें जमिनीवर पडला. चंदूनें अशी निर्भर्त्सना करून पिस्तूल धरून घोडा चढविला हें पाहातांच गुरुमहाराज कावडवाल्या साथीदाराला म्हणाले, "अरे, आतां बघतोस काय ? तीं कावडींतलीं हत्यारं काढ. आतां प्राणावरच बेतली खरी !"

हें बोलणें होऊन तो यात्रेकरू घाईनें कावडीवरचे पडदे काढून, गिंड्याचीं तोंडें खुलीं करून, हत्यारांना बाहेर काढीत आहे असें पाहून चंदु हंसून म्हणाला, "गुरुमहाराज,तुमच्याप्रमाणं मलाहि देवानं थोडं अन्तर्ज्ञान दिलं आहे. त्याच्या साहाय्यानं आज संध्याकाळीं, तुमचं सुग्रास भोजन चालू असतां, मीं हीं तुमचीं हत्यारं आधींच हाताळलीं आहेत. पिस्तुलांतल्या गोळ्या काढून मी त्या पिस्तुलाच्या फुकण्या बनविल्या आहेत आणि तुमच्या जम्बियांनीं आतां लोणीहि कापलं जाणार नाहीं."

कावडीवाला काढून पाहातो तों पिस्तुलांतल्या गोळ्या काढून घेतलेल्या होत्या आणि जम्बियांची धार बोथट झाली होती !

पण यापलीकडे जाऊन प्रश्नोत्तरें होण्याला वेळच नव्हता. कारण बन्सीधर मध्यंतरीं पोलिस गेटावर जाऊन तीन हत्यारबंद पोलिस घेऊन धावत आला

तों थेट मठांत येऊन उभा राहिला,व त्यानें त्या दोघांहि गोसाव्यांना व त्या कावडीवाल्या यात्रेकरूला पकडून हातकड्या घालण्याचा हुकूम केला.

इतक्यांत इकडे पिस्तुलाचा आवाज आणि मठांतील चढ्या स्वराचीं भाषणें ऐकून माणसें जागीं झालीं. जिकडे तिकडे विजेचे दिवे लागले गेले. सर गंगाराम आपला शिपाई बरोबर घेऊन विजेची मोठी टॉर्च पाजळीत मठाशीं आले, तों त्यांना हा सर्व प्रकार दिसला. त्यांना पाहातांच चंदु म्हणाला, "बाबा, माझ्या मूर्खपणाचा कडेलोट झाला! पण त्याबरोबर आतां माझ्या गुरु-शिष्यत्वाचाहि!"



## पुनर्भेटीचा योगायोग : : : २३

बैराग्याचं बिऱ्हाड नंदभुवनांतून निघून गेल्यानंतर थोड्या दिवसांनीं विलायतेहून सरकारी छापाचें एक रजिस्टर्ड पत्र चंदूच्या नावाचें आलें. गुरु-महाराज निघून गेले, शिकार संपली, यामुळें चंदूचा बराच वेळ आतां मोठ्या सोप्यांतील त्या प्रशस्त झोपाळ्यावर जाऊं लागला होता. त्याला झोपाळ्यावर बसणें आवडे. रजिस्टर्ड पत्राची पावती देऊन त्यानें तें पत्र फोडून वाचलें. त्याचें त्याला इतकें आश्चर्य वाटलें कीं, तो ताडकन उभा राहिला आणि 'पपा' म्हणून त्यानें सर गंगाराम यांना हाक मारली. ते येतांच चंदु त्यांना म्हणाला, "पपा, हें पाहिलेंत काय तें? त्या दिवशीं स्टेट-सेक्रेटरीच्या नांवाचा राजीनामा पाकीट बंद करून टपालांत टाकण्या-करितां मी तुमच्या हातांत दिला, तो तुम्ही टपालांत टाकला होता ना?"

सर गंगाराम यांनीं या प्रश्नाचें उत्तर देण्याचें टाळून तें विलायतेचें पत्र दोनदोनदां वाचून पाहिलें. त्यांना मनांतून किती आनंद झाला तो सांगतां पुरवत नाहीं. त्या आनंदाच्या भरांत त्यांनीं मासाहेबांना स्वतःच नांव घेऊन हाक मारली आणि म्हणाले, "चंदूला नोकरी लागली म्हणजे तुम्ही

पहिल्या खेपेला त्याच्याबरोबर जायचं ठरविलं आहे ना ? मग करा तयारी. हा पाहा चंदूच्या नेमणुकीचा हुकूम आला. ”

“ वाः ! तो आपली बायको बरोबर घेऊन जाईल तर पहिलं बिऱ्हाड थाटून द्यायला जायचं. बरं, नेमणूक आणि ती कशी झाली बाई ? चंदूनं नोकरीचा राजीनामा पाठविला होता ना विलायतेला ? ”

“ हो तर. पण राजिनाम्यांतलं कारण स्टेट-सेक्रेटरीला पटलं नसेल. म्हणून त्यानं तो मंजूर केला नसेल !” सर गंगाराम शिताफीनें म्हणाले.

“ पण पपा, मी माझं कारण म्हणून कांहींच लिहिलं नव्हतं कीं राजिनाम्यांत ! मग तें त्याना पटलं नाहीं असं कसं म्हणतां येईल ? ” चंदु हसून म्हणाला.

“ तरी बरोबर. निष्कारण म्हणजे कारण न दाखवितां दिलेला राजीनामा स्टेट-सेक्रेटरी काय म्हणून पत्करील ? तरुण आय्. सी. एस्. उमेदवारापेक्षां स्टेट-सेक्रेटरी अधिक प्रौढ बुद्धीचा, चार पावसाळे अधिक पाहिलेला असणारच. त्या उमेदवारापेक्षां स्टे. से. लाच त्याचं हिताहित अधिक कळत असावं. असो. मग बोल, तूं नोकरीवर रुजू होण्याकरितां कधीं जाणार ? प्रथम तुला ऑसबोर्नसाहेबांच्याच हाताखालीं काम करायचं आहे हेंहि चांगलंच झालं. कारण ऑसबोर्न हा माझा चांगला स्नेही आहे. तुझ्या इथल्या मुक्कामांत त्याला एकदां खासगी मेजवानीलाच मी बोलावतों म्हणजे झालं.”

यावर चंदु इतकंच म्हणाला, “ असो. करतों त्या गोष्टीचा विचार लवकरच. ”

हें उत्तर मासाहेबांना जरा संदिग्ध वाटलें. म्हणून त्यांनीं प्रेमानें मुलाचा हात धरला व त्याच्याशीं बोलण्याकरितां त्या त्याला आपल्या खोलींत घेऊन गेल्या. दोघे समोरासमोर खुर्च्यांवर बसल्यावर मासाहेब म्हणाल्या, “ चंदू, झाल्या गोष्टी होऊन गेल्या. त्याचं उगीच वाईट वाटून घेऊं नको. आपत्ति आली ती आपणा सर्वांवरच होती. पण ईश्वरकृपेनं ती निभावली. फसला असलास तर तूंच. तूं कांहीं कुणाला फसविलं नाहींस. पण फसण्या-फसण्यांत अंतर असतं आणि फसलास याचं कारण केवळ जगाचा अनुभव नाहीं

इतकंच. एरवीं तुझ्यासारखीं तरुण मुलं अशीं चुकून तरी ईश्वरावर निष्ठा ठेवणारीं या दिवसांत किती मिळतील ? त्या ईश्वरानं तुला फिरून एक संधि तुझ्या आईबापांना सुखी करण्याची दिली आहे. ती त्याला स्मरून घे, आणि आतां मन निर्मळ करून पुढच्या मार्गाला लाग कसा ! ”

चंदु म्हणाला, “ मासाहेब, माझ्या चुका काय झाल्या आणि माझं कर्तव्य काय आहे हें मला कळत का नाहीं ? पण मी इतकंच सांगतों कीं, यापुढं कोणतंहि पाऊल टाकायचं तें तुम्हाला विचारल्याशिवाय टाकणार नाहीं असं वचन देतों. मग तरी झालं कीं नाहीं ? ”

या उत्तरानें मासाहेबांना इतका आनंद झाला कीं, चदूची हनुवटी हातांत धरून ती प्रेमानें हलविल्याशिवाय त्यांच्यानें राहवलें नाहीं.

चंदु गेल्यावर सर गंगाराम मासाहेबांच्या खोलींत येऊन खुर्चीवर बसले आणि हसत-हसत पत्नीकडे पाहून म्हणाले, “ का, काय म्हणतात चिरंजीव ? ”

“ तो काय म्हणणार ? होय, तो म्हणत होता—” मासाहेब मिस्किलपणानं पतिराजांची थट्टा करण्याच्या हेतूनें म्हणाल्या, “तो म्हणत होता, ‘माझी अक्कल एक गेली होती गांवाला मीं गोसाव्यांना घरीं आणून ठेवलें आणि त्यांच्या भजनीं लागलों तेव्हां. पण वडिलांनीं तरी आपलं डोकं ताळ्यावर ठेवायचं होतं कीं नाहीं ? तेहि माझ्या गुरुभजनांत सामील झाले ; मग मी चूक करतों आहें असं मला कसं वाटावं ? ’ मी नाहीं कां राहिलें त्या त्याच्या गोंधळातनं बाजूला ? सुदैवानं बन्सीधर आला अन् कोडं उकलून दिलंन् म्हणून बरं. नाहीं तर हा गोंधळ कुठल्या थराला गेला असतां काय सांगावं ? ”

“ तुम्ही म्हणतां तें खरं आहे, मासाहेब. पण मीं म्हटलं, चंदूच्या तंत्रानंच प्रथम घ्यावं. आपला कावा साधायचा तर दुसऱ्याच्या झुकांड्या-बरोबर थोडं धांवावं लागतं कुणालाहि. पण मासाहेब, मीं एक अजब गोष्ट केली ती कुठं आहे माहीत तुम्हांला आणि त्याला ? ”

“ ती काय ? ”

" कान इकडं करा म्हणजे सांगतों. "

' इश्श ' म्हणून मासाहेबांनीं कान पुढं केल्यावर सरसाहेब म्हणाले, " अहो, आज त्याच्या नेमणुकीचा हुकूम आला असिस्टंट कलेक्टर म्हणून; पण चंदूनं दिलेला राजिनामा टपालांत पडता तर आला असता का तो हुकूम ? "

" कां बरं ? चंदु तर समजतो कीं तो राजिनामा टपालांत पडला होता म्हणून ! "

" मौज तर तीच आहे. तो राजिनामा टपालांत टाकण्याकरितां म्हणून त्याच्याकडून मीं मागून घेतला. पण—"

" म्हणजे ? तो तुम्ही टपालांत टाकलाच नाहीं कीं काय ? "

सर गंगाराम म्हणाले, " मासाहेब, अशी एक म्हण आहे ना जगांत कीं, ' कावळ्यापेक्षां कावळ्याचं पोर शहाणं ' म्हणून ! पण मीं तरी ती म्हण खोटी पाडली या प्रकरणीं. हा पहा चंदूचा राजिनामा. टपालांत टाकायला म्हणून मीं मागून घेतला. पण टाकला नाहीं तो मी आतांपर्यंत. त्याला माझ्या तिजोरींत सुरक्षित जागा दिली होती आणि आतां त्याचा अवतार संपला म्हणून हा पहा मी तो फाडून टाकतों. "

असें म्हणून त्यांनीं त्या कागदाचे अगदीं बारीक तुकडे केले, जवळच्या शेगडींत टाकून दिले आणि ते जळून जावे म्हणून एक सिगारेट पेटवून तीच जळती काडी त्या चिटोऱ्यांवर त्यांनीं टाकली.

मासाहेब म्हणाल्या, " या कपटाला देव तरी कसा नांव ठेवील ? प्रेम माणसाची बुद्धि नष्ट करतं म्हणतात. पण तेंच प्रेम कित्येकदां ती बुद्धि तीव्र करतं हेंच खरं. हें राजिनाम्याचंच पहा ना ! "

असें म्हणून तीं पतिपत्नी समाधानानं आपल्या उद्योगाला गेलीं.

वैद्यकशास्त्रांत रोग प्रतिक्षोभनानें बरा होतो असें सांगितलेंच आहे. वाग्भट म्हणतो, ' ये एव दोषा सुसमा विवृद्धयै । ते एव दोषा विषमा वधाय ' ' विषस्य प्रतिविषं एव औषधम् '. उदाहरणार्थ, अफूचे विषावर धोतरा, किंवा डिजिटॅलिसवर कुचल्याचें सत्त्व दिलें असतां उतारा होतो.

तापाचें एक प्रकारचें विषच असतें. त्यावर प्रतिक्षोभक विष म्हणून बचनाग उपयोगी पडतो किंवा हिंगूळहि. क्षोभाला उलट क्षोभ आणि दाहाला उलट दाह उत्पन्न करितात किंवा बाह्य उपाय वैद्यानें न केले तरी ज्या कारणांनीं शरीरांत रोग उत्पन्न होतो त्यांच्या उलट असलेलीं कारणें आपो-आपहि शरीरांत उत्पन्न होऊं शकतात. ऋतुबदल होणें हें प्रतिक्षोभनच होय. अतिरिक्त मद्यपानानें आलेली मूर्च्छा त्या मनुष्याला एकदम दुःखाची बातमी कानावर गेल्यानें उतरते. थंड बर्फाची पिशवी हें उष्णतेचें प्रति-क्षोभन होय. पोटिसें हींहि अशींच प्रतिक्षोभनें असतात. जुने गांवठी वैद्य पायाला चरका देऊन घेरी उतरवतात किंवा आंतल्या बाजूला गळू झालें तर बाहेरच्या बाजूला चरका देतात.

गुरुमहाराजांच्या नीरस संगतीचा कंटाळा, त्यांचं हास्यास्पद अज्ञान, त्यांच्या मानीव दैवी अंतर्ज्ञानाच्या नव्या नव्या प्रत्ययांचा अभाव, आतां तर त्यांच्या नैतिक अधमपणाचा पुरावा, आणि त्याच्या प्रोत्साहनानें जंबूनें बिंबाच्या बाबतींत केलेला अतिप्रसंग—इतकीं प्रतिक्षोभनें मिळाल्यावर चंदूची गुरुभक्ति व श्रद्धा ढासळावी यांत काय आश्चर्य ? तीं न ढासळतीं तरच तें आश्चर्य !

मनुष्यमात्र हा दैवी सामर्थ्य किंवा गुण यांची जोड नैतिक मानवी गुणाशीं घालतो यांत त्याची कांहीं चूक नाहीं. ईश्वराला मनुष्य आपल्या-सारखा समजतो आणि नीति, सौंदर्य, कल्याण, मंगल या सर्व इष्ट गोष्टींचा तो अखंड निधि आहे असें मनुष्य मानतो. यांत त्याला ईश्वराविषयीं जितकी अधिकांत अधिक चांगली कल्पना करितां येते तितकी तो करितो नव्हे काय ? पण या उची मापानें मोजतांना एखाद्याच्या स्वभावगुणांत जर हीनपणा दिसून आला तर त्याच्या दैवीपणाची कल्पना कशी टिकेल ? अनी-तिमान दुष्ट अशा गुरूसंबंधानें भक्ति ठेवणारा जाणता शिष्य त्या प्रमाणानें स्वतःच तितका अनीतिमान व दुष्ट असला पाहिजे. पण चंदु भोळा असला तरी अनीतिमान व दुष्ट नव्हता खचित. अर्थात अशा अधम गुरूवरून त्याची श्रद्धा उडावी हें स्वाभाविकच होतें.

पण श्रद्धा ढासळण्यानें मनुष्य परत बुद्धिप्रामाण्याच्या मार्गावर यावयास मनानें तयार झाला तरी त्याला उलटी उडी घेतांना थोडी लाज वाटतेच. सरळ प्रांजलपणानें आपली चूक कबूल करणें हें त्याच्या हातून होत नाहीं. म्हणून पूर्वी श्रद्धेच्या मार्गानें जाण्याला जसा दुसरा कोणी निमित्तमात्र झाला, तसा परत सारासार विचारमार्गाला लागण्यालाहि दुसरा कोणी निमित्तमात्र झाला, तर तो मनुष्याला हवा असतो. पूर्वी आडमार्गाला लागण्याला गोसाव्याचा 'अद्‌भुतपणा' कारण झाला, तसा आतां सरळ मार्गाला लागण्याला चंदूच्या आईबापांचें प्रेम हें कारण, मोठें इष्ट, स्वाभाविक व सोईचें होतें आणि तें कारण केव्हांहि तयारच होतें. यामुळें मागच्या पावलांनीं चालतांना चंदूनें आईबापाच्या भिडेला बळी पडण्याचें ढोंग केलें. ब्रह्मचर्याची शपथ व आय. सी. एस.चा राजीनामा या दोन खड्ड्यांतून चंदु बाहेर निघावयाचा होता. पैकीं राजीनामा टपालांत न टाकून सर गंगाराम यांनीं एक साधलें आणि ब्रह्मचर्याची शपथ मोडण्याच्या बाबतींत तो आपल्या आईवर उपकार करण्याला मनानें तयार झाला. मुलाच्या हिताचेंच, आणि तेंहि स्वार्थत्यागपूर्वक असें, आईबापानें केलें तरी त्याचा उपकार आईबापावरच ही या जगाची रीतच आहे. पण ही रीतहि न मानणारे, आणि आईबापांना कस्पटासमान तुच्छ लेखून त्यांना अप्रिय अशाच गोष्टी करणारे कुपुत्र जगांत काय थोडे आढळतात ? आपल्या आईबापांचें ऐकून त्यांच्या इच्छेप्रमाणें वागण्याचा 'उपकार' त्यांच्यावर करण्याला चंदु तयार झाला हें तरी काय थोडें झालें ? येवढ्याकरितां त्याची गणना सुपुत्रांतच होणार !

असो. चंदु लवकरच नोकरीवर रुजू होणार होता आणि ती गोष्ट घडून येऊन चंदूच्या नवजीवनाच्या तंबूची पाहिली मेख रोवून घट्ट झाली म्हणजे मग दुसरी—त्याच्या लग्नाची—मेख रोवायची असें मासाहेबांनीं मनाशीं ठरविलें.

विलायतचें स्टेट सेक्रेटरीचें पत्र आल्यावर दोन दिवसांनीं प्रांताच्या गव्हर्नरकडून चंदूला निमंत्रण आलें. प्रांतांत नवी नेमणूक झालेल्या हिंदी

सिव्हिलियनला भेटीला बोलावणें हा सामान्य शिष्टाचार आहे व प्रत्येक गव्हर्नर प्रायः तो पाळतो.

चंदूच्या वैराग्याविरुद्ध बंड करून उठणाऱ्या गोष्टी, उतारावरील एखाद्या भरलेल्या गाड्याप्रमाणें, त्याच्या अंगावर घसरूं लागल्या होत्या. यामुळें त्याची आय्. सी. एस्. ची. नेमणूक होऊन स्टेट सेक्रेटरीचें व प्रांताच्या गव्हर्नरचें पत्र आलें. यामुळें आतां फिरून उलट खाण्याची शक्ति त्याच्या मनाला राहिली नाहीं. नेमणुकीची जागा पत्करली अशा अर्थाचें पत्र त्यानें स्टेट सेक्रेटरीला लिहिलें आणि भेटीला येतों असें उत्तर गव्हर्नरालाहि धाडलें आणि आतां तो उद्यां निघणार इतक्यांत त्याला विलायतचें एक पत्र अवाचित आलें. त्यांत ऑक्सफर्ड येथील त्याचा प्रोफेसर जीव्हॉन्स यानें खालीलप्रमाणें लिहिलें होतें--

" तू येथून गेल्यानंतर फिरून इतक्या लवकर तुझी माझी गाठ पडण्याचा प्रसंग येईल असें वाटलें नव्हतें. पण सर्व गोष्टी योगायोगानेंच घडत असतात. प्रस्तुत योग असा कीं, सिमला येथें व्हाईसरॉयच्या सेक्रेटरीएटमध्यें माझी दोन वर्षांपुरती स्पेशल नेमणूक झाली आहे. त्या जागेवर रुजू होण्याकरितां मी निघत आहें. मेल बोटीनेंच निघत असल्यामुळें मी मुंबईंत कोणत्या दिवशीं येऊन पोचेन तें तुला कळेलच. मी मुंबईस उतरल्याबरोबर सिमल्याकडे जाण्यास निघणार आहें. तरी त्या वेळीं तूं मला मुंबईस येऊन भेटशील काय ? हिंदुस्थानांतील गांवागांवामधील अन्तरें माहित नसल्यामुळें सहज 'मुंबईला येऊन भेट' असें मी लिहित आहें.पण एवढी खेप त्रासाची होईल कीं काय याचा तूंच विचार करावा. तूं न आलास तर माझा कोणताहि गैरसमज होणार नाहीं. पण आलास तर भेटीचा आनंद होईल हें सांगणें नको. "

हें पत्र वाचून चंदूला आनंद झाला. कारण प्रोफेसर मजकुराचें त्याच्यावर चांगलें प्रेम होतें आणि गुरु म्हटला म्हणजे त्याला आदरानें वागविण्याची उपजत बुद्धि चंदूमध्यें होती हें आतां नव्यानें सांगण्याचें कारण नाहीं.

असो. गव्हर्नराच्या भेटीला चंदु निघाला तेव्हां सर गंगारामहि त्याच्या-बरोबर राजधानीला गेले. चंदु गव्हर्नराच्या भेटींत राजीनामा देणार नाहीं अशी आतां त्यांची खात्री झाली होती. तो वैराग्याचें उसनें खूळ टाकून देऊन प्रवृत्तिमार्गी बनला यांत त्यांना शंका उरली नाहीं. पण राजधानीला जाऊन तेथील चार प्रतिष्ठित लोकापुढें 'हा पहा आय्.सी.एस. चा बाप' म्हणून मिरविण्याचें वैभव त्यांना भोगावयाचें होतें. नववधूच्या जीवनांत एक प्रसंग असा असतो कीं, तो घडून आल्यानंतर तिच्या मैत्रिणी तिच्याभोवतीं जमून तिला भलते सलते प्रश्न विचारीत सुटतात. गव्हर्नरशीं मुलाखत संपवून बाहेर येऊन मोटारींत बसल्यावर सर गंगाराम यांनींहि चंदूला अनेक प्रश्न विचारून भंडावून सोडलें. पण असली मुलाखत मामुली औपचारिक असते. यामुळें उत्तरादाखल अद्भुत असें त्याला कांहींच सांगतां आलें नाहीं. पण आपल्या बापाच्या प्रश्नाचा रोख लक्षांत घेऊन चंदूनें एक खोटी गप्प मात्र त्यांना सांगून दिली. ती अशी, 'सर गंगाराम याना माझे नमस्कार सांगा असें गव्हर्नरसाहेब शेवटीं मला म्हणाले.' स्वतः आपल्याला भेटीला बोलावून गव्हर्नरसाहेब आपलें अभिनंदन करितील असें सरसाहेबांना वाटत असावें. पण त्यांत मात्र त्यांची निराशा झाली.

गव्हर्नरची मुलाखत झाल्यावर सर गंगाराम नवलपुरला परत आले. पण ऑक्सफर्डच्या प्रोफेसरला भेटण्याकरितां चंदू एक नोकर बरोबर घेऊन परस्पर मुंबईला गेला.

दोन प्रहरीं तो आपल्या मित्रांना भेटण्याकरितां हिंडला. त्यामुळें त्याचें मन प्रसन्न होऊं लागलें. कांहीं मित्रांना त्याच्या स्थित्यंतराची उडती हकीकत समजली होती व त्याच्याविषयीं काळजी वाटूं लागली होती. पण तो आज फिरून नेहमींसारख्या पोषाखांत भेटला-बोलला हें पाहून त्यांची काळजी दूर झाली. बाजारांत हिंडून त्यानें कांहीं वस्तु विकत घेतल्या. त्यांत सर गंगाराम व मासाहेब यांना विशेष आवडतील अशा कांहीं घेतल्या; पण त्याबरोबर एक मोठा सुंदर पितळी पिंजरा दिसला तोहि घेतला. या पिंजऱ्यावर रंगी बेरंगी मीन्याचें काम केलेलें असून आंत एक मंजुळ घंटा

अशा रीतीनें बसविली होती कीं, पिंजऱ्यांतील पक्ष्यानें इकडे तिकडे हालचाल केली म्हणजे ती वाजावी.

संध्याकाळीं चार वाजतां तो ताजमहाल हॉटेलमध्यें गेला. प्रो. जीव्हॉन्स यांचा पत्ता काढून तो त्यांच्या खोलींत गेला. दोघांनाहि नव्या मोठ्या नोकऱ्या मिळाल्या, यामुळें त्यांनीं परस्परांचें अभिनंदन केलें. प्रोफेसर म्हणाले, " मि. चंदू, इथे आल्यावर तुमचीच ही गांठ पहिली ! पण आतां लगेच बाहेर पडून, जेवणाच्या वेळेच्या आंत परत येऊन, रात्रीची मेल गांठली पाहिजे मला. "

चंदू म्हणाला, " मग आज बंदरांत बोट बरीच उशीरा आली म्हणायची ?"

" होय; मुंबईपासून शंभर मैलावर तिच्या इंजिनांत थोडा बिघाड झाला. ती पुढें ऑस्ट्रेलियाला जाणार आहे. म्हणून बंदराच्या अधिकाऱ्यांनीं जलदी करून तिला बंदरांत घेतली. नाहींतर आणखी उशीर लागला असता ! "

कांहीं वेळ बोलणें झाल्यावर " ठीक आहे. आतां पुन्हा भेटीचे प्रसंग येतीलच " असें म्हणून प्रोफेसरसाहेबानीं रजा दिली. चंदू हॉटेलांतून बाहेर पडला. वेळ पांच वाजण्याची. करावयाचें असें काम कांहीं नव्हतें. तेव्हां सहज पायानें हिंडून फिरून समुद्राचा व बंदराचा देखावा पहावा अशा हेतूनें चंदु अपॉलो बंदराकडे निघाला.

या बंदरावरील दगडी कठड्याला आधारून उभा राहणाराला वाटेल तर समुद्राची व वाटेल तर बंदराकडील शहरभागाची मौज पाहावयास सापडते. चंदूनें विलायतेंत समुद्राची शोभा पुष्कळ पाहिली होती. पण स्थळपरत्वें प्रत्येक बंदरकिनाऱ्याची शोभा वेगवेगळीच असते. बंदराच्या पायऱ्या चढून आल्यावर जो एक चौतोंडी वेशीचा शोभिवंत दगडी बुरूज लागतो तो चंदूनें पूर्वीं पाहिलेला नव्हता. याला ' गेट-वे ऑफ इंडिया ' म्हणतात. अर्थात हिंदी व इंग्रज यांच्या भेटीच्या योगायोगाचीच ती जागा ! वेशींतून आंत किंवा बाहेर पडलें असतां कोणाची कशी गांठ पडेल काय सांगावें ?

आणि खरोखरच आज चंदूला तसा अनुभव आला. बंदराच्या पायऱ्या संपल्याबरोबर उभा राहण्याची एक सपाट फरशीची जागा आहे. त्यावर चंदु उभा होता. तिच्यावरून कांहीं लोक खालीं जात, कांहीं वर येत. खालीं जाणारे बहुधा होडयानावांत बसून बंदरांत सहलीला जाणारे असतात. त्यांच्याकरितां लहानमोठ्या होडया व नावा नांगरून ठेवून बंदरी नावाडी हौशी प्रवाश्यांची वाट पाहत असतात. रिकामपणीं अशा एखाद्या नावेंत बसून बंदरांत हिंडून येण्यासारखी करमणूक दुसरी कोणती असणार ? चंदूच्याहि मनात हीच कल्पना येऊन तो एकदोन पायऱ्या उतरून जातो तोंच खालच्या नावाडयांनीं 'माझ्या नावेंत या' असें म्हणून ओरडून गिल्ला केला. विलायतेंतले नावाडी तर असे कधीं करीत नाहींत ! चंदूला या दंगलींतून पार कसा पडतों असें झालें. शेवटीं एका नावाड्याचा हात पकडून तो एका नावेंत जाऊन बसला. ही नाव शिडाची व वल्ह्यांची होती. तीच त्याला बरी वाटली. मोटारलॅांच त्यानें पसंत केली नाहीं.

चंदु नावेंत बसला. पण तींतील दोघांपैकीं एका खलाश्याला आपलें वल्हें बिघडलें असें वाटून दुसरें आणण्याकरितां म्हणून तो घाईनें वर गेला. दुसरा खलाशी सुकाणूवर हात देऊन स्वस्थ बसला होता. नाव जागच्या जागीं स्तब्ध पण हेलकावे खात होती. सुमारें पांच-सात मिनिटांनीं, तो वल्हें आणण्याकरितां गेलेला खलाशी हातांत वल्हें घेऊन पायऱ्या उतरूं लागला. पण आतां तो एकटा नसून त्याच्याबरोबर एक पोरवयाची आंग्ल तरुण स्त्री खालीं येत होती. खलाशी पाठमोरा होऊन तिला वाट दाखविल्यासारखा हात करीत पायऱ्या उतरत होता; व ही स्त्री आपला झगा वर उचलून उंच टाचेचा बूट हळूहळू टेकीत एक एक पायरी सावधगिरीनें उतरत होती.

नावेशीं येतांच खलाश्यानें एका हातानें नावेची बावखड धरून ती नाव स्थिर करण्याचा प्रयत्न केला, आणि दुसऱ्या हातानें नावेंत उतरण्याची जागा त्या स्त्रीला दाखवीत होता. तिला पहातांच चंदु उठून उभा राहिला. त्यानें तिच्या तोंडाकडे निरखून पाहिलें व तो स्तंभित झाला ! पण ती

स्त्री हंसत म्हणाली, " वा:, हेंच का तुमचें हिंदी तरुणांचें स्त्रीदाक्षिण्य ? या हलत्या-डोलत्या नावेंत उतरतांना मी तोल जाऊन समुद्रांत पडलें तर मरेन ना ! असें बघतां काय ? हात द्या नावेंत उतरायला ! "

भान न राहून अगदीं अजाणता चंदूनें हात पुढें केला. त्याला धरून ती आंत उतरली, आणि चंदूला खालीं बसवून त्याच बाकावर त्याला खेटून तीहि बसली !

सुकाणू धरून बसलेला खलाशी आपल्या सोबत्याला म्हणाला, " अरे, काय तुझी तरी छाती म्हणावी ! या नावेंत काळा अदमी आधीं बसविलेला माहीत असतां, या गोऱ्या अंग्रेज पोरीला त्याच नावेंत बसायला बोलवायची तुला छाती तरी कशी झाली ? पैसे उकळायचा लोभ झाला म्हणून काय झालं ? बरं तर बरं; नाहीं तर लेका आपला अपमान झाला असं म्हणून तिनं तुझ्या ढुगणावर बुटाच्या लाथा देऊन पायऱ्यावर पाडला असतां तर ? तरी बरं, तिचा गोरा मरद या वेळीं तिच्या संगतीं नाहीं. नाहीं तर त्यानं तुझी चामडीच लोळविली असती. "

तो दुसरा खलाशी म्हणाला, " वा:, तूं मला काय असा अगदीं विनअकली समजतोस कीं काय, मीहून या बाईला आमच्या नावेंत बोलवायला ? काळ्या अदमीचं भाडं आधीं धरलं तें काय मला माहीत नव्हतं ? पण खरं असं झालं बघ. खलाश्यांच्या घोळक्यांत ही पोरगी चार पायऱ्या खालीं आल्यावर तिला आमची ही नाव दिसली. त्यांत कोण बसलं आहे हें तिनं नीट न्याहाळून पाहिलं आणि मग ती, हातांनीं खलाश्यांची गर्दी दूर करून, आमच्या नावेकडंच चालली असं पाहिलं, तेव्हां मी तिला वाट मोकळी करून देऊं लागलों. एरवीं गल्लींतल्या चात्ऱ्या कुत्रीवाणी गोरी मडम आमच्या अंगावर चवताळून येती आणि बुटाची लाथबी उगारती अंगावर, हें काय मला म्हाईत न्हाई व्हय ? मला वाटलं कीं त्ये बुवाची आणि ह्य बाईची वळख असल कुठल्ची बी ! अरं, गोरं अन् काळं इष्काच्या भरांत समदं एकच. बघ, कसा खांद्याला खांदा अक्षी भिडवून बसलिया'ती ! "

या दोघां खलाश्यांचं हें भाषण ऐकण्याच्या मिषानें चंदु व आंग्ल स्त्री स्तब्ध बसलीं. पण मग ती स्त्री आपण होऊन बोलूं लागली– "वेल् चंदू, तुला आठवतं का तें ? हॅम्पस्टेड हीथच्या जत्रेंत एका पाळण्यांत मी आधीं जागा धरून बसलें, अन् दैवयोगानं मग तूं तिथं आलास आणि येऊन बसलास त्या पाळण्यातल्या दुसऱ्या रिकाम्या जागेवर आणि आज अगदीं त्याच्या उलट घडलं ! तें असं कीं, तूं या नावेंत आधीं जागा धरून बसलास आणि मग उरली रिकामी जागा मला मिळाली ! तूं खंडा परतविलास म्हणायचा मजवर ! "

" मे-री " चंदु तिच्याकडं वळून चाचरत म्हणाला, " मेरी, पण मी या नांवानं भलत्या एखाद्या स्त्रीला हांक मारून तिचा अपमान आणि माझी फसवणूक तरी करून घेत नाहीं ना ? बाई, तुम्ही मेरी वोडहाऊसच का ? मी कांहीं चूक तरी करीत नाहीं ना ? "

" अरे वेड्या, मी मेरी वोडहाऊस नसतें तर अशी आपण होऊन एका नेटिवाशेजारीं नावेंत येऊन बसलें असतें का ? चंदू, तुझा भ्रम जायला मी आणखी कोणती खूण तुला पटवूं ? हे खलाशी जवळ आहेत म्हणून.नाहीं तर तशीहि एखादी खूण पटाविली असती मेरी वोडहाऊसची " असं म्हणून ती आणखी थोडी चंदूकडे सरकून बसली. हें पाहून तो वल्हे-वाला खलाशी म्हणाला, " अरे इच्या मारी, ही बया अशी घुसूंच लागली कीं या बाप्याच्या कुशींत—बिळांत घूस घुसते तशी. ". खलाशी कोकणी होते. त्यांची भाषा चंदू-मेरीला कशी कळणार ?

ती स्त्री म्हणाली, " चंदू, तूं आज मला आश्चर्यानं थक्कच करायचं मनांत आणलं आहेस अस दिसतं. "

" तें कसं ? "

" मला न ओळखण्याचा बहाणा फारच चांगला चालविला आहेस म्हणायचा ! तूं बोलतांना इतका भ्यालास, चाचरलास कां ? "

" काय ? भुता-पिशाच्चांशीं बोलतांनाहि भीति वाटूं नये ? तूं मेरी

वोडहाऊस नसून तिचं भूत असलं पाहिजेस. कारण मेरी वोडहाऊस मेल्याची मला प्रत्यक्ष तारच आली होती विलायतेहून ! ”

“ होय, तसं म्हटलं तरी काय झालं रे ? तुम्हां हिंदूंचा पुनर्जन्मावर विश्वास असतो ना ? ”

“ होय; पण पुनर्जन्म घेतलेला आत्मा या जगांत भेटत नाहीं आणि भेटला तरी जुन्या देहानं व वेषानं भेटत नाहीं. दुसऱ्या योनींत जातो, व तो निराळं रूप घेतो. मेरीचा पुनर्जन्म झाला असला तर ती मला भेटेलहि. पण कदाचित् एखाद्या कुत्रीच्या किंवा डुकरिणीच्या देहांत ! आणि आपणाला असा अपवित्र ओंगळ देह मिळाला याची लाज व खंती वाटून ती माझ्या दृष्टीला पडण्याचें टाळील. तुझ्यासारखी अशी निर्लज्जपणानं माझ्या अंगाला खेटून बसणार नाहीं. मुद्दाम मी बसलेल्याच नावेंत येऊन असं ठाण मांडणार नाहीं.”

हें बोलतांना चंदूचा स्वर रागानं थोडा चढूं लागला होता आणि तो मेरीपासून झटकून एका फुटाच्या अंतरावर सरकून बसला.

खलाश्यांनीं नाव यापूर्वींच शीड सोडून चालू केली होती; व सुकाणूवाला खलाशी बंदरांतील सफरीच्या ठराविक गोलाकार मार्गानें ती वळवीत होता. संध्याकाळचा वारा सुटल्यानें समुद्राच्या पाण्यावर लाटा उठूं लागल्या होत्या आणि नाव हेलकावे खाऊं लागली होती. मेरी व चंदु बसल्या जागीं डळमळूं लागले होते. पण असें डळमळून झोके खाण्याच्या आनंदाकरितांच बंदरांत समुद्रावर होड्यांतून-नावामधून बसून चैनी लोक हवाखोरीची सफर करतात.

मेरीला अशा झोक्यांची सवय विलायतेंतली होतीच. परंतु तिनें भिण्याचें सोंग केलें आणि चंदूच्या बाजूला सरकून म्हणाली, “ चंदू , डार्लिंग, त्या दिवशीं जत्रेंतील पाळण्याच्या झोक्यांनीं मला घेरी येऊं लागली त्या वेळीं तुझ्या हाताचा आधार मला किती तरी उपयोगी पडला. आजहि तो हवा आहे तो दे ना ! मला या लाटांच्या झोक्यांनीं भोवळ करते. ” असें म्हणून

तिनें चंदूच्या हाताला आपल्या हाताचा विळखा घातला आणि त्याच्या खांद्यावर आपली मान टेकली.

चंदूला ही अप्रिय मगरमिठी सोडवेना. तिला ढकलून दूर लोटणें हें त्या खलाश्यांच्यादेखत वाईट दिमलें असतें, नव्हे काय ? म्हणून त्यानें तिच्या हाताचा विळखा सोडविला नाहीं. तो इतकेंच म्हणाला, " यापुढें या जगांत ज्याच्या हाताचा आणि खांद्याचा आधार घेण्याचा हक्क तूं मिळविला आहेस तो कुठें आहे ? "

तो हें तिला टोचावें म्हणून बोलला खरा. पण आपली जागा दुसऱ्यानें घेतली आणि मेरीनें आपल्याला फसविलें, हास्यास्पद केलें, याच्या चंदूला मनांत अत्यंत वेदना झाल्या. खरें सांगावयाचें तर त्यानें विलायतेंत असतां कोणाहि स्त्रियांशीं वागतांना अत्यंत संभावित व गंभीर वृत्ति ठेवली होती. तो मिश्र समाजांत मिसळे. पार्ट्यांना–समारंभांना जाई. नाचाच्या–करमणुकीच्या कार्यक्रमाचींहि तिकिटें विकत घेई. पण बाजूला बसून नाच पाही. स्वतः त्यांत कधीं भाग घेत नसे आणि मेरी वोडहाऊसची व त्याची गाठ दैवानें घातली नसती तर विलायतेहून तो अगदीं निष्कलंक कोरा करकरीत आला असता. पण मेरीच्या अंगीं इतकी जबरदस्त मोहनी होती कीं तिनें त्याला शरयूचा विसर पाडला, व स्वतःशीं लग्न करण्याला तयार केलें. तात्त्विक दृष्ट्या मिश्र विवाहाला तयारी नसावी इतकी त्याची सनातनी वृत्ति नव्हती. शरयूसंबंधानें वाङ्निश्चय झाला तो त्याच्या आईबापांनींच केला होता. शरयूच्या शरीराला आजवर अजून त्यानें अंगुलीनें स्पर्शहि केला नव्हता. येऊन जाऊन तें लग्न मोडल्याचाच काय तो वाईटपणा. बरें, विलायतेंत मेरीशीं त्याचा वाङनिश्चय झाला होता तरी संभावित भावी वधूवरांच्या हातून अगदीं सामान्य प्रकारचे जे प्रणयलीलांचे प्रकार होतात त्यापलीकडे चंदूची मजल गेली नव्हती. तसें त्यांना आवरणारें कोण होतें ? मेरी तर स्वैरवृत्तीची व सर्वस्वीं स्वतंत्र होती; पण त्यांच्या प्रणयलीला योग्य मर्यादेंत राहण्याचें सर्व श्रेय चंदूलाच होतें. त्याचें पाऊल पुढें पडलें असेलच तर तिच्याशीं लग्न करण्याचें वचन देण्यांत व घेण्यांत आणि या सर्व

गोष्टीमुळें मेरीनें आपल्याला अत्यंत अन्याय केला व मूर्खांत काढलें असें वाटून चंदूला दुःख झालेंच; पण त्याहून राग अधिक आला. तो म्हणाला, "मेरी, तूं स्त्री आहेस आणि एक वेळ माझें प्रेम तुझ्यावर खरोखरच होतें. यामुळें मला तुझ्याशीं याहून अधिक कठोरपणानें वागतां येत नाहीं. पण आतां तूं मजवर एक तरी कृपा कर. ती ही कीं तुझ्या मृत्यूसंबंधानं मला जी तार आली ती तूंच केली असावी अशी शंका येण्याला कारणें घडलीं आहेत. म्हणून मला मोकळ्या मनानं सर्व कांहीं सांग."

मेरी म्हणाली, "तुझा प्रेमळपणा पाहून तुझ्यावरून देह ओवाळून टाकावा असं मला वाटतं. पण दैवापुढं इलाज नाहीं. तुझी शेवटची भेट झाल्यावर मी सहज एका पुस्तकाच्या दुकानीं गेलें आणि हिंदुस्थानासंबंधीं कांहीं पुस्तकें विकत घेण्याचें ठरवून तेथील कपाटें चाळलीं. त्यांत मिळालेल्या पुस्तकांत हिंदुस्थानांतील जंगली खेडेगांवें, अरण्यें, दलदली, साप, विंचू, सुसरी, मगर, वाघ, सिंह यांचीं इतकीं भेसूर वर्णनें होतीं कीं, तीं वाचून माझ्या अंगावर भीतीनें कांटाच उभा राहिला. हिंदुस्थानात चेटकिणी असतात. त्या माणसांना वेड लावतात, आणि योगी लोकांच्या सामर्थ्यानं भुतं व पिशाच्चं भरदिवसा धिंगाणा घालतात असंहि मीं त्या पुस्तकांत वाचलं आणि मग तुझ्यावर प्रेम असलं तरी अशा भयंकर हिंदुस्थानांत सर्व जन्म काढण्याची कल्पना जिवावर आली. मग मी विचार केला कीं, तुझा प्रेमपाश कसा तोडावा? तेव्हां मी निश्चय केला कीं, मी मेल्याचीच तार तुला पाठवावी, म्हणजे तुला सर्वांत. अतिशय तीक्ष्ण असं दुःख काय व्हायचं तें एकदां होईल, आणि मग तूं माझा नाद सोडशील!"

"असं!" चंदु रोखून म्हणाला, "म्हणजे त्या कमालीच्या दुःखांत तूं दुसऱ्याशीं विवाह केलास या बातमीचं गौण दुःख सहज समावून जावं असंच कीं नाहीं? आमच्या इकडे म्हणच आहे कीं, हत्तीच्या पायांत इतर सगळ्यांचे पाय आले. तसंच मृत्युच्या दुःखांत प्रेमभंगाचं दुःख! बरं, मग तुझ्या मृत्युची बातमी जर खोटी, तर युनियन चर्चमध्यें झालेल्या तुझ्या

प्रेतसंस्काराची देखील बातमी खोटीच असली पाहिजे ! पण तीहि तुझ्या तारेंत होती ? ”

आपण बोलतों यांत कांहीं विशेष नाहीं अशा थिल्लर लाघवी स्वरानें मेरी म्हणाली, “ एका खोट्यापोटीं सगळीं खोटीं आलींच ! युनियन चर्चमध्यें पुरलं गेलं तें तुला दिलेलं लग्नाचं वचन, आणि त्या चर्चमध्यें खरं घडलं तें माझं लग्न. ”

चंदु म्हणाला, “ मग तुझ्यासारख्या विश्वासू मुलीला जन्माची सहचारिणी करणारा तो भाग्यवान पुरुष कोण व कुठें आहे ? आणि इतक्यांतच त्यालाहि झुकांडी देऊन तू हिंदुस्थानांत आलीस कीं काय ? ”

“ नाहीं रे, असं निष्ठुरपणानं बोलूं नकोस ! मला सिनेमा नटी होऊन आपलं दैव काढण्याची हौस होती आणि ती साधावी म्हणून मी इंग्लंडांतल्या एका सुप्रसिद्ध चित्रपट कंपनीच्या मॅनेजराशीं लग्न केलं. तो व मी मिळूनच ऑस्ट्रेलियाला निघालों आहों. कारण आमच्या पुढच्या चित्रपटाचं कथानक त्या देशाच्या जीवनांतलं घेतलं आहे, आणि तिथल्या जंगलांत आमचं पुष्कळसं शूटिंग व्हायचं आहे ! ”

“ शूटिंग शिकारींतलं कीं सिनेमांतलं ?” चंदुनं हसून विचारलं.

“ दोन्ही प्रकारचं ” मेरी म्हणाली. “ पण तुला हसूसं आलं ?”

“ नाहीं म्हटलं, हिंदुस्थानांतील ज्या क्रूर श्वापदांपासून तूं आपला बचाव करण्यासाठीं माझा प्रेमभंग केलास तशाच एखाद्या श्वापदाची झडप तुझ्यावर पडली तर ? याचा कांहीं विचार केलास का ? ”

चंदूच्या मनांतून ती आतां इतकी उतरली होती कीं खरोखरच एखाद्या श्वापदानं तिला त्याच्या समक्ष ठार करण्याकरितां उडी घातली असती, आणि तिनं त्याला मदतीला धावण्याची हांक मारली असती, तरी गुरुमहाराजांपुढं घेतलेल्या अहिंसेच्या शपथेची सबब तो सांगता ! पण तसें कांहीं न दर्शवितां तो म्हणाला, “ आतां फक्त त्या तारेंतील शेवटच्या वाक्याचा अर्थ सांग. म्हणजे मरतांना तुझ्या जिव्हेवर माझं नांव होतं हें कसं काय ? ”

" यांत काय सांगायचं ? " मेरी हसून म्हणाली, " आम्हा विवाहोत्सुक तरुणींच्या जिव्हेवर कोणतंहि नवं नांव येईपर्यंत एखादं जुनं असावंच लागतं, तसं तुझं होतं. यांत खोटं कांहींच नाहीं. "

मेरीनं हे जे बेछूटपणे खुलासे दिले ते ऐकतांना चंदूच्या काळजावर घणानं घालावे त्याप्रमाणें आघात होत होते.मनुष्यजीवनाचा त्याला चमत्कार वाटला. आपल्या सरळ एकेरी मनाची त्याला कींव आली. स्वप्न पाहून जागें व्हावें तशी त्याची मनःस्थिति झाली.

चंदु म्हणाला, " तुझं नवं आडनांव अजून मला कळलं नाहीं, तें कूपर काय ? म्हणून जुन्या मिस् मेरी वोडहाऊस या नांवानंच संबोधतों यांत चूक असेल तर क्षमा कर. पण मी तुला इतकंच सांगतों कीं तूं हिंदुस्थानविषयक पुस्तकावरून म्हणून माझ्या देशाचं जें वर्णन दिलंस तें खरं नाहीं. उलट विलायतेंत सर्प नाहींत असं कोणी म्हणतात तेंहि पण खरं नाहीं. कारण तुझ्या सहवासानंतर आतां मला कोणी विचारलं तर मी त्यांना बेलाशक सांगूं शकेन कीं, इंग्लंडांत सर्पजातीचे प्राणि आहेत आणि त्यांतील कांहीं नागिणींना मनुष्यवाणी आहे. हिंदुस्थानची अपूर्व माहिती मिळवण्याकरितां पुस्तकं विकत घेण्याला मीं पाठविलेले तीनशें पौंड तुला पुरे झाले नसले तर सांग आणखी देतों. कारण आमच्या हिंदुधर्मशास्त्रानं प्रायश्चित्ताच्या विधींत द्रव्यदानाला पहिली जागा दिली आहे. "

आतां या संभाषणाला अप्रिय अशी कलाटणी मिळत चालली होती हें उघडच दिसलं. पण इतक्यांत बंदरांतली सफर पुरी होऊन ती नाव धक्क्याच्या पायऱ्याशीं येऊन भिडली होती. नावेंतून मेरीच आधीं उतरली. यामुळं आतां कोणी कोणाला हात देण्याचा प्रश्नच नव्हता. दोघेंहि पायऱ्या चढून वर गेलीं तों त्या ठिकाणीं, पाहिल्याबरोबरच चंगीभंगी दिसावा असा एक इंग्रज तरुण उभा होता. त्याला पाहातांच मेरी म्हणाली, " टॉम, बंदरांतील हवाखोरीची सफर किती चांगली झाली म्हणून सांगूं ! "

तो तरुण म्हणाला, " हें काय सांगायला पाहिजे ? अशासारख्या उमद्या तरुण सोबत्याच्या सहवासांत तुझ्यासारख्या हौशी तरुणीचा वेळ

आनंदांत जाणारच ! पण तुम्हां दोघांची एकाच नावेंत गांठ कशी पडली ? ”

मेरी म्हणाली, “ बाबा, हे सगळे योगायोग असतात ! या गृहस्थांची माझी विलायतेंत ओळख झाली होती. पण इतक्यांत या मुंबईत अशा प्रसंगीं त्या ओळखीची उजळणी होईल असं स्वप्नांतहि नव्हतं. ”

चंदु आणखी वेळ उभा राहिला नाहीं. त्यानं आंदोलनाकरितां नुसता हातहि पुढं केला नाहीं. परंतु मेरीनें त्याच्याकडे पाहून हंसत हंसत आपलीं दोन बोटं ओठांना लावून त्याचं चुंबन घेऊन आपलं पुरुषदाक्षिण्य प्रगट केलं. चंदूनं नुसती मान हलवून त्याचा स्वीकार केला, आणि पाठमोरा होऊन तो तडक टॅक्सीच्या अड्ड्याकडे निघाला.

हा सर्व प्रकार अचानक झाला. पण त्यामुळं चंदु मनांतून इतका शरमिंदा–खजील झाला कीं त्याच्या अंगांत ज्वर भरूं लागला. त्यानें कशी तरी टॅक्सी गांठली आणि तो सरदारगृहांत जाऊन अंथरुणावर पडला तों त्याच्या अंगांत ताप फणफणला. प्रेमळ पण गंभीर वृत्तीच्या तरुणांना हा धोकाच असतो.



## वैराग्य ओसरलें : : २४

रात्रभर चंदु अंथरुणावर कण्हत पडला होता. त्याच्या नोकरानें ‘ डॉक्टर आणूं काय’ म्हणून विचारलें. त्याला चंदूनें नकार दिला. त्याला माहीत होतें कीं हा ज्वर मनःसंतापानें आलेला असून तो आपोआप बरा होणारा आहे.

दुसरे दिवशीं रात्रीच्या मेलनें पहिल्या क्लासमधील जागा रिझर्व्ह करून चंदु नवलपूरला गेला. मुलगा मुंबईहून तापानें फणफणून आलेला पाहून सर गंगाराम व मासाहेब घाबरून गेलीं आणि त्यांनीं डॉ. जालंदरला बोलावणें पाठविलें. तो आल्यावर चंदु त्याला कानांत हळूच म्हणाला, “ जालंदर, दे मला एखादं साधं शामक कांहीं तरी. मी उद्यां परवां बरा होतों कीं नाहीं

पहा ! हा ताप·शुद्ध मनःक्षोभाचा आहे आणि तो क्षोभ तरी कशामुळें झाला हें मी बरा झाल्यावर स्वस्थपणें सांगेन. ”

डॉ. जालंदरानें सर गंगाराम व मासाहेब यांची खात्री करून देऊन हमी घेतली कीं मी चंदूला तीन दिवसांत बरा करतों. तुम्ही त्याच्या नेमणुकीच्या गांवच्या नव्या बिऱ्हाडाची व्यवस्था करा.

पण नव्या बिऱ्हाडाची कल्पना निघाल्यानें चंदूच्या लग्नाची कल्पना मासाहेबांच्या मनांत येणें अगदीं स्वाभाविक होतें. जालंदर म्हणाला, “ ठीक आहे. त्याहीसंबंधानें मी सांगेन तशी हळूच युक्ति करा. ”

विचारविनिमय होऊन अशी युक्ती ठरली कीं प्रथम रायबहादूर शामलाल यांनीं एकट्यानं चंदूच्या समाचाराला जावं. मग बायका माणसांनीं. त्याप्रमाणं रायबहादूर आले. त्यांच्याशीं चंदु अगदीं जुन्या जिव्हाळ्यानें बोलला. त्याची नेमणूक शामपूर जिल्ह्यांत झाली होती. तो गांव रायबहादूर यांचा मूळचा राहण्याचा. तेथें त्यांची जमीनदारी, गांवांत जुना वाडा, व गांवाबाहेर नव्या पद्धतीचा बंगला होता. रायबहादूर म्हणाले, “ माझा गांवाबाहेरचा बंगला अगदीं रिकामा आहे. तुमची हरकत नसली तर तो तुमच्या राहण्याकरितां तयार करवितों. ” याला चंदूला नकार देण्याचें काय कारण ? मग रायबहादूरांनीं शामपूरचें सर्व प्रकारचें वर्णन चंदूला ऐकविलें. तेव्हां अशा चांगल्या गांवीं आपली नेमणूक झाली याचा त्याला आनंद झाला.

दुसरे दिवशीं तिसरे प्रहरीं चंदु अंथरुणावर वर्तमानपत्रें चाळीत पडला असतां, मासाहेब आपल्याबरोबर रायबहादुरांची पत्नी आणि शरयू यांना घेऊन आल्या. यांत वास्तविक परके असे कोणीच नव्हते; पण मध्यंतरीं आलेल्या विच्छेदानें परकेपणाचा संकोच उत्पन्न झाला होता खरा ! आणि वधूची बाजू नेहमीं पडतीच असावयाची ! असो. या तिघींच्या खुर्च्या एकाजवळ एक ठेवलेल्या असून दाराजवळचा पडदा ओढून घेतला होता.

बोलण्याचें काम मासाहेबांनीं आपणाकडे घेतलें होतें. रायबहादुराच्या पत्नी एखादा शब्द केवळ मौनाचें स्वरूप टाळण्याकरितां बोलत ! मात्र खरें

मौन शरयूनें स्वीकारलें होतें. चंदू हा नियोजित वर, आणि तो स्वतः तिलाहि पसंत होताच. दोघेहि सारखींच अनुरूप तुल्यगुण. पण चंदूनें मध्यंतरीं माघार खाल्ली, माया पातळ केली, या गोष्टीचा शरयूला मनांतून राग का आला नसेल? तिलाहि स्वाभिमान नव्हता का? समजा, चंदूऐवजीं शरयूनें, लग्न ठरल्यानंतर कांहीं कारण लावून, त्याला नकार दिला असता तर चंदूला राग आला नसता काय? तसाच शरयूला! स्त्री-पुरुषांच्या समान हक्काचें जग व्यवहारांत उतरावयाला अद्यापि अवकाश असो. पण स्वाभिमानी स्त्रिया भावनेच्या बाबतींत हा हक्क मनांतल्या मनांत तरी आजहि उगवून घेतल्याशिवाय राहत नाहींत. तो हक्क शरयूनें प्रस्तुत प्रसंगीं अशा रीतीनें उगवून घेतला. ती जरी चंदूच्या खोलींत बसली होती तरी ती अशी आडवी तिरकस कीं चंदूची व तिची दृष्टादृष्ट होऊं नये.

कांहीं वेळ असा गेल्यावर एका नोकरानें हळूच येऊन मासाहेबांना बाहेर बोलावलें. त्या गेल्यावर त्यांचा निरोप आला म्हणून शरयूच्या आईला बाहेर जावें लागलें. ती जातांना म्हणाली, "उठूं नको शरयू! बाहेर थोडें काम आहे तें करून मी दोन मिनिटांत येणार आहें. सर्वांनींच बैठक मोडणें बरें नव्हे." त्यांनीं जातांना पडदाहि पुरा ओढून घेतला. बोलून चालून हें नाटकच होतें!

शरयू एकटीच असल्यामुळें चंदूचें स्त्रीदाक्षिण्य प्रभावी झालें. तिचें तोंडहि आपणांकडे नाहीं असें पाहून त्यानें तिचें नांव घेऊन तिला हांक मारली. शरयूला त्याच्याकडे तोंड फिरविणें प्राप्तच झालें. पण तें फिरलें तें मात्र अश्रूंनीं मलिन झालेलें! पुरुषाचे अश्रू हे केवळ दुःखाचें चिन्ह असतात. पण स्त्रियांचे अश्रू हे दुःखाप्रमाणें त्यांच्या रागाचेंहि दर्शक असूं शकतात. 'रुदन हेंच आयुध आमुचें' हें लहान मुलाप्रमाणें स्त्रियांनाहि म्हणावें लागतें. पण त्याच पद्यपंक्तीचा उरला अर्ध असा कीं, 'सर्वदा विजयी असे!' स्त्रियांचें रुदन विजयी ठरतें. शरयूचेंहि विजयी झालें.

न बोलता वादाचा निर्णय लागण्यापैकीं तो एक प्रसंग होता. चंदू विलायतेंत मेरीजवळ बसलेला असता तर तो अंथरुणावरून उठून तिचे अश्रू

आपल्या हातरुमालानें पुसता. पण आतां तो हिंदु कुमारिकेशीं बोलत होता. तथापि हातानें अश्रू पुसण्यापेक्षांहि ज्याला अधिक नैतिक मूल्य आहे अशी गोष्ट त्यानें केली. तिच्या अश्रूंचा सर्व वृत्तांत त्याला कळायला वेळ का लागणार ? त्यानें एकदम हात जोडून शरयूला नमस्कार केला व तो सद्गदित कंठानें म्हणाला, " शरयू, मी खरोखरच तुझा अपराधी आहें. मला क्षमा करशील ना ?" मात्र या क्षमायाचनेनें तिचे अश्रू पुसले न जाता ते थोडे अधिकच जोरानें वाहूं लागले !

अशा भावनाक्षोभाचें परिमार्जन वेगळ्या रीतीनें व्हावें हें बरें ! त्याकरितां चंदूला एक युक्ति सुचली. तो म्हणाला " शरयू , माझें एक काम कर बरें ! तो पितळेचा पिंजरा खालीं काढ आणि त्याचें तोंड उघड. "

' पण त्यांतला तो पक्षी उडून जाईल ना ? ' असा प्रश्न शरयूच्या तोंडीं सहजच आला. पण तो प्रश्न विचारूनहि ती उठली व तिनें हाताशीं येणारा पिंजरा खालीं घेतला.

चंदु म्हणाला, " होय शरयू ; पिंजऱ्याचं दार उघडल्यावर तो पक्षी बाहेर उडून जाईल, आणि मलाहि पण तेंच करायचं आहे. त्या बिचाऱ्याची मादी मीं बंदुकीनें मारली. त्याला दुःख दिल्याच्या भावनेनं माझं प्रेम त्याच्यावर बसलं. म्हणून मीं त्याला पिंजऱ्यांत ठेवलं. आपल्या हातानं दाणापाणी घालतों. हें सर्व खरं. पण मी मूर्ख नव्हे का ? "

" प्रेमी मूर्ख ! " शरयूला हा विरोधाभास वाटून ती विनोदबुद्धीनें म्हणाली, " तें कसं ? "

चंदु म्हणाला, " आपण प्रेमानं दुसऱ्याला बद्ध करावं हें खरं. पण तें शब्दशः त्याला तुरुंगांत घालून नव्हे. पाळीव पक्ष्यांना पिंजऱ्यांत ठेवून आपण त्यांच्यावर तुरुंगवासच लादतों नव्हे का ? स्वातंत्र्याच्या सहवासांतलें प्रेम तें खरं प्रेम. हा पक्षी पिंजऱ्याबाहेर पडल्यावर जर उडून जाऊन आपण होऊन माझ्या हातावर येऊन बसेल तर तें मी खरं प्रेम समजेन ! पण हें कसं घडणार ? मीहि त्याच्या प्रियकरणीचा वध केला. पिंजऱ्यांत ठेवून फिरून नवा एखादा प्रेमसंबंध जोडण्याचं त्याला अशक्य केलं. सक्तीनं

संन्यास दिला. त्याबरोबर तुरुंगवासहि घडविला. त्याचे इतके अपराध मीं केल्यावर त्यानं माझ्यावर प्रेम कां करावं ? दुसराहि माझा मूर्खपणा असा कीं, मी त्याच्या मादीच्या शरिरांत पेंढा भरून ती नित्य त्याच्यापुढें ठेवतों. त्यामुळं मला तात्त्विक समाधान लाभत असेल. पण त्याला नित्य दुःख होत असेल कीं नाहीं ? "

चंदूच्या या आत्मदूषक विवेचनांत शरयूला न पटण्यासारखं काय होतं ? पण कांहीं तरी बोलावं म्हणून ती म्हणाली, " मग मला वाटतं कीं या पक्ष्याला जसा पिंजऱ्यांतून सोडून द्यावा, त्याप्रमाणं ही पेंढा भरून ठेवलेली त्याची सहचरी देखील लांब नेऊन मोकळ्या जागेंत सोडावी. म्हणजे एकाबरोबर दोघांची मुक्तता होईल. "

ही सूचना मार्मिकपणाची वाटून तो म्हणाला, " कोणत्या दोघांची मुक्तता व ती कशी ? "

शरयू म्हणाली, " पिंजऱ्यांतून बाहेर पडल्यानं जशी एका पक्ष्याची मुक्तता, त्याचप्रमाणं पेंढा भरलेला पक्षी दृष्टीआड केल्यानं एका दुःखकारक आठवणींतून शिकार करणारांची मुक्तता ! म्हणजे दोघेहि सुचेल तसा पुढचा उद्योग करायला मनानं मोकळे ! "

या खोचदार उत्तरानं चंदूला आनंद झाला. तो म्हणाला, " ठीक आहे शरयू ! पण हीं दोनहि तूंच कर. "

लगेच शरयूनें पिंजऱ्याचें दार उघडल्याबरोबर कपोत उडून गेला आणि एका नोकराला हांक मारून तो पेंढा घातलेला पक्षी दूर नेऊन ठेवून द्यायला तिनें सांगितलें. झाल्या दोनहि गोष्टींचा आनंद वाटून ती म्हणाली, " आणि आतां हा मोकळा पिंजरा बक्षीस म्हणून मी घेऊन जातें. तो मला फार आवडला आहे. "

चंदु म्हणाला, " तो कशाकरितां ? "

" त्यांत मी माझी कांहीं आवडती वस्तु ठेवणार आहें ! "

इतक्या खेळीमेळीनं बोलणं झाल्यावर चंदु अंथरुणावर उठून बसला.

बाहेरून मासाहेब आणि शरयूची आई आंत आली. चहा फळं आलीं तीं सर्वांनीं घेतलीं.

निघतांना चंदूला ऐकूं जाईल इतक्या मोठ्या स्वरानें शरयूची आई मासाहेबांना म्हणाली, " आतां पुन्हा भेट ? "

मासाहेब तितक्याच मोठ्या स्वरानें हसून म्हणाल्या, " आमचे ज्योतिषी-बुवा मुहूर्त काढून सांगतील तेव्हां ! "

*　　　*　　　*

प्रिय वाचक, मी आतां येथेंच मुक्काम करणार ! चंदु व शरयू यांचा संसार पुढें कसा झाला, व चंदूनें आय. सी. एस्चें काम कसें केलें, याची कल्पना मला व तुम्हांला सारखीच करतां येईल. पण घडलें हें जितकें अद्‌भुत ठरलें तितकें पुढें होणारें तें असेल असें मात्र वाटत नाहीं. जन्मात अद्‌भुत व चिरस्मरणीय अशा क्रांतिकारक गोष्टी प्रायः एकेकदांच घडतात !



## उपसंहार　:　:　:　:

एका कुत्सित टीकाकाराचे उद्‌गार मला परवां वाचायला सांपडले. मात्र ते वाचून हसूं आलें. तो म्हणतो, " बलिदान कादंबरीपासून केळकरांनीं कादंबरी लिहिण्याची हाय घेतली आहे ! तथापि आणखी एका कादंबरीची ते दहशत घालीत आहेतच ! " पण मला तर वाटतें कीं माझ्या कादंबरी-लेखनाच्या बाबतींत हाय खाण्यासारखें कांहींच घडलेलें नाहीं. माझ्या पूर्वींच्या दोन कादंबऱ्या, म्हणजे ' नवलपूरचा संस्थानिक ' व ' बलिदान ' या खंडशः प्रसिद्ध झाल्या असतांहि त्यांचीं पुनर्मुद्रणें झालीं; आणि त्यांच्या प्रकाशकाकडून मला योग्य तो मोबदलाहि मिळाला. बलिदान कादंबरीचें तर कानडी व संस्कृत भाषांतर छापूनहि झालें आहे आणि नवलपूरचा संस्थानिक याचें गुजराथी भाषांतर होत आहे. मग मला हाय खाण्याचें काय कारण ? आणि त्या टीकाकाराला मला असेंहि सांगावयाचें आहे कीं

मजजवळ अर्धेमुर्धे लिहून राहिलेले असे अजून पांच कादंबरीखंड आहेत. माझी प्रकृति ठीक राहिली तर तेंहि क्रमशः पुरे करून मी प्रसिद्ध करणार आहें. हाय खाल्लेले लेखक असा उद्योग करीत नसतात!

मी नवीन कादंबरी लिहिणार आहें या गोष्टीनें कोणाला ' दहशत ' कां वाटावी? माझीं पुस्तकें वाचण्याचा मी कोणावर कधींहि जुलूम तर करीत नाहींच; पण अभिप्रायार्थ म्हणूनहि तीं पर्यायानें कोणाच्या गळ्यांत बांधीत नाहीं. औपचारिक रीतीनें दिलेले अभिप्राय मला आवडतच नाहींत. पण परस्पर आस्थेवाईकपणें माझीं पुस्तकें वाचणाऱ्या मित्रांनीं आपला अभिप्राय सांगितला असतां, त्यांनीं दाखविलेल्या दोषांना त्यानीं दाखविलेल्या गुणा-इतकेंच मी महत्त्व देतों.

जुन्या तिसऱ्या पिढीच्या लेखकाला मला कादंबऱ्यांच्या अगदीं अलीकडच्या ठराविक पद्धतीनें कादंबरी लिहितां येत नसेल! निदान तें माझें ध्येय नाहीं. बोधाकरितां ग्रंथ लिहून त्यांतच साधेल ती कलेकरितां कला रंगवावी हें माझें ध्येय असतें. केवळ कला रंगविण्याकरितां म्हणून मी कादंबरी लिहीत नाहीं. तर बोधप्रद अशी एखादी कल्पना माझ्या मनाला पटली म्हणजे ती लोकांनाहि मनोरंजक करून सांगावी म्हणून कादंबरी लिहितों. पण असें करतांना ज्याला कलेचें स्वरूप आहे असेंहि कांहीं लिहिण्याला आपाततः सहजच वाव असतो. कलेकरितां कलेची उपासना करण्याचा जो आनंद असतो ( आणि तो एक खरा आनंद आहे असें मानणाऱ्यांपैकीं मी आहें ) तोहि सहजासहजीं यांतच मिळतो.

एका थट्टेखोर मित्रानें विनोदानें परवां मला म्हटलें तें सांगतों. तो म्हणाला, " केळकर, तुम्ही आपल्या कादंबऱ्यांना कादबरी हें नांव देत जाऊं नका. " मी म्हणालों, " तें कां रे बाबा? कोणाला तो साधो वा न साधो; पण कादंबरी म्हणून एक ठरीव वाङ्मयप्रकार नाहीं कीं काय? " माझा मित्र म्हणाला, " म्हणून काय झालें? एखाद्या गोष्टीला कादंबरी हें नांव ठेवण्याला हल्लीं खालील दोहोंपैकीं एक गोष्ट अवश्य ठरते. पहिली ही कीं, त्या गोष्टींत नायिकाभूत एखादी कॉलेज कुमारी किंवा तत्सम तरुणी असावी,

अशी कीं, प्रेमाचा अंकुश गंडस्थळांत रुतल्यानें च्-च्-च्-च् करून हत्तिणी-सारखे चीत्कार काढणारी, आणि पुढच्या सोंडेऐवजीं पाठीवर लोंबणाऱ्या सोंडेसारखा केसाचा शेपटा असणारी अशी पाहिजे ! ”

मग मी हसून म्हणालों, “ तुझी थट्टा समजली. पण मग नायक कसा असावा ? तेंहि आतां सांग ना ! ”

तो म्हणाला, “ श्रीमंत सुशिक्षित तरुण, पण अंगांत खादीचें कुडतें घातलेला, अंगावर घोंगडी घेतलेला व हातांत खराटा परजणारा ! ”

मी म्हणालों, “ तुझ्या थट्टेचा रोख लक्षांत आला. बरं, पण तूं लिहिशील त्या कादंबरीची नायक-नायिका कशी काय रंगविणार ? तुझी नायिका ही नाकांत सोन्याचं सुंकलं घातलेली व धाबळी नेसलेली कोकणदेवी असेल ? कीं बॉब्‌ड् हेअरवाली, हाफ पॅंट घातलेली, तोंडांत सिगार व हातांत टेनीस बॅट घेतलेली नव महिला असेल ? तुला नायक कसा आवडतो ? गडकऱ्यांनीं वर्णिल्याप्रमाणें कानांत केसाचे झुबके वाढलेला, आणि बोरीबंदरापासून गिर-गांवापर्यंत पोंचण्याइतक्या लांब अस्तनीच्या अंगरख्याचा ? कीं अपटुडेट पद्ध-तीचा अमेरिकन गॅंगस्टर गनमन ? माझ्या प्रश्नाचें तात्पर्य इतकेंच कीं, नायक-नायिका यांचे नमुने कोणी कोणतेहि घेतले तरी केवळ त्यांनीं कलेची वाण भरून निघणार नाहीं. ती कला ज्याच्या अंगीं असेल त्यानें तिचा दुरुपयोग करूं नये; तसेंच ती ज्याच्या अंगीं नसेल त्यानें तिची निंदा करूं नये.

“ एखाद्या विशिष्ट नमुन्याचं अनुकरण करून दुसऱ्याच्या संप्रदायाचें वैभव भोगणें, किंवा स्पर्धेकरितां अतिशयोक्ति करणें, हें कोणत्याहि बाबतींत मला आवडत नाहीं. वाङ्मय लिहिणें हा स्वतंत्र असा आनंद लेखकानें मानावा. विशेष चांगली निर्मिति झाली तर स्तुति परस्परच ऐकूं येईल. विशेष वाईट निर्मिति झाली तर निंदाहि परस्पर ऐकूं येईल. पण नित्य या स्तुतीला किंवा निंदेला कान देऊन बसणाराला आत्मप्रसाधन करतां येणार नाहीं. ”

हल्लीच्या चांगल्या कादंऱ्यांची टर कोणी कां करावी ? पण कॉलेज

कुमारिका प्रकारच्या कादंबऱ्यांचे वाचक आणि माझ्या कादंबऱ्यांचे वाचक हे वर्ग थोडेथोडे वेगळ्या जातीचे आहेत अशी माझी समजूत आहे. त्या दुसऱ्या प्रकारच्या कादंबऱ्या चांगल्याच असतात. पण त्या मुख्यतः कादंबऱ्या म्हणून लिहिलेल्या असतात. माझ्या कादंबऱ्या हीं केवळ कांहीं एका तत्त्वाचीं उदाहरणें, गोष्टींच्या रूपानें सांगितलेलीं, अशीं मीं मानतों. तात्पर्य हा प्रकार ज्यांना रुचत नसेल त्यांनीं पुस्तकावर माझें नांव पहातांच मला बगल द्यावी किंवा आपण घ्यावी. आम्हा दोघांनाहि एरवीं जगांत जागा पुष्कळ आहे.

वरील विचार ओघानें सुचले ते दिले; पण माझ्या या उपसंहाराला ते प्रस्तावनेसारखेंच ठरतात म्हणून !

' कावळा व ढापी ' या माझ्या प्रस्तुत कादंबरीचा हेतू मानसशास्त्रांत आढळलेलें एक तत्त्व, आणि समाजांत येणारा एक अनुभव, हीं दोनहि विशद करून सांगण्याचा आहे. मी स्वतः नास्तिक नाहीं आणि कांहीं तत्त्वानुसार कांहीं प्रमाणांत दैववादीहि आहें हें माझ्या आत्मचरित्राच्या वाचकांना माहीत झालें असेल. परंतु दैव हा विश्वंकष नियतीचा एक प्रकार मानला तरी, मनुष्यानें सर्वस्वीं त्या कल्पनेच्या आधीन होऊं नये, आणि दैवाला जशी मान्यता तशी आपल्या उद्योगालाहि मान्यता देऊन अखेर येईल तो अनुभव ग्राह्य मानावा या मताचा मी आहें.

याच दृष्टीनें ' बुद्धिप्रामाण्य ' या विषयावर १९३९ च्या 'सह्याद्रीं' त मीं एक लेख लिहिला होता. माझ्याच मताचे माझे एक स्नेही आहेत. त्यांच्याशीं या विषयावर माझी मधून मधून चर्चा होते. मात्र वाद घोळविण्याकरितां मी मुद्दाम त्याच्या उलटसुलट दोन्ही बाजू मांडतों. कारण एकेरी ठाम दडपून दिलेल्या ( Dogmatic ) मतापेक्षां अनेकपदरी मतानें, व संशयाला शेंकडा ५ इतकी तरी जागा देणाऱ्या प्रशस्त विधानानें, अधिक रेखीव सत्य सांगतां येतें असें मला वाटतें.

असो. या चर्चेंत सहज एकदां योगायोगाचें एक कथाबीज मला सुचलें, आणि त्यालाच कादंबरीच्या प्रकरणरूपांनीं हे अंकुर फुटलेले आहेत.

' योगायोग ' हा शब्द प्रसिद्ध आहे. मात्र त्या समासाचा विग्रह योग व अयोग असा नाहीं. भाषाविस्तारांत द्विरुक्ति व दीर्घीकरण अशा प्रकारचीं एक-दोन तत्त्वें आहेत. त्यांना अनुसरून योगायोग हा शब्द केवळ योग या अर्थाचा बनलेला आहे. इच्छास्वातंत्र्याच्या मर्यादेंत आपले आपण घडवून आणतों असे कांहीं योग हे असतातच. पण पुष्कळ असेहि असतात कीं, तेथें आमची इच्छाशक्ति प्रभावी असत नाहीं. इतर कांहींतरी शक्ति प्रभावी होतात. योगायोगाला ' काकतालीय न्याय ' असा संस्कृत शब्द आहे आणि त्या अर्थींच एक म्हण मराठींत ' कावळा बसायला आणि ढापी मोडायला गांठ ' अशी आहे. मीं या प्रस्तुत गोष्टीचें किंवा कादंबरीचें नांव ' कावळा व ढापी ' हें ठेवलें. यावरूनच त्यांतील विषयाचें दिग्दर्शन सहज होणारें आहे.

योगायोगाचा एक परिणाम मनुष्याची बुद्धि मंद किंवा भ्रष्टहि करण्यांत होतो आणि हाच अनुभव गोष्टीच्या रूपानें मीं येथें वर्णिला आहे. केवळ कोणा एखाद्यानें दुसऱ्या एखाद्याला गुरु मानणें यांत वावगें कांहीं नाहीं. कारण ' गुरु ' म्हणजे ' शिक्षक ' होय आणि कोणीहि मनुष्य सर्वज्ञ नसल्यामुळें त्यानें आपल्याला अज्ञात असलेल्या विषयांत शिक्षक म्हणून गुरूचा उपयोग करणें ठीकच आहे. पण गुरु झाला तरी त्याला विशिष्ट विषयांतच प्रावीण्य असतें, आणि त्याचें प्रामाण्य मानावयाचें तर त्या विषयापुरतेंच मानलें पाहिजे. हें तत्त्व जेव्हां सुटतें, आणि त्याची असमर्थनीय अतिशयोक्ति होऊं लागते, तेव्हांच काय तें काम विघडतें. श्रीमत् भागवतांत जडभरतानें एक नव्हे तर चोवीस गुरु केले अशी गोष्ट आहे आणि कोणत्या गुणाकरितां कोणता गुरु केला हेंहि तेथें सांगितल्यामुळें गुरु करण्याचें मर्म सहज लक्षांत येतें. भगवद्गीतेंतील विभूतिसिद्धांत आणि भागवतांतील गुरुसिद्धांत हे बोधाच्या दृष्टीनें एकच ठरतील, म्हणजे एकेकांत एकेक गुण. एखाद्या डोंगरावर आपण व गुरु मानलेली व्यक्ति उभे असतां, आपल्याहून अधिक उंच जागेवर गुरु उभा राहिला आहे म्हणून त्याला काय दिसतें हें विचारून घेणें हा गुरु करणाराला दाखला योग्य

ठरेल. पण गुरूच्या पायाला बांधून घेऊन त्याच्याबरोबर एकदम डोंगराच्या पायाखालीं उडी घेणें किंवा उतारावर घसरत जाणें हा अर्थ चुकीचा ठरेल.

मग बुद्धिमान लोकांच्याहि हातून या वाईट अर्थाचें गुरु-करण कसें होतें व त्याचें कारण काय ? याचा विचार करतां एक स्थूल गमक असें आढळतें कीं, बुद्धिमान मनुष्यहि कांहीं दुःखाच्या पेचांत सांपडला म्हणजे त्याच्या बुद्धीची अनुमानशक्तीची शुद्धता राहात नाहीं. खरा मुमुक्ष हा एक आढळला तर अर्थार्थी व आर्त म्हणजे दुःखी असे अनेक गुरुभजकामध्यें आढळतात. सर्वच गुरुपूजक ढोंगी असतात असें नाहीं. कांहींना गुरुपूजेंत खरा आनंदहि लाभत असेल. पण दुःखाचें निराकरण झाल्यावर किंवा अर्थ पदरांत पडल्यावर त्यांची गुरुभक्ति पूर्वींइतकीच राहते किंवा काय हा प्रश्न आहे आणि जर एखाद्या आकस्मिक क्षोभनानें बुद्धि चळली तर प्रतिक्षोभनानें फिरून तीं ताळ्यावर येईल कीं नाहीं अशीहि चिकित्सा रास्त ठरेल.

या दृष्टीनें मानस–शास्त्रावरील कांहीं इंग्रजी ग्रंथ मीं चाळून पाहिले आणि वरील मुद्द्याला लागू अशीं जीं विधानें त्यांत आढळलीं तीं यापुढें मूळ इंग्रजींतच दिलीं आहेत, त्यावरून लक्षांत येईलः—

Physical and moral suffering is the miracle-working external condition of religious conversion.

One needed to feel the heavy hand of suffering, weighing upon him.

The study of literature and the facts of my own experience furnish convincing evidence that, before an adult turns towards religious faith, he must have undergone the experience of suffering. It may even be that suffering is the one indispensable factor, though suffering alone is insufficient.

When we allude to sorrowful experiences, we reach the most profound of all the internal causes of conversion. Indeed all, who show signs of radical mutations of persona-

lity, will have already experienced a more or less conscious internal *crisis.*

( 'Religious conversio–na Bio-psychological study' by Sante de Sanctis. Pages 46–47)

The truth is that in the metaphysical and religious sphere, articulate reasons are cogent for us, only when our inarticulate feelings of reality have already been impressed in favour of the same conclusion. Our impulsive belief is here always what sets up the original body of truth, and our articulately verbalised philosophy is but its showy translation into formulas. The unreasoned and immediate assurance is the deep thing in us, the reasoned argument is but a surface exhibition.

Not that it is better that the subconscious and non-rational should thus hold primacy in the religious realm. It simply may be pointed out that they *do* so hold it as a matter of fact. ( Page 74. )

There may be two different levels of personality, inconsistent in their dictates, yet so well balanced against each other as, for a long time to fill the life with discord and dissatisfaction. At last, not gradually, but in a *sudden crisis*, the unstable equilibrium is resolved; and this happens so unexpectedly that it is, as if, some outside power laid hold on him. ( Page 180. )

To say that a man is 'converted' means that ( religious ) ideas, previously peri-pheral in his consciousness, now take a central place and that religious aims form the centre of his personal energy.

Neither an outside observer, nor the subject who undergoes the process, can explain fully how particular experiences

are able to change one's centre of energy so decisively, or why they have so often bided their hour to do so.

A new perception, a sudden emotional shock, or an occassion which lays bare the organic alteration, will make the whole fabric fall together.

Conversion in its essence is a normal adolescent phenomenon, incidental to the passage from the child's small universe to the wider intellectual and spiritual life of maturity.

( ' Varieties of religious experience'
by William James. Page 198–199. )

Disorders of mental life may arise through the incapacity of the personality to cope with the problems and difficulties he encounters, his inability to adjust himself to his environment. The tissues of the body, including the brain and all the nervous system, may be healthy. But there is some lack of balance or harmony and co-operation between the parts. A stage of preparatory conflict may be suspected in all cases of neurotic disorders; yet symptoms of the dissociative are apt to appear suddenly on the occasion of some *emotional shock*.

( 'The Energies of Man', by William Mc Dongall.
Pages 265–271. )

Respect is the attitude of the opposite of self-assertion and self-display over against the object of the sentiment. It is a sentiment of which the essential attitude is that of looking up to the object, the impulse is that of the submissive instinct; for he has shown, in certain regards, powers that are greater than your own. You have acquired deference or docility towards his opinion, admiration for his achievements, and respect for his personality as a whole.

( 'An outline of psychology' by William Mc Dongall.
Page 424. )

दिव्य ज्ञान व दैवी गुण यांची देणगी ईश्वर हा मनुष्यरूपी गुरूला खरो-खर देतो कीं नाहीं असा तत्त्ववेत्त्यामध्यें कायमचा वाद आहे. तो ती देतो असें एका पक्षानें म्हटलें, म्हणजे दुसरा पक्ष म्हणतो, ती देणगी खरी दिली कशावरून हें सिद्ध करा आणि मनुष्यकृत अद्भुत वर्तनाचें उदाहरण यानें दाखविलें म्हणजे तो म्हणतो, 'यांत दैवी असें कांहींच नाहीं. रोगट मनाच्या मनुष्याच्या हातून असल्या गोष्टी होतात. अद्भुत म्हणजे दैवीच असें होत नाहीं. मानुष गुणांतहि अतर्कित अपवादभूत असें कांहीं असूं शकतें' आणि मानसशास्त्रदृष्ट्या अद्भुत असें कांहीं करणाराची शारीर-चिकित्सा केली, म्हणजे वैद्यकदृष्ट्या त्याच्यामध्यें रोगटपणाचीं कांहीं लक्षणें हटकून दिसतातहि !

पण यावर पहिला पक्ष म्हणतो कीं अशा माणसाची शारीर–चिकित्सा तुम्हीं कां करावी ? हें मुद्दा सोडून होत आहे. हा मनुष्य रोगट असो किंवा सुदृढ निरोगी असो, त्याचें वर्तन दैवी दिसतें कीं नाहीं एवढेंच पाहा. शारीर कारण पण दैवी कार्य असें ठरलें तर ?

'Origin in immediate intuition, origin in pontifical authority, origin in supernatural revealation, as by vision, hearing, or unaccountable impression, origin in direct possession of a higher spirit expressing itself in prophesy and warning, origin in automatic utterance.' अित्यादि विविध प्रकार असूं शकतील. अेक तत्त्ववेत्ता म्हणतो— 'What right have we to believe Nature under any obligation to do her work by means of complete minds only? She may find an incomplete mind a more suitable instrument for a particular purpose. It is the work that is done, and the quality in the worker by which it was done that is alone of moment. And it may be no great matter from a cosmical standpoint if in other qualities of character a man was singularly defective—if indeed he were hypocrite, adulterer, eccentric, or bureaucratic. Hence we

come again to the old and last resort of certitude, viz., the common assent of mankind or of the competent by instruction and training among mankind.

The roots of a man's virtue are inaccessible to us. Our practice is the only sure evidence.'

' साधु वेडे असतात म्हणून त्यांचीं कृत्यें वेडेपणाचीं समजावीं. त्यांत दैवी तें काय ? ' असें एक पक्ष म्हणतो. दुसरा म्हणतो, ' ते वेडे असले ( दिसले ) म्हणून काय झालें ? त्यांच्या संगतीनें, शब्दांनीं, कृत्यांनीं अंतिम परिणामीं सत्य, सुख, समाधान यांची जोड लाभत असली तर त्यांना दैवी गुणाची देणगी आहे असेंच मानलें पाहिजे. ' पण हा वाद संपणारा नाहीं ! माझें मत पृष्ठ २२३ वर दिग्दर्शित केलें आहे.

निवळ योगायोगासंबंधानें तर पुष्कळच लिहितां येण्यासारखें आहे. पण त्याविषयीं सह्याद्रीच्या १९३८ च्या जुलैच्या अंकांत ' विविध चर्चा ' या सदराखालीं श्री. रा. ज. गोखले (पूर्वीच्या गूढ-विद्या चिकित्सक मंडळाचे चिटणीस ) यांनीं अनेक उदाहरणें दिलीं आहेत, तीं वाचकांनीं वाचावीं अशी मी शिफारस करतों. तसेंच ' जॉन ऑफ लंडन ' या इंग्रजी साप्ताहिकाच्या ६-७-३५ च्या अंकात ' रोनॉल्ड डंकन ' यानें लिहिलेली हकिगत, ' दि इंडिया वुई सर्व्हड् ' या ग्रंथाच्या १४८ साव्या पृष्ठावर सर डब्ल्यू. लॉरेन्स आय् . सी. एस्. यांनीं दिलेली हकिगतहि वाचनीय आहे. तसेंच इंग्रजी विनोदी लेखक ' स्विफ्ट ' यानें ' गालिव्हरचा प्रवासवृत्तान्त' यांत थट्टेनें एक ज्योतिषविषयक गोष्ट लिहिली ती पुढें खरोखरच दुर्बिणीच्या साहाय्यानें सिद्ध झाली. याची मौजेची हकीकत ' स्प्लेन्डर ऑफ दि हेवन्स ' व्हॉल्यूम १, पान ३२२ यात दिली आहे.

शेवटीं योगायोगाच्या अनुभवाचीं स्वतःचीं तीन उदाहरणें सांगून संपवितों. पैकीं दोन उदाहरणें माझ्या आत्मचरित्रांत ' माझ्या लहानपणच्या आठवणी ' या सदराखालीं पृ. १२८ व १३२ यावर आढळतील. पण अगदीं मौज म्हणून, ही कादंबरी प्रत्यक्ष लिहित असतां जो योगायोग घडला तो दिल्याशिवाय राहवत नाहीं !

## * उपसंहार *

या कादंबरीच्या सातव्या, आठव्या व नवव्या प्रकरणांत येणाऱ्या, हिंदुस्थानांत व विलायतेंत एकाच वेळीं घडलेल्या गोष्टींची तारीख, वेळ व वर्ष हीं कांहीं तरी म्हणजे केवळ कपोलकल्पित अशीं मला घालावयाचीं होतीं. पैकीं ऑगस्ट महिना हा मी अशाकरितां घातला कीं, त्या महिन्याच्या अखेरीच्या सुमारास विलायतेंतील आय. सी. एस्. परीक्षेचा निकाल लागतो. वर्ष १९४० असें लिहिलें तें उघड उघड असंबद्धता उत्पन्न करण्याकरितां! आणि तारीख व वार केवळ कांहीं तरी हाताला आलीं तीं लिहिलीं आणि ता. २७ मंगळवार ऑगस्ट १९४० असें कांहीं तरी ठरवून ते शब्द म्हणजे आकडे प्रुफांत पक्के घातल्यावर रा. दि. वि. काळे यांनीं सहज कॅलेंडरचें पान चाळलें आणि मौज ही कीं, सन १९४०, महिना ऑगस्ट, ता. २७ मंगळवार, हें जसें काय पाहून लिहावे असें जमलें! या योगायोगाला मी कांहींच किंमत देत नाहीं. कारण कादंबरीच्या पहिल्याच पानावर ' योगायोग हा विवेचकाला नुसता विनोदविषय होतो ' असें मीं लिहिलें तें सहेतुक व अनुभवाचें म्हणून लिहिलेलें आहे.

असो. या उपसंहारासह, म्हणजे ही गोष्ट किंवा कादंबरी लिहिण्याचा हेतु माझा मीच सांगून, ती वाचकांना सादर करीत आहें आणि मनानें ही गोष्ट किंवा कादंबरी पुण्यांतील चिकित्सामंडळाला अर्पण करीत आहें.



# सुरसग्रंथमाला ( पंढरपूर )

## जुनीं प्रकाशनें

| अ.नं. | नांव | रु. आ. पै. |
|---|---|---|
| ९ | जर्मन मोहीम, गहनगूढ, प्रेमपरीक्षण ... ... | २-१०—० |
| १० | सत्यमेव जयते व शैशव सहचरी ... ... | २—०—० |
| १९ | पितृप्रेम ( नाटक )—परांजपे ... ... | ०—१०-० |
| ४१ | दैवदुर्विपाक व भयंकर भूल—सव्यसाची ... | ३—४—० |
| ४४ | मृगेंद्रलीला-प्रभंजन ... ... ... | ३-१२—० |
| ४५ | ईश्वरी लीला व आशानिराशा—नरवणे ... | ३-१२—० |
| ४६।४७ | प्रेमाश्रम, भाग १।२—प्रभाकर... ... | ७—०—० |
| ४८।४९ | वीरात्मा, भाग १।२-गणेशशास्त्री फाटक ... | ७—०—० |
| ५२ | विजयनगरची साम्राज्यस्थापना—दातार ... | ३—८—० |
| ५३ | कुमार अशोक—लिमये ... ... ... | ३—४—० |
| ५४।५५।५६ | जगाचा बाजार, भाग १।२।३ एकत्र... | ९—८—० |
| ५७ | ढोंगी गुरूच्या सैतानी लीला-गणेशशास्त्री फाटक... | ३—८—० |
| ५८ | हा संशयाचा प्रताप—ग. वि. कुलकर्णी... ... | ३—८—० |
| ६० | भाईबंद व नराचा नारायण—दातार ... ... | ३—४—० |
| ६२ | प्रेमबंधन—दातार ... ... ... | ३—८—० |
| ६३ | प्रतापादित्य—वा. शि. हडकर ... ... | ३—८—० |
| ६४ | देवी कल्याणी—अज्ञात ... ... ... | ३—८—० |
| ६५ | भीषण सूड—अज्ञात ... ... ... | ३—४—० |
| ६६ | अमृत कीं विष—हडकर ... ... ... | ३—४—० |
| ६७ | रत्नगडची रंभा—सहृदय ... ... ... | ३—४—० |
| ६९ | रक्ताचें गालबोट—परांजपे ... ... ... | ३—४--० |
| ७१ | देशभक्त—अनंतवार ... ... ... | १—०—० |
| ७२ | गृहदेवी--प. स. देसाई ... ... ... | २--०--० |
| ७३ | भावकला—ल. रा. पटवर्धन... ... ... | २—०—० |
| ७४ | धरणीवं[illegible]—वि[illegible]. हडप ... ... ... | २—०—० |
| ७५ | कोटन[illegible]—अनंतवार ... ... ... | ०-१२—० |
| ७७ | उमा[illegible]लेल्या भावना—कवठेकर ... ... | २—०—० |

# नवीं प्रकाशनें

| अ.नं. | नांव | रु. आ. पै |
|---|---|---|
| ८५ | ओझरती नजर—के. मा. नाईक | ४—०—० |
| ८७ | छत्रसाल (संक्षिप्त)—वालचंद शहा, २ री आवृत्ति | ४—०—० |
| ८८ | भिरभिरें—गंगाधर गाडगीळ | ३—०—० |
| ८९ | तूं भेटायला नको होतास—सरोजिनी बाबर | ३—०—० |
| ९० | मायेचा पाझर—शांता शेळके | ३—०—० |
| ९१ | मीलन—अरविंद गोखले | ३—०—० |
| ९२ | सम्राट् अशोक—वालचंद शहा, ३ री आवृत्ति | ६—०—० |
| ९३ | सर्व हक्क स्वाधीन—बोकील | ४—०—० |
| ९४ | भूकबळी—सुरेश शर्मा | २—०—० |
| ९६ | पाटणची प्रभात—कन्हैयालाल मुनशी, २ री आवृत्ति | ६—०—० |
| ९७ | पूर्व आणि पश्चिम—शांतिलाल भंडारी | ४—८—० |
| ९८ | वैरपूर्ती—कन्हैयालाल मुनशी, २ री आवृत्ति | ८—०—० |
| ९९ | अल्मिनार—पद्माकर डावरे | ३—०—० |
| १०० | जीवननृत्य—मीनाक्षी साने | ३—८—० |
| १०१ | गुजराथचा नाथ—कन्हैयालाल मुनशी, २ री आवृत्ति | ६—०—० |
| १०२ | बजाजी निंबाळकर—वालचंद शहा | ४—०—० |
| १०३ | नौका-डुबी—टागोर, २ री आवृत्ति | ५—०—० |
| १०४ | गोषांतील सुंदर स्त्रिया—कोठारी, ३ री आवृत्ति | ५—०—० |
| १०५ | गृहिणी (टॉलस्टॉय)—निरंतर, २ री आवृत्ति | ३—०—० |
| १०६ | जागरण—अरविंद गोखले | ३—०—० |
| १०७ | पाटलाची लेक—चौगुले | ३—०—० |
| १०८ | ओझरती नजर, २ री आवृत्ति | |
| १०९ | छत्रसाल—वालचंद शहा ३ री आवृत्ति | ३—०—० |
| ११० | मदिरा—मस्तानी—भागवत | २—०—० |
| १११ | लंडन येथील बड्या लोकांचीं गुप्त कृत्यें भाग १ ला | १—८—० |
| ११२ | ,, २ रा | ,, |
| ११३ | ,, [illegible] | ,, |
| ११४ | ,, [illegible] | ,, |
| ११५ | ,, ५ वा | ,, |
| ११६ | सैन्य चाललें पुढें—बोकील | ६—०—० |
| ११७ | कावळा व ढापी—न. चिं. केळकर | ४—०—० |
| ११८ | तिसऱ्यांदा चिमणराव—चिं. वि. जोशी | |

